ई - पुस्तक : कृष्ण सखा माझा भाग-3

लेखन : श्रीपरमानंदस्वामी (श्री. अविनाश मोरेश्वर लिमये)

संपर्क : ०२२-२४३६ १५१४ | ९९६९८ ७६८५०.

ई - प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

हक्क : सौ. अनुपमा अविनाश लिमये
१३, नवलकर बिल्डिंग, न.चि. केळकर रोड,
दादर, मुंबई ४०० ०२८.

www.esahity.com
esahity@gmail.com
eleventh floor, eternity
eastern express highway
thane, 400604.

# समर्पण

सगुण प्रेमभक्तिचा आनंददायी मार्ग दाखविणाऱ्या
सद्गुरुनाथ श्रीअवधूतस्वामी यांच्या पवित्र चरणी
त्यांच्याच कृपेने लाभलेले हे भक्तिभावाचे सुमधूर फळ,
सप्रेम समर्पण.

\- श्रीपरमानंदस्वामी



# पुस्तक परिचय

नारदऋषी आणि लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडत जाणारे हे कृष्णाचे गोकुळापर्यंतचे जीवनचरित्र अतिशय बोधप्रद आहे. कृष्णचरित्र हे अनेक चमत्कारांनी भरलेले आहे, असेच नेहमी वर्णन केले जाते. परंतु, श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेले हे कृष्णचरित्र वाचताना, त्या प्रसंगांमधील तर्कसंगतता वाचकांना विचार करायला लावणारी आहे. ते वाचताना हे प्रसंग असेच घडले असणार असेच वाटते. उदाहरणार्थ,

कृष्ण सखा माझा - भाग एक मधील कृष्णाची बंदीशाळेतून मुक्तता, यमुनेला आलेला पूर, नंदराजाच्या कन्येला घेऊन वसुदेवाचे मथुरेला येणे इत्यादीमधील चमत्कारांपेक्षा त्यामधील तर्कसंगत विचार मनाला भावतात आणि बुद्धीलाही पटतात. तसेच ‘चमत्कार’ या विषयाबद्दल नारद व लक्ष्मी यांचा संवादही वाचकांना विचार करायला लावणारा आहे.

कृष्ण सखा माझा - भाग दोन मध्ये कृष्णाच्या बाललीला तसेच कृष्ण व पेंद्या यांच्यातील सख्यत्व श्रीपरमानंदस्वामी यांनी अतिशय सुंदरपणे रंगविले आहे. कृष्णचरित्रामध्ये ‘गोपीवस्त्रहरण’ या नावाने प्रचलित असलेल्या प्रसंगाचे (जो लोकांच्या दृष्टीने अजूनही कृष्णावरील टीकेचा एक विषय ठरलेला आहे) श्रीपरमानंदस्वामी यांनी केलेले वर्णन (गोपिकांचे लज्जारक्षण) वाचताना तेच त्या प्रसंगातील वास्तव आहे असेच जाणवते. तसेच बाजाराला जाणाऱ्या गवळणींची दह्या-दूधाची मडकी फोडण्याच्या प्रसंगातील वास्तविकताही जाणवते.

कृष्ण सखा माझा - भाग तीन मध्ये राधा-कृष्ण यांची प्रथम भेट, त्यांच्या भेटींमध्ये घडणारे प्रसंग व त्यांचे एकमेकांशी होणारे संवाद, त्यांच्या भेटींमधील अडचणी इत्यादींमधून राधा-कृष्ण यांच्यातील सर्व नात्यांच्या पलिकडे असलेले भक्तिभावाचे संबंध जाणवतात. तसेच गोवर्धन

पूजन आणि मुसळधार वृष्टीचे संकट यांमधून पुन्हा एकदा चमत्कारांपलिकडील वास्तविकताच लक्षात येते.

कृष्ण सखा माझा - भाग चार मधील राधा-कृष्ण यांच्यातील प्रेमभक्तिभावाचे संबंध वाचताना भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व मनावर ठसते. तसेच कालिया मर्दनाचाही प्रसंग अतिशय वाचनीय आहे.

कृष्ण सखा माझा - भाग पाच मध्ये अक्रूराचे आगमन, राधेचा कृष्णाला भावपूर्ण निरोप, कृष्णाचे मथुरेकडे प्रयाण, कृष्णरूप राधा, कृष्णजयंती सोहळा असे अतिशय भावपूर्ण प्रसंग वाचायला मिळतात.

'कृष्ण सखा माझा' या ग्रंथाचे मुखपृष्ठही अतिशय सुंदर असून, ते श्रीपरमानंदस्वामी यांच्या संकल्पनेतूनच साकार झालेले आहे. राधा व कृष्ण यांच्यातील सख्यत्व तर यातून जाणवतेच, पण त्याचबरोबर ते एकमेकांच्या अतिशय जवळ असूनसुद्धा ते एकमेकांकडे पहात नाहीत, तर कृष्ण स्वतः स्वतःतच रमलेला आहे आणि राधा कृष्णप्रेमात रमलेली आहे हे जाणवते. दोघांनीही हातात धरलेली एकच मुरली हे राधा-कृष्ण यांच्या ऐक्यत्वाचेच प्रतीक आहे. एकूणच भक्तिमार्गाबद्दल असलेले गैरसमज दूर करणारा हा ग्रंथ आहे.

'ई साहित्य प्रकाशन' यांनी हा सुंदर ग्रंथ पाच भागांमध्ये वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे मान्य केले, याबद्दल त्यांना धन्यवाद!

सौ.प्रतिमा प्रविण आठवले

# भाग-३

## अनुक्रमणिका -





## राधेची कृष्णाशी प्रथम भेट

‘‘**हे** लक्ष्मी, या राधेची कृष्णाशी झालेली प्रथम भेट सुद्धा एका मजेशीर प्रसंगातूनच घडली. अनय नावाचा एक गोप नंदाच्या वाड्यात काही ना काही कामानिमित्ताने नेहमी येत असे. त्याचे नंदाशी संबंधही थोडेसे घरगुती स्वरूपाचेच झाले होते. काही काळानंतर अनयाचा विवाह झाला. त्याची पत्नी हीच ती राधा होय. विवाहानंतर प्रथमच अनय राधेला घेऊन नंद यशोदेच्या भेटीला आला. नंदाने व यशोदेने अनयाचे व राधेचे प्रेमाने स्वागत केले. यशोदेने अनय व राधा या उभयतांना औक्षण केले. नंदाने त्या उभयतांना उत्तमोत्तम अहेर केला आणि त्यांचा गौरव केला. नंतर अनयानेही नंद व यशोदा यांना प्रेमाने अहेर केला आणि त्यांचे आशीर्वाद मागून घेतले. त्यानंतर राधा बरोबर घेऊन आलेल्या ताटातील फराळ सर्वांना देऊ लागली.

एवढा वेळ राधेकडे कौतुकाने व कुतूहलाने पहात बसलेल्या कृष्णासमोर जेव्हा राधा आली आणि त्याला फराळाचे पदार्थ देऊ लागली तेव्हा कृष्णाने तिला गमतीने प्रश्न विचारला, ‘‘अगं राधे, फराळासाठी तर तू एवढे पदार्थ आणले आहेस हे खरे आहे. पण मला तू एक सांग की यातील कोणता पदार्थ तू तुझ्या हाताने तयार केलेला आहेस? तू स्वतः बनवलेला पदार्थच केवळ मला हवा आहे. दुसऱ्या कशाचेही सेवन मी करणार नाही.’’

कृष्णाचे ते बोलणे ऐकून राधा आधी बावरली आणि मग थोडीशी वरमली सुद्धा! कृष्णाची व तिची ती पहिलीच भेट असल्यामुळे राधेला कृष्णाच्या विनोदी स्वभावाची काहीच कल्पना नव्हती. कृष्ण राधेकडे पाहून मिश्किलतेने हसत होता. एवढेच नव्हे, तर इतर सर्वचजण राधेकडे बघून आपले हसू लपविण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होते. त्यामुळे तर राधा अधिकच ओशाळल्यासारखी झाली. शेवटी थोड्याशा दबलेल्या सुरातच राधा म्हणाली, ‘‘मी यातील अगदी प्रत्यक्ष असा कोणताच पदार्थ बनवलेला नाही. ते सर्व पदार्थ अगदी माझ्या सासूबाईंनीच तयार केलेले आहेत. पण प्रत्येक गोष्टीत मी स्वतः त्यांना अगदी मनापासून हातभार लावून मदत मात्र केलेली आहे. त्यामुळे प्रत्येक पदार्थ तयार करण्यात आणि येथे आणण्यातही अगदी माझाही सहभाग आहेच ना. तेव्हा अगदी मीसुद्धा हे पदार्थ थोडेसे बनवलेले आहेत हे लक्षात घेऊन हे कृष्णा, तू अगदी तुला आवडणारा कोणताही पदार्थ सेवन कर.’’

राधेच्या बोलण्यावर कृष्ण अधिकच हसू लागला. बोलताना वारंवार ‘अगदी’ शब्द वापरण्याच्या राधेच्या लकबीची मुद्दामहून नक्कल करीत कृष्ण म्हणाला, ‘‘राधे, अगदी तू पदार्थ बनवलेस की नाही हे मला तरी माहीत नाही. परंतु सासूबाईंना पदार्थ बनवण्यासाठी अगदी तू मदत केलीस असे सांगून, मला मात्र अगदी तू बनवण्याचा प्रयत्न करीत आहेस. परंतु मी असा अगदी मुळीच बनणार नाही. कारण एक गोष्ट अगदी मला पक्की ठाऊक आहे की पदार्थाला चव ही अगदी

पदार्थ करणाऱ्याच्या हाताच्या गोडीमुळे प्राप्त होते. तेव्हा मला अगदी तुझ्या हातानेच तयार केलेला पदार्थ हवा आहे. कारण अगदी तरच मला कळेल की तुझ्या हाताची खरी गोडी अगदी काय आहे ती.''

कृष्ण 'अगदी' हा शब्द जाणून बुजून पुन्हा पुन्हा उच्चारीत आहे हे सर्वांच्याच लक्षात आले. अगदी राधेच्यासुद्धा! कृष्णाच्या त्या बोलण्याने आता मात्र कोणालाही आपले हसू आवरणे शक्य झाले नाही. नंद व यशोदेसह सर्वच जण मोकळेपणाने हसू लागले. त्यात अनयही सामील झाला होता. परंतु राधेच्या डोळ्यात मात्र पाणी तरारले आणि ती कावऱ्या बावऱ्या नजरेने कृष्णाकडे पाहू लागली. कृष्ण एकदम आपल्या जागेवरून उठला आणि राधेकडे बघून अत्यंत प्रेमाने हसला. कृष्णाच्या नजरेत आता कोणतेही मिश्किलतेचे भाव नव्हते, तर राधेविषयीचा आत्यंतिक आपलेपणाचा भाव होता. तो राधेच्या लगेचच लक्षात आला आणि तीही थोडीशी सावरली. तेव्हा कृष्ण पुन्हा राधेला उद्देशून म्हणाला,

''अगं राधे, मी तर तुझी केवळ गंमत करीत होतो. तू माझ्यावर रागावलीस तर नाही ना? आणि रागावली असलीस तरी आता राग मनात मुळीच धरून ठेवू नकोस. सर्वांप्रमाणे तूही मोकळेपणाने हस बघू. आता आपण एक गोष्ट करू या. या पदार्थातील तुझ्या आवडीचा पदार्थ तू तुझ्या हाताने मला दे. तुझ्या हाताचा स्पर्श झाल्यावर तुझ्या हाताची चव त्या पदार्थाला येईलच ना. मग तुझ्या हाताची गोडी किती आहे हेही मला कळेलच ना. तेव्हा तुझ्या आवडीचा आणि तुझ्या हाताच्या गोडीचा एखादा पदार्थ मला तू ताबडतोब दे बघू.''

कृष्णाच्या बोलण्याने राधेला हसू आले. तिच्या हातातील ताटात असलेल्या पदार्थांकडे तिने क्षणभरच पाहिले आणि त्यातील बेसनाचा लाडू तिने एकदम उचलून कृष्णाला देऊ केला. कृष्णानेही राधेकडे हसून पाहिले आणि आपले मुख थोडेसे उघडून त्याने राधेसमोर केले. आता मात्र कृष्णाच्या नजरेतील मिश्किल भाव राधेने बरोबर ओळखले आणि तिनेही तेवढ्याच मिश्किलतेने तो बेसनाचा लाडू कृष्णाच्या मुखात भरवला. कृष्णाने आपले नेत्र मिटून घेतले आणि थोडा वेळ त्या लाडवाच्या रसास्वादात तो पूर्णपणे रमून गेला. त्याने मिटलेले नेत्र पुन्हा उघडले आणि टाळ्या पिटीत व लाडवाने फुगलेल्या गालांनी शब्दांचे अर्धोच्चार करीत कृष्ण म्हणू लागला, ''छान, छान. फारच छान! गोड, गोड, फारच गोड! लाडू करणाऱ्याचे हात गोड, लाडू देणाऱ्याचे हात तर त्याहूनही गोड आणि लाडू खाणाऱ्याचे तोंड तर सर्वात गोड!''

कृष्णाच्या या बोलण्याने वातावरण पुन्हा एकदा मोकळ्या हास्याने भरून गेले. राधा व कृष्ण मात्र एकमेकांकडे बराच वेळ पहातच राहिले. त्या नजरेमध्ये मिश्किल हास्य तर होतेच. परंतु एक वेगळ्याच प्रकारचा आपलेपणा त्यांच्या नेत्रांतून ओसंडत होता. दोघांची नजर एकमेकांवर खिळली असतानाच अनयाने राधेला हाक मारून परत घरी चलण्याविषयी स्मरण दिले. राधा भानावर आली आणि सर्वांचा निरोप घेऊन घरी निघाली. अनय व राधा यांना निरोप देण्यासाठी नंद व यशोदा यांच्या बरोबर कृष्णही वाड्याच्या दरवाजापर्यंत आला. वळून पहाणाऱ्या राधेला कृष्णाने विचारले, ''राधे, तू माझ्यावर रागावली तर नाहीस ना? माझ्या चेष्टेचा तुला राग तर आला नाही ना?''

राधेने हसून केवळ नकारार्थी मान हलवली. पण ती बोलली काहीच नाही. म्हणून कृष्ण पुन्हा राधेला म्हणाला, ''तुला येथे रोज यायला आवडेल का? मला भेटायला येशील का? माझी मैत्री तुला पसंत पडेल का?'' का कोण जाणे, पण कृष्णाच्या बोलण्यात थोडीशी व्याकुळता आहे असे राधेला जाणवले. म्हणून लागलीच मोकळेपणाने तोंडभर हसून राधा कृष्णाला म्हणाली, ''अरे कृष्णा, मला येथे रोज यायला आवडेल आणि तुझ्याशी खेळायलाही आवडेल.'' त्यावर कृष्ण हसून म्हणाला, ''नुसते आवडेल की अगदी आवडेल?'' राधा पुन्हा तोंडभरून हसली व म्हणाली, ''मला यायला अगदी आवडेल. अगदी नक्की आवडेल आणि मी अगदी रोज यांच्याबरोबर तुला भेटायला येईन. तुला माझा विश्वास वाटतोय ना?'' कृष्ण उत्स्फूर्तपणे म्हणाला, ''अगं राधे, मला तुझी अगदी खात्री वाटते.'' त्यातून उठलेल्या हास्यकल्लोळात सर्वचजण सामील झाले. अनय व राधा आपल्या मार्गाने निघाले. कृष्ण मात्र तेथेच उभा राहून वारंवार वळून पहाणाऱ्या राधेला हात उंचावून निरोप देत होता आणि उद्या पुन्हा येण्यासाठी खुणावत होता.

दुसऱ्या दिवसापासून राधेचे जे नंदाच्या राजवाड्यात रोज येणे सुरू झाले ते झालेच. आल्यावर जरी आधी ती यशोदेला भेटत असे, तरी कृष्णाला कधी भेटते असेच तिला झालेले असे. कृष्णही तिचीच वाट पहात असे. राधेला जास्त बोलायलाही वेळ नसे. मग खेळण्याचे तर नावच नको. कारण घरी तिची सासू म्हाळसा वाट पहात असे. किती तरी घरकामे तिला घरी जाऊन करायची असत. पण थोडक्या वेळात जेवढे कृष्णाला भेटता येईल तेवढे राधा भेटून घेत असे. पण तेवढ्याने कृष्णाचे समाधान काही होत नसे. राधेने अजून काही काळ थांबावे असा त्याचा हट्ट असे. पण राधेला तसे थांबणे शक्य झाले नाही की कृष्ण रुसून बसे. मग राधाही रुसल्याचा आविर्भाव करी आणि कृष्णाला करंगळीने 'कट्टीची' खूण दाखवून त्याच्याशी अबोला धरी. राधेचा अबोला कृष्णाला मुळीच सहन होत नसे. मग तो राधेला दोन बोटांच्या खुणेने 'बट्टी' दाखवून तिच्याशी बोलणे चालूच ठेवी. राधा म्हणे, ''माझी तुझ्याशी कट्टी आहे. मी तुझ्याशी बोलणार नाही.'' त्यावर कृष्ण म्हणे, ''पण माझी तुझ्याशी 'बट्टी' आहे, त्यामुळे मी तुझ्याशी बोलतच रहाणार.'' शेवटी न राहवून राधेला आपला धरलेला अबोला सोडावा लागे. मग तीही हसून कृष्णाला दोन बोटांची खूण दाखवून तिचीही बट्टी झाल्याचे सांगे. अशा अनेक प्रसंगातून राधा व कृष्ण यांची अगदी गट्टी जमून राहिली.

राधा कृष्णापेक्षा वयाने जरी थोडी मोठी होती तरी दिसायला मात्र लहान होती. तर कृष्ण वयाने जरी लहान असला तरी दिसायला मोठा होता. त्यामुळे त्या दोघांची जोडी मात्र अगदी शोभून दिसत असे. अशी राधा व कृष्ण यांची जमलेली जोडी हळुहळू सर्वांच्या लक्षात येऊ लागली. अनेकांच्या डोळ्यात त्यांची जोडली भरली, तर काही जणांच्या डोळ्यात ती जोडी खुपली सुद्धा! राधा व कृष्ण एकमेकांची चेष्टाही अगदी प्रेमाच्या मोकळेपणाने करीत. राधेच्या नाकातील चमकीकडे बोट करून कृष्ण राधेला म्हणे, ''ठेंगणी ठुसकी आणि नाकात चमकी'', तर राधा कृष्णाच्या काळ्या रंगाला पाहून त्याला ''सावळ्या, ए सावळ्या'' अशी हाक मारीत असे. बोलताना 'अरे वा!', 'अस्स झालं का?', 'नाही, तसं नाही' असे वारंवार म्हणण्याची राधेला सवय होती. कृष्ण मुद्दामहूनच ते शब्द उच्चारून राधेला चिडवीत असे. मग राधाही चिडल्यासारखे मुद्दाम करी आणि त्यावर ते उभयता मोठ्याने हसत असत.

असे बरेच दिवस गेले आणि अचानक एक दिवस राधेचे येणे घडले नाही. कृष्ण तिची वाट पाहून पाहून थकला. तो दिवस गेला, दुसरा दिवस गेला आणि कृष्णाचे राधेसाठी वाट पहाणे तरीही सुरूच होते. 'राधा आता येईल, थोड्या वेळाने येईल' असे मनाशी म्हणत कृष्ण राधेच्या वाटेकडे रोजच नेत्र लावून बसलेला असे. परंतु बरेच दिवस राधा काही आलीच नाही. कृष्णाच्या मनाची अस्वस्थता त्याच्या नित्याच्या सहवासातील मंडळींच्या लक्षात जरूर आली, पण त्याचे कारण मात्र त्यांना कळले नाही. अनयही आला नाही म्हणून कृष्ण त्यालाही विचारू शकला नाही. असेच आणखीन चार-पाच दिवस गेले आणि एक दिवस राधा अचानकपणे आली. बरोबर आणलेली दुधाची चरवी तिने यशोदेच्या दासींच्या स्वाधीन केली आणि राधेचे डोळे कृष्णाला घरभर शोधू लागले. राधा आल्याची बातमी कृष्णालाही कळली. परंतु तो मुद्दामच वाड्याच्या मागील बाजूला जाऊन स्वस्थ बसून राहिला. राधेने अनेकांकडे कृष्णासंबंधी चौकशी केली. परंतु कोणीच निश्चितपणे काही सांगेना. शेवटी तिने यशोदामातेला विचारले. यशोदा म्हणाली, ''अगं राधे, कृष्ण जेव्हा वाड्यात कोठेच नसतो ना, तेव्हा तो एकाच जागी जाऊन बसलेला असतो. वाड्याच्या मागील बाजूला असलेल्या तुळशीवृंदावनाजवळच तो तुला नक्कीच सापडेल. कारण बऱ्याचदा तो तेथे तासन् तास एकटाच बसून राहिलेला असतो. ती जागा त्याची अत्यंत आवडती आहे.''

यशोदेचे बोलणे ऐकल्याबरोबर राधा तुळशी वृंदावनाच्या दिशेने जवळ जवळ धावतच गेली, तर कृष्ण तेथे एकटाच बसलेला होता. राधेने कृष्णाला हाक मारून ती आल्याचे सांगितले. पण एक नाही नि दोन नाही. कृष्ण तिच्याकडे वळून बघायला तयारच नव्हता. तेव्हा राधाच त्याच्या समोर जाऊन उभी राहिली. पण तरीही कृष्णाचा राग त्याच्या मुखावर दिसतच होता.

कृष्णाचा राग पाहून राधेलाही मग राग आला आणि तीही वळून तेथून जायला निघाली. तेवढ्यात कृष्ण जागचा उठून उभा राहिला. त्याने राधेचा हात धरून तिला थांबवले आणि तिला म्हणाला, ''राधे, असे गं काय? मला न भेटताच निघालीस ना? मी तुझी दररोज वाट बघतोय आणि तू तर आलीच नाहीस. 'मला रोज यायला अगदी आवडेल' असे तूच म्हणाली होतीस ना? मग एवढे दिवस का आली नाहीस? बरे, तुझे येणे नाही आणि काही निरोपही नाही. मी समजायचे तरी काय? आणि तुझी वाट तरी किती पहायची? तुला खरेच मला भेटावेसे वाटत नव्हते काय?''

कृष्णाचे बोलणे ऐकून राधा थबकली. तिने कृष्णाच्या हातातील आपला हात सोडवून घेतला आणि कृष्णाकडे वळून पाहिले. राधेचे नेत्र अश्रूंनी पूर्ण डबडबलेले होते. ते पहाताच कृष्णाचे मन द्रवले. तो काही राधेला म्हणण्याच्या आत राधाच कृष्णाशी बोलू लागली.

''अरे कृष्णा, मला जर तुला भेटावेसे वाटत नसते तर एवढा खटाटोप करून आज तुझ्या भेटीसाठी अशी वेड्यासारखी धावत आलेच नसते. पण माझ्याही काही अडचणी असतीलच की नाही? त्या तरी विचारून व समजून घेशील की नाही? अरे, मी एक सासुरवाशीण आहे हे विसरू नकोस. मला घरी किती कामे असतात हे तरी तुला ठाऊक

आहे का? यजमानांची सेवा व सासूबाईंची कामे करण्यात अगदी माझा सर्व दिवस कसा जातो हे अगदी माझे मलाच समजत नाही. माझा मला सुद्धा वेळ मिळत नाही. त्यातून माझे यजमान आहेत अगदी लहरी. त्यांच्या लहरी सांभाळता सांभाळता माझी एवढी धावपळ होते म्हणून सांगू, की मला तू ते विचारूच नकोस. सासूबाई सुद्धा अगदी खाष्टच आहेत. त्यांच्या मनाची तंत्रे सांभाळता सांभाळता माझा जीव अगदी मेटाकुटीला येतो. कितीही केले तरी त्यांच्या मनाला समाधान असे कधी नसतेच. त्यांच्या मनाला काही मानवतच नाही. काहीही केले तरी त्यांचे तोंड नेहमी वाकडे ते वाकडेच असते.

तेव्हा या सर्व अडचणींतून मार्ग काढून आज येथे दूध पोचविण्याचे अगदी निमित्त काढून तुला भेटण्यासाठी आले ते कुठेच गेले. तुला तर येथे काहीच अडचणी नाहीत. चांगले खायचे, प्यायचे आणि आरामात माझी वाट पहात रहायचे. त्यातूनही मी आले तरी माझ्या येण्याचे कौतुक करायचे राहिले बाजूलाच, उलट अगदी माझ्यावरच राग धरून बसायचे. कृष्णा, तुला काय वाटते, रागावता फक्त तुलाच येते? माझा राग अजून तू पाहिलेलाच नाहीस. मी जर खरीच रागावले ना, तर मग अगदी तुलाही कठीण जाईल हे लक्षात ठेव. कारण एकदा का माझ्या रागाचा पारा चढला की मग तो उतरायला फारच वेळ लागतो. तेवढा वेळ मी कोणाशी म्हणजे कोणाशीही, अगदी माझ्याशीही बोलत नाही. अरे, जेवढी मी शांत व साधी दिसते ना, तेवढी मी अगदी सरळ व सीधी नाही हे मी तुला अगदी आधीच सांगून ठेवते.''

बोलता बोलता राधेला अधिकच राग येत होता आणि राग येता येता नेत्रांतून पाणीही जास्तच वहात होते. वाईट वाटणे व रागावणे या दोन्ही भावांचे संमिश्रण राधेच्या मुखावर झाल्यामुळे तिचा चेहराही अत्यंत लालबुंद झाला होता. तिच्या त्या रूपाकडे पाहून कृष्णही अवाक झाला आणि तिच्याकडे पहातच राहिला. तिचे दोन्ही हात प्रेमाने आपल्या हातात घेत कृष्ण तिच्याशी बोलू लागला.

''राधे, तुझा राग बघून मला एवढे बरे वाटले म्हणून सांगू. तुला व तुझ्या रागाला दोघांना आपण मानले बुवा! तुझ्या रागापुढे माझा राग काहीच नाही. कारण तुझा राग खराच होता, तर माझा राग हा लटका होता. खऱ्यापुढे लटक्याचा काय प्रभाव पडणार आणि कसा निभाव लागणार? कधी तरी शक्य आहे का ते? कधीच नाही.

पण राधे, तुला एक गोष्ट मात्र मी अगदी खरी सांगतो, तुझ्या रागावण्याचा मात्र मला अजिबात राग आला नाही. कारण खरे तर तू माझ्यावर रागावलीच नव्हतीस. तू रागावली होतीस ती तुझ्या नवऱ्यावर, तुझ्या सासूवर आणि तुझ्या स्वतःवर व तुझ्या असहाय्यतेवर, खरे की नाही? तो तुझा सर्व राग माझ्यावर निघाला एवढेच! कारण कोणीही आपल्या हक्काच्या व्यक्तिवरच रागावतो. तो रागावण्याचा प्रेमाचा हक्क तू माझ्यावर गाजवलास याचा मात्र मला अत्यंत आनंदच झाला. कारण यावरून तू मला तुझ्या प्रेमाची, हक्काची व्यक्ती समजतेस हेच सिद्ध झाले. आता माझ्यावर रागावण्याचा हक्क तू घेतलास. मग माझ्या प्रेमाच्या हक्काचे काय? एवढ्या दिवसांनंतर भेटायला आली आहेस तर माझ्यासाठी रागाशिवाय दुसरे काही आणले आहेस की नाही? रागाचा एवढा गडगडाट झाल्यानंतर आता प्रेमाच्या काही जलधारा बरसल्या तर माझ्यावर आपली मेहेरबानीच होणार आहे.''

बोलता बोलता कृष्णाने आपले दोन्ही हात जोडले आणि राधेपुढे मान लववून उभा राहिला. कृष्णाचे ते प्रेमाचे बोलणे ऐकून व त्याचा एकंदरीत आविर्भाव पाहून राधा मात्र अगदी मनापासून व अत्यंत मोकळेपणाने हसू लागली आणि बराच वेळ हसतच राहिली. हसत हसतच तिने कृष्णाचे जोडलेले दोन्ही हात आपल्या हातात घेतले. कृष्णाचे मुख हनुवटीला धरून तिने वर केले आणि कृष्णाकडे अनिमिष नेत्रांनी राधा किती तरी वेळ पहातच राहिली. कृष्णाच्या नजरेतील निरागस व मिश्किल भावाच्याही मुळाशी असलेला आत्यंतिक आपलेपणाचा प्रेमभाव राधेने पाहिला मात्र, तिचे भानच हरपल्यासारखे झाले. तरीही अस्पष्ट शब्दात जणू स्वतःशीच बोलल्यासारखे ती बोलू लागली.

''ए कृष्णा, तुझ्यावर रागावणे किंवा तुझा राग धरणे हे अगदी कोणालाही शक्य नाही. मला तर मुळीच शक्य होणार नाही. मी तुझ्यावर रागावले नव्हते, तर नवरा व सासू यांच्यावरील माझा राग तुझ्यावर निघत होता हे मात्र अगदी खरे आहे. त्यात माझी तरी काय चूक आहे बरे? तूच सांग ना. अरे, घरी कोणी मला समजून घेत नाही म्हणून राग येतो तो अगदी दाबून ठेवावा लागतो. आता तू तरी मला निश्चितपणे समजून घेशील अशी मनाशी पक्की खात्री बाळगून तुझ्याकडे यावे, तर येथे तू रागाने अगदी फुगून बसला आहेस. मग मला राग येणे अगदी साहजिकच आहे की नाही? कारण घरी बोलण्याची अगदी सोय नाही, तर येथे तू सोयीचे बोलणे करायला अगदी तयार नाहीस. म्हणून मला राग आलाही आणि तो मी मोकळेपणाने प्रगट केलाही.

परंतु मग रागावताना माझ्या डोळ्यात पाणी का बरे होते? अरे, तुझ्यावरील आपलेपणामुळेच ना? तुझ्या पहिल्या भेटीतच मला जो तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी आपलेपणा जाणवला आहे ना, तो मी अगदी कधीच विसरणे शक्य नाही. तुझा तो आपलेपणा व तुझे ते प्रेम मला अगदी नित्यच स्मरत असते. माझे मी हे अगदी भाग्यच समजते, की लग्न होऊन मी या गोकुळात आले आणि तुझी व माझी भेटी झाली. मला तर अगदी असेच वाटते, की आपला काहीतरी पूर्वजन्मीचा ऋणानुबंध असावा. अगदी या जन्मीसुद्धा आपले काहीतरी खास नातेसंबंध असावेत अशी माझी अगदी खात्री आहे. नाही तर, आपण एकमेकांच्या रागालोभाची एवढी पर्वा केली नसती. तेव्हा मी तुला वचन देते की या पुढे मी तुझ्यावर कधीच रागावणार नाही आणि तूही मला तसेच वचन दे, की तूही यापुढे माझ्यावर कधीच अगदी लटकेपणाने सुद्धा रागावणार नाहीस.''

राधेच्या बोलण्याने मनातून अत्यंत संतुष्ट झालेला कृष्ण चेष्टेचा सूर मात्र तसाच कायम ठेवून राधेला म्हणाला, ''नाही, नाही, मुळीच नाही. अगं राधे, असे वचन मात्र मी तुला कधीच देणार नाही आणि तुझ्याकडून घेणारही नाही. अगं, आपण जर रागावलो नाही तर मग सर्व मजाच निघून जाईल की! मी तर तुला स्पष्टपणेच सांगतो, की मला राग आला की मी अगदी मोकळेपणाने रागावणार आणि तूही तुला राग आला की अगदी मोकळेपणाने रागवायचेस, समजले ना? उगाच लपवाछपवी व खोटेपणा हवा कशाला? रागावल्याशिवाय आपल्या मनाची व्यथा प्रगट तरी कशी होणार आणि एकमेकांना कळणार तरी कशी? स्वार्थापोटी रागावणे चूकच आहे. परंतु आपल्या मनाची व्यथा, कळवळा किंवा व्याकुळता जर एखादे

वेळेस रागाच्या रूपात व्यक्त झाली ना, तर ते रागावणे अजिबात चुकीचे ठरत नाही. अगं राधे, मी तुला सांगतो, अशा रागाने प्रेमच अधिक वाढते. मी आत्ताच्याच स्वानुभवाने सांगतो, की अशा रागाने स्मरणाची तीव्रता अधिकच वाढते. प्रेमाची भूक व तहान एवढी वाढते की बाकी सर्व तहान भूक हरवून जाते. तेव्हा अशा रागावण्यावर मुळीच बंदी आणता कामा नये.

आणि राधे, खरे सांगतो, रागावल्यावर तर तू एवढी सुरेख दिसत होतीस, की विचारायची अगदी सोयच नाही. काय तुझे ते स्फुंदून स्फुंदून रडणे? बाकी तुझे रडणे सुद्धा अगदी ताला सुरात होते. बस्स्! सारखे ऐकतच रहावे असे वाटत होते. रागाने गाल तर अगदी डाळिंबासारखे लाली लाल झाले होते. डोळ्यातून सतत वाहणाऱ्या अश्रुधारांमुळे तुझ्या रागात सुद्धा ताप दिसता एक प्रकारचा गारवाच जाणवत होता. त्यापेक्षाही तुझे आधीच जरा मोठे असलेले नाक रागाने जेव्हा तू फुगवत होतीस ना, तेव्हा तर अगदी तुझ्याकडे बघतच रहावे सारखे वाटत होते आणि मी तर तसा बघतही राहिलोच होतो. तेव्हा राधे, यापुढे न रागावण्याचे वगैरे तू कृपा करून ठरवूच नकोस''

असे म्हणत म्हणतच कृष्णाने राधेचे नाक आपल्या हाताने धरून थोडेसे ओढल्यासारखे केले आणि तो मोठमोठ्याने हसू लागला. राधेनेही कृष्णाच्या नाकाला धरल्यासारखे केले आणि हसत हसत तीही कृष्णाच्या गमतीमध्ये सामील झाली.

आपले हसणे थोडेसे थांबवून राधा म्हणाली, ''उगाच पुन्हा माझ्या रागाची काहीतरी चेष्टा करून अगदी मला राग आणण्याचा प्रयत्न करू नकोस. न रागावण्याचा, निदान आता तरी मी अगदी निश्चयच केला आहे. त्या माझ्या निश्चयात व्यत्यय आणण्याचा कृष्णा, तू मुळीच प्रयत्न करू नकोस. त्यामध्ये तुला मुळीच यश येणार नाही हे मी तुला अगदी निक्षून सांगते. आणि एवढे काही माझे नाक मोठे नाही. आहे ते अगदी व्यवस्थित आहे. तुझे नाक अगदी छाऽऽन चाफेकळी आहे ना, मग झाले तर! तुला माझे नाक आवडत नसेल तर त्याच्याकडे बघू नकोस ना. तुला कोणी बघण्याची सक्ती केली आहे? माणसाने आपल्याला आवडेल तेच बघावे व तेच घ्यावे आणि जे नावडेल ते सोडून द्यावे. त्याच्याकडे लक्षच देऊ नये ना. म्हणजे मग काही प्रश्नच निर्माण होणार नाही.''

राधेचे बोलणे ऐकून घेईल तर मग तो कृष्ण कसला? राधेच्या बोलण्यावर हसून पुन्हा कृष्ण म्हणाला, ''अगं राधे, पण मला तुझे नाक आवडत नाही असे कुठे मी म्हटले? मी ते नाक मोठे आहे असे म्हणालो आणि मला तर मोठे नाक अतिशय आवडते. तुला तर ते मोठे नाक अगदी शोभूनच दिसते. आणि रागावल्यावर तू माझ्याकडे न बघता स्वतःच्याच नाकाच्या शेंड्याकडे जेव्हा बघत असतेस ना, तेव्हा तर फारच छान दिसतेस. अगदी तुझी दृष्ट त्या वेळेस काढावी असेच वाटते. मला माझे नाक मात्र अजिबात आवडत नाही. अर्थात मला माझे नाक मुळीच दिसत नाही म्हणून बरे आहे. नाहीतर माझी मोठीच पंचाईत झाली असती.

राधे, ते जाऊ दे. मगाच पासून एका महत्त्वाच्या मुद्याला तू बगल देत आहेस. तू माझ्यासाठी काय पदार्थ आणला आहेस याच्याविषयी काहीच बोलत नाही आहेस. हे तू जाणून बुजून तर करत नाहीस ना? कारण एक तर तू काही आणलेच नसशील किंवा आणले असशील तर तो पदार्थ तू न करता तुझ्या सासूबाईंनी केलेला असणार, होय ना? ते काहीही असो आणि कोणीही केलेला असो. मला तो पदार्थ देशील की नाही? कारण एवढ्या रागावण्या, रुसण्याच्या कार्यक्रमानंतर आता मला फारच भूक लागलेली आहे. तेव्हा काय असेल ते लवकर बाहेर काढ पाहू आणि काही आणले नसलेस तर तसे मला सांग. पण मला खात्री आहे की तू माझ्या आवडीचा बेसनाचा लाडू माझ्यासाठी आणला आहेस. माझी भूक आता अनावर होत आहे. अगं, प्रेमाने मन भरून रहाते हे खरे आहे. पण त्याने कुणाचे पोट भरत नाही. त्यासाठी काहीतरी प्रत्यक्षच खावयास हसे. हो की नाही?''

त्यावर राधा हसून म्हणाली, ''ए कृष्णा, जेव्हा जेव्हा तू 'हो की नाही' असा प्रश्न विचारतोस ना, तेव्हा त्याचे उत्तर नेहमी 'हो' असेच असते. हो की नाही? तेव्हा प्रत्यक्ष खाण्यासाठी सुद्धा मी तुझ्याकरिता अगदी तुझ्या आवडीचा असा बेसनाचा लाडूच आणलेला आहे आणि आज तो मी अगदी स्वतः माझ्या हाताने केलेला आहे. गेले काही दिवस जेव्हा मी येथे येऊ शकले नाही, तेव्हा सासूबाईंकडून लाडू कसा करायचा हे मी अगदी शिकून घेत होते. आज प्रथमच मी एकटीने अगदी माझ्या हाताने हा लाडू बनविला आहे आणि अगदी पहिल्यांदा तुलाच तो देत आहे. आता मला सांग लाडवाची गोडी अधिक आहे, की माझ्या हाताची गोडी अधिक आहे? खाणाऱ्याचे तोंड मात्र अगदी भरपूर गोड होणार आहे एवढे निश्चित. ए कृष्णा, पण मला तू एक गोष्ट सांग, की तुलाही अगदी माझ्यासारखाच बेसनाचा लाडूच कसा काय आवडतो? आणि मी तो घेऊन आले आहे याची तुला अगदी खात्री कशी वाटत होती?''

त्यावर मिश्किलपणे हसत कृष्ण म्हणाला, ''अगं राधे, तुझ्यासारखाच बेसनाचा लाडू आहे म्हणून तर मला तो एवढा आवडतो. आधी मला तो लाडू आवडत होताच. परंतु तुझ्या आवडीचा म्हणून त्या दिवशी तू मला माझ्याही आवडीचा असलेला बेसनाचा लाडू दिलास. तेव्हा आपली आवड एकच असल्याचा मला आनंद झाला. आता तर तुझ्यात व बेसनाच्या लाडवात असलेले साम्य बघून मला तो लाडू अधिकच आवडू लागला. राधे, काय आहे, तुझी उंची कमी आणि त्या मानाने रुंदी थोडी जास्त आहे. त्यामुळे तू अगदी लाडवासारखी गोलच दिसतेस. तुझा चेहराही गोलसरच आहे. मुख्य म्हणजे, तुझा गौरवर्ण हा बेसनाच्या लाडवासारखा पिवळा धमक आणि लाडवातील तुपाप्रमाणे अगदी तुकतुकीतही आहे. त्यामुळे होते काय, की तुझे स्मरण झाले की बेसनाचा लाडू आठवतो आणि बेसनाचा लाडू पाहिला की एकदम तुझीच आठवण येते. अशी ही आमची बेसनाच्या लाडवाची गंमत, आहे की नाही?

आता तू बेसनाचाच लाडू आणला असणार हे मी कसे ओळखले म्हणशील, तर त्याचे उत्तर अगदी सोपे आहे. तुझ्या हातचा बेसनाचा लाडू खाल्ल्यावर मला झालेला आनंद तू पाहिला होतास. तो तुझ्या लक्षात असणार आणि म्हणून तू बेसनाचाच लाडू आणणार याची मला पक्की खात्री होती. पण राधे, या लाडवाविषयी नुसतेच बोलायचे आहे, की तो प्रत्यक्ष

खायचाही आहे? आणि केव्हा खायचा आहे? आज तू प्रथमच लाडू आपल्या हाताने केलेला आहेस म्हणतेस आणि त्याचा पहिला प्रयोग माझ्यावरच करणार आहेस तर. हरकत नाही. बघू या तरी आज माझ्या नशिबात काय वाढून ठेवले आहे ते? त्याला हसत हसत सामोरे जायला मी अगदी तयार आहे.''

कृष्णाचे बोलणे ऐकता ऐकता राधेची हसता हसता अगदी मुरकुंडी वळत होती. कृष्णाकडे लटक्या रागाने पहात पहात राधेने बरोबर आणून खाली ठेवलेला डबा पुन्हा हातात घेतला आणि त्यातील एक लाडू बाहेर काढून कृष्णापुढे धरला. कृष्णाने आपले मुख उघडले आणि तो राधेकडे बघत राहिला. राधेनेही हसून तो लाडू कृष्णाच्या मुखात भरवला असता कृष्णाने लाडवाचा अर्धा भाग करून आपल्या हातात घेतला आणि राधेलाही, तिला काही कळायच्या आत, तेवढ्याच प्रेमाने भरवला. राधा चकित होऊन पहात असतानाच कृष्णाने राधेच्या हातातील सर्व डबाच आपल्या हातात ओढून घेतला आणि राजवाड्यात धूम ठोकली.''

कृष्ण व राधा यांच्यातील गमतीदार प्रसंगाचे वर्णन ऐकताना लक्ष्मीचीही हसताना अगदी पुरेवाट होत होती. तरीही तो प्रसंग केवळ हसण्यावारी नेण्यासाठी तिचे मन तयार होत नव्हते. कारण हे प्रसंग ज्या प्रेमातून घडले, ते कृष्णाचे प्रेम तिच्या मनाला जाणवत होते आणि ते प्रेमच महत्त्वाचे आहे हे ती जाणून होती. त्यामुळे ते कृष्णप्रेमाचे सूत्रच अधिक विस्ताराने प्रगट व्हावे या हेतूने ती नारदाशी हसत हसतच बोलू लागली.

''हे नारदा, तुझी सुद्धा अगदी कमालच आहे. मुळात सगुण भक्तिच्या रूपाने सगुण प्रेमच फुललेले असते. त्यातूनही त्या प्रेमाचे वर्णन तू करायला लागलास, की ते प्रेम अधिक व अनेक अंगाने फुलते आणि म्हणूनच त्या प्रसंगाचे तुझे वर्णनही अधिकाधिक खुलत रहाते. तुझ्या मुखातून राधेच्या भक्तिभावाचे आणि राधा व कृष्ण ऐक्य कसे पावले याचे वर्णन ऐकण्यास मी अतिशय आतुर होते व आहेही. परंतु त्याची सुरुवात मात्र माझ्या अपेक्षेपेक्षा वेगळी, पण छानच झाली. राधा व कृष्ण यांचे प्रेम जुळण्याचे मूळ कृष्णाची चेष्टा व राधेचा राग यामध्ये होते हे ऐकून मात्र मला नवलच वाटले आणि त्यांच्या प्रेमाची सुरुवात अशा प्रकारे झाली याची तर मला मोठी गंमतच वाटत आहे.''

लक्ष्मीचे बोलणे पूर्ण होण्याच्या आतच नारद हसून म्हणाला, ''अगं लक्ष्मी, हीच तर त्या प्रेमाची गंमत आहे. ईश्वराच्या सगुण प्रेमाची सुरुवात केव्हा, कधी व कशातून होईल याचा काहीच नियम नाही. चेष्टेतून, गमतीतून, रागातून, आर्ततेतून, सहवासातून अगदी कशाकशातूनही हे सगुण प्रेम निर्माण होऊ शकते. एवढेच काय, मुळात सांसारिक प्रेमातूनही हे सगुण प्रेम निर्माण होऊ शकते.

एखाद्याचा स्वभावच प्रेमळ असतो. तो सर्वांशीच प्रेमाच्या मोकळेपणाने वागत असतो. भेटलेल्यांची आस्थेने चौकशी करणे, त्यांचे सुखदुःख जाणून घेणे, त्यांच्याशी बोलून त्यांचे दुःख हलके करणे, त्यांना प्रयत्नपूर्वक सुखवणे वगैरे गोष्टी अशा व्यक्तींकडून त्यांच्या प्रेमळ स्वभावानुसार सहज घडत असतात. अशा व्यक्तींचे इतरांकडून कौतुकही होते आणि

त्या व्यक्ती सर्वांना हव्याहव्याशा वाटतात.  कारण जेथे जातील तेथे त्या व्यक्ती सर्वांच्यात मिसळतात व रमतातही.  अशा व्यक्ती जर कोणा महात्म्यांच्या सहवासात भाग्याने आल्या, तर त्या महात्म्यांच्या ईश्वरी प्रेमातही अगदी सहजपणे व पटकन रमतात.  परंतु रमता रमता व त्या महात्म्यांच्या प्रेमातील  निरपेक्षता, निर्लोभता, निर्मळता आणि मुख्य म्हणजे असाधारण प्रेमळता हे ईश्वरी प्रेमाचे गुण जर त्यांच्या लक्षात आले, तर याच व्यक्ती त्या महात्म्यांच्या ईश्वरी भावाच्या सगुण प्रेमात अधिकाधिक गुंतत रहातात.  त्यामुळे साहजिकच सांसारिक प्रेमातून अधिकाधिक सुटत जातात आणि एक दिवस सांसारिक प्रेमातून पूर्ण मोकळ्या होऊन ईश्वराच्या सगुण प्रेमाचा अनुभव अगदी मोकळेपणाने घेऊ लागतात.

हे लक्ष्मी, ईश्वराच्या सगुण प्रेमाची जरी अशी गंमत असली, तरी प्रेम म्हणजे मात्र काही गंमत नाही.  प्रेमात अनेक गमती जमती जरी होत असल्या तरी प्रेम म्हणजे केवळ गमतीच नाहीत.  तर या प्रेमाच्या गमतीजमतीतून प्रेम जमणे हे मुख्य व महत्त्वाचे आहे.  एकदा का प्रेमाचे निष्ठा, त्याग, प्रामाणिकपणा, सरळपणा, मोकळेपणा व मुख्य म्हणजे समर्पणता हे गुण प्राप्त झाले, की मग त्या प्रेमाचे रूपांतर सहजपणे भक्तिभावात होते आणि मग ऐक्याकडे जाणाऱ्या भक्तिमार्गातील वाटचाल सुलभपणे घडू लागते.  तेव्हा राधा व कृष्ण कसे ऐक्य पावले याचे हे रहस्य आहे.''

*****

# तुझे नि माझे जमेना

''**हे** लक्ष्मी, अशा तऱ्हेने घडलेल्या प्रसंगातून राधा व कृष्ण यांची सुरुवातीला मने जुळली खरी, परंतु त्यांचे एकमेकांशी पूर्ण जुळायला मात्र वेळ लागला आणि त्याला कारण म्हणजे त्या उभयतांचा असलेला भिन्न स्वभाव हेच होय. पण मुळात राधेच्या ठिकाणी कृष्णाविषयीचे प्रेमही एकीएकडे निर्माण झालेले होतेच. त्यामुळे ती कृष्णाला त्या प्रेमाने भेटण्यासाठी वाड्यात नियमितपणे येऊ लागली. परंतु प्रत्यक्ष भेटीत अनेक वेळा त्यांच्या भिन्न स्वभावामुळे त्यांच्यात वाद किंवा भांडणेही होत. त्याचे पर्यवसान राधेच्या रागावण्यात व कृष्णाच्या रुसण्यातही होत असे. परंतु तरीही एकमेकांना भेटल्याशिवाय त्यांना चैनही पडत नसे. 'तुझे नि माझे जमेना, परंतु तुझ्यावाचून करमेना' जणू अशीच मनःस्थिती राधा व कृष्ण या उभयतांची झाली होती.

कृष्णाचा स्वभाव मुळातच अत्यंत मोकळा होता आणि राधेनेही त्याच मोकळेपणाने वागावे अशी त्याची राधेकडून अपेक्षा होती. तसे तो राधेला वारंवार बोलूनही दाखवत असे. परंतु कृष्णासारखे मोकळेपणाने वागणे राधेला काही जमत नसे आणि मग कृष्णाला राधेचा रागच येत असे.

राधेचे म्हणणे असे, ''कृष्णा, तुझा स्वभाव मोकळा आहे आणि म्हणून तू अगदी सहज मोकळेपणाने वागतोस. पण एकतर माझा तसा मूळचा स्वभाव नाही आणि दुसरे म्हणजे आमच्या घरचे वातावरणही अजिबात मोकळे नाही. त्यामुळे मला तेवढे मोकळेपणाने वागणे अगदी शक्य होत नाही. आणखी एक अगदी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तू नंदराजाचा मुलगा आहेस. तेव्हा तुझे आमच्याशी मोकळेपणाने वागणे तुला अगदी शोभून दिसते. आम्हीही तसे तुझ्याशी अगदी मोकळेपणाने वागलो तर दिसायला ते बरे दिसणार नाही आणि नंद व यशोदा किंवा इतरांनाही ते अगदी आवडणार नाही. तेव्हा कृष्णा, तू तुझ्या स्वभावाने वाग व मला माझ्या स्वभावाने वागू दे ना. मी पण अगदी तुझ्यासारखेच वागले पाहिजे असा तुझा हट्ट का?''

त्यावर कृष्ण लागलीच म्हणत असे, ''वा राधे, हे चांगले आहे. हट्ट तू करते आहेस की मी करतो आहे? मोकळेपणाने वागायचे हा माझा हट्ट नसून, मोकळेपणाने वागायचे नाही असा हट्ट तू करीत आहेस. येथे माझ्या स्वभावाचा आणि तुझ्या स्वभावाचा प्रश्नच येत नाही. कोणाच्याही स्वभावापेक्षा मोकळेपणाने वागणे हे योग्य व म्हणून आवश्यक आहे आणि मोकळेपणा हे तर प्रेमाचे व आपलेपणाचे लक्षण आहे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे, या मोकळेपणात दुसऱ्या कोणाला बरे दिसण्याचा व मानवण्याचा प्रश्न येतोच कुठे? त्याचप्रमाणे मी कोणाचा मुलगा आहे व कुठल्या मोठ्या कुटुंबातील आहे आणि तू कोणाची सून व कुठल्या लहान कुटुंबातील आहेस, या व असल्या गोष्टींना तर येथे अस्तित्वच नाही. हा केवळ तुझ्या व माझ्या संबंधातील विषय आहे. इतरांना त्याविषयी काहीच देणे घेणे असण्याची आवश्यकताच नाही. माझ्या ठिकाणी तुझ्याविषयी प्रेम व आपलेपणा असल्यामुळे मी सहजपणे तुझ्याशी अतिशय मोकळेपणे वागत असतो

आणि त्याच आपलेपणापोटी तूही त्याच मोकळेपणाने माझ्याशी वागावेस अशी माझी साहजिकच तुझ्याकडून अपेक्षा रहाते. अर्थात तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी तेवढे प्रेम व आपलेपणा नसेल तर मात्र माझे काहीच म्हणणे नाही. मग माझे बोलणेच थांबले.''

कृष्णाचे हे शेवटचे वाक्य ऐकले मात्र, राधेच्या डोळ्यात एकदम पाणीच आले आणि ते घळघळा वाहू लागले. कृष्णाच्या ठिकाणी आपल्या त्याच्यावरील प्रेमाविषयी शंका यावी याचेच तिला अत्यंत वाईट वाटले. तिच्या भावना दुखावल्यासारख्या झाल्या आणि वाईट वाटण्याचे रूपांतर रागातच झाले. त्या रागाच्या थोड्याशा तिरीमिरीतच ती कृष्णाला म्हणाली,

''अगदी बरोबर, कृष्णा, तुझे म्हणणे अगदी खरे आहे. माझे तुझ्यावर अजिबात प्रेम नाही. माझ्या ठिकाणी तुझ्याविषयी आपलेपणाही अगदी मुळीच नाही. मग तर झाले? आतापर्यंत मी जे काही तुझ्याशी प्रेमाने वागत आले ना, ते सर्व अगदी खोटे होते. मी तर ते सर्व अगदी नाटकच करीत होते. झाले तुझे समाधान? आता यापुढे मात्र मी अगदी खरेपणाने व अगदी माझ्या स्वभावानुसार वागणार आहे. अगदी बघतच रहा तू आता.''

असे म्हणून डोळ्यात पाणी व चेहऱ्यावर राग घेऊन राधा कृष्णापासून जी तरातरा निघाली ती राजवाड्याच्याही बाहेर पडून तडक स्वतःच्या घरी जाऊन पोहोचली. तिच्याकडे स्तिमित नजरेने पहाणाऱ्या कृष्णाकडे राधेने एकदाही मागे वळून पाहिले नाही. कृष्ण मात्र त्याच्या नेहमीच्याच मिश्किलतेने हसून राधेकडे ती राजवाड्याच्या बाहेर पडेपर्यंत पहात राहिला होता.

घरी गेल्यावरही राधेचा राग बराच काळ तसाच राहिला होता. खरे तर, रागापेक्षा तिला वाईटच अधिक वाटत होते. आपण आपल्या परीने कृष्णाशी प्रेमाने वागत असतानाही कृष्णाला ते पसंतच पडत नाही या विचारानेच राधा अधिक नाराज झालेली होती. ती नाराजीही तिची स्वतःची स्वतःवरचीच जास्त होती हे तिच्याही लक्षात आले होते. परंतु तरीही कृष्णावरचा तिचा राग काही कमी होत नव्हता. त्या रागाच्या भरात ती घरीच बसून राहिली होती. कृष्णही त्याच्या घरी स्वस्थच बसून राहिला होता. एक दोनदा अधून मधून वाड्यावर येणाऱ्या अनयाकडे कृष्णाने राधेविषयी चौकशी केली. परंतु 'राधेला बरे नसावे असे मला वाटते' या पलीकडे अनय काही सांगू शकला नाही. राधेनेही अनयाकडे एकदा दोनदा आडून आडून चौकशी केली की 'कृष्ण काही तिच्या विषयी विचारीत होता का' म्हणून. त्यावर अनय सहजपणे उत्तरला 'नाही बुवा! तसे खास असे काही कृष्ण विचारीत नव्हता.' अनयाचे हे बोलणे ऐकून राधेच्या रागात आणखीनच भर पडली. कारण त्याचा अर्थ इतकाच होता, की कृष्ण अगदी चांगला मजेत होता आणि त्याचे राधेवाचून काहीच अडत नव्हते.

राधेने मनात विचार केला, ''कृष्ण जर माझ्याशिवाय मजेत राहू शकतो, तर मग मी त्याच्यावाचून मजेत का राहू शकणार नाही? अगदी निश्चितच राहू शकेन याची मला अगदी खात्री आहे. तसे मी आता राहीन आणि कृष्णावाचूनही

मला रहाता येते हे मी कृष्णाला दाखवून देईन.  मग मला कृष्णाच्या समोर जाण्याची भीती का वाटावी बरे?  तसे काहीच कारण नाही.  तेव्हा मी नंदाच्या राजवाड्यावर नेहमीप्रमाणे माझ्या कामासाठी म्हणून जात राहीन आणि कृष्णाशी अजिबात बोलणार नाही.  म्हणजेच कृष्णाच्या लक्षात येईल की मी कृष्णावर रागावले आहे म्हणून.''

असा मनाशी पक्का विचार करून राधा एक दिवस नंदाच्या राजवाड्यावर आली.  बरोबर आणलेले दह्यादुधाचे घडे तिने यशोदेच्या स्वाधीन केले आणि ती तेथेच बसून राहिली.  राधा यशोदेकडे कृष्णाविषयी मुद्दामच काहीही चौकशी करीत नव्हती.  परंतु थोड्याच वेळात तिची नजर मात्र सवयीप्रमाणे कृष्णाला सहजपणे शोधू लागली.  परंतु कृष्ण कुठेच दिसेना. राधेलाही थोडेसे अस्वस्थ वाटू लागले.  जसा जसा अधिक वेळ जाऊ लागला तशी तशी राधेचीही अस्वस्थता वाढू लागली. शेवटी न राहवून तिने यशोदेला प्रश्न विचारलाच.  ''यशोदामाई, कृष्ण कुठे दिसत नाही तो?  तो नाही तर कसे सर्व शांत शांत वाटत आहे नाही?  कुठेही गडबड नाही, धावपळ नाही.  हसण्याचा काय, बोलण्याचाही आवाज कुठे येत नाही? कृष्णाची तब्येत तर बरी आहे ना?''

राधेचा प्रश्न ऐकून यशोदेने एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि म्हणाली, ''अगं राधे, या कृष्णाला सध्या काय झाले आहे ते कोणालाच समजत नाही.  त्याचे ना खाण्यापिण्याकडे लक्ष, ना खेळण्याकडे लक्ष.  पूर्वीसारखा हल्ली कोणाशी नीट मोकळेपणाने बोलत नाही, की मोकळेपणाने वागत नाही.  बरे, त्याच्याजवळ जाऊन चौकशी करावी तर 'तसे काही नाही, तसे काहीच नाही' असे पुटपुटत तेथून निघून जातो.  बरे, एकदा गेला की बराच वेळ कुठे तरी गायब होतो.  कुठे जातो नि काय करतो याचा काहीच पत्ता लागत नाही.  एखादे वेळेस मुद्दामहून कोणी त्याच्याशी बोलण्याचा प्रयत्न केला तर थोडे फार बोलतो, पण अगदी जेमतेम.  जेवढ्यास तेवढे.  लगेचच काहीतरी कारण काढून तेथून निघून जातो.  कोणी फारच आग्रह केला तर थोडावेळ व थोडेसे त्यांच्याशी खेळल्यासारखे करतोही.  परंतु खेळ तसाच अर्धवट सोडून मधूनच तेथून जो पसार होतो, तो पुन्हा बराच वेळ उगवतच नाही.

राधे, तू आता आली आहेस ना?  तेव्हा तूच जरा बघ बघू.  तूच कृष्णाशी बोलून त्याच्या या मनःस्थितीचे काही कारण कळते का बघ ना?  तुझ्याशीच कृष्ण काहीतरी मोकळेपणाने बोलेल असे मला वाटते.  कारण तुम्हा दोघांची चांगलीच मैत्री व जवळीकता आहे.  खरे तर, मी तुझीच वाट बघत होते आणि तुला बोलावूनही घेणार होते.  परंतु तुझी तब्येत बरी नाही असे अनयाकडून कळले.  म्हणून मग मी अस्वस्थपणे फक्त तुझ्या येण्याची वाट पहात राहिले.  बरे, अनयही तुला काही बोललेला नसणार.  कारण कृष्णाला काही झाले आहे असे त्याच्याकडे पाहिल्यावर कोणालाही कधी वाटणारच नाही, एवढा कृष्ण बाह्यांगाने सर्व काही अगदी व्यवस्थितपणे करताना दिसतो.  त्यामुळे त्याची मनःस्थिती बरी नाही हे कोणाच्याच लक्षात येत नाही.  आता मी कृष्णाची आईच असल्यामुळे माझ्यापासून मात्र काहीही लपून रहात नाही.  अगदी तुमची दोघांची विशेष मैत्रीही माझ्या लक्षात आलेली आहे.  म्हणूनच मला आता तुझाच भरवसा वाटतो.  तेव्हा राधे, तूच आता

कृष्णाची मनःस्थिती जाणून त्याला त्याच्या पूर्वस्थितीला आण बरे. अगं, कृष्णाचे हसणे नाही, बोलणे नाही, खेळणे नाही तर या वाड्यातील सर्व आनंदच निघून गेल्यासारखे वाटत आहे.''

यशोदेचे व्याकुळतेचे बोलणे ऐकता ऐकता राधेचे नेत्र पूर्णपणे पाणावले. कृष्णाच्या या अवस्थेला नकळतपणे आपणच जबाबदार आहोत याची जाणीव राधेलाही व्याकुळ करती झाली. परंतु मनाने निराश न होता राधा कृष्णाच्या प्रेमाच्या विश्वासाचे बळ घेऊन उभी राहिली आणि कृष्णाला शोधण्यासाठी त्वरित निघाली.

राधेने प्रथम कृष्णाला वाड्यात सर्व ठिकाणी शोधले. परंतु कृष्ण कुठेही दिसला नाही. वाड्यातील प्रत्येकाला तिने विचारले. पण कोणीही त्याला पाहिलेच नव्हते. त्यानंतर राधेने नेहमीच्या जागी म्हणजे वाड्याच्या मागील बाजूच्या तुळशीवृंदावनाच्या परिसरात कृष्णाला शोधण्याचा प्रयत्न केला. परंतु तेथेही कृष्ण आढळला नाही. शेवटी राधा गोकुळामध्ये सर्वत्र कृष्णाला शोधू लागली. पण कृष्ण काही तिला सापडला नाही. 'कृष्णाला पाहिलाय काय?' असे ती दिसेल त्याला विचारू लागली. परंतु सर्वांनी मान हलवून नकारच दिला. आता मात्र राधा केवळ हवालदिलच नाही, तर अत्यंत शोकाकूलही झाली. शेवटी जलदगतीने जवळ जवळ धावतच ती गोकुळाबाहेर असलेल्या वृंदावनात गेली आणि तेथे कृष्णाचा शोध घेऊ लागली. परंतु कृष्णाचा ठावठिकाणा काही लागेना. त्यामुळे अत्यंत निराश होऊन ती एका वृक्षाखाली बसली आणि डोळ्यांतून अश्रू गाळीत स्फुंदून स्फुंदून रडू लागली.

तोच अचानक राधेच्या कानावर मुरलीचे सूर आले आणि ती एका क्षणात उठून उभी राहिली. तो मुरलीचा नाद कृष्णाचा आहे हे समजण्यास तिला क्षणाचाही वेळ लागला नाही. मुरलीच्या त्या सुरात एक प्रकारची असलेली आर्तता तिच्या मनाचा छेद घेऊन तिच्या हृदयाला स्पर्श करती झाली. त्याच आर्तभावाने त्या मुरलीच्या नादाचा वेध घेत त्या दिशेने राधा अक्षरशः धावूच लागली. धावता धावता राधा कुंजवनात जाऊन पोहोचली आणि अचानक थबकली. कारण एका वृक्षाखाली आपल्या उजव्या पायावर डावा पाय ठेवून आणि दोन्ही हातात धरलेली मुरली आपल्या ओठावर ठेवून, त्यातून निघणाऱ्या सुरांत पूर्णपणे धुंद झालेली कृष्णाची पाठमोरी मूर्ती राधेच्या दृष्टिक्षेपात आली. थोडा वेळ राधा तेथेच थांबून राहिली. परंतु तिला धीर धरवेनाच. आपल्या पावलांचा आवाज होऊ न देता, हळुहळू चालत राधा कृष्णासमोर येऊन उभी राहिली आणि कृष्णाकडे प्रेमाश्रूंनी भरलेल्या नेत्रांनी पहातच राहिली.

कृष्णाला त्याच्या त्या भावपूर्ण अवस्थेतून बाहेर आणण्याचा विचारही राधेच्या मनाला स्पर्श करू शकत नव्हता. परंतु राधेला तो दुरावाही सहन होत नव्हता. तिचीही कृष्णाविषयीची भावना अत्यंत उत्कट झाली. तिचाही नाइलाजच झाला आणि न राहवून ती कृष्णाच्या चरणांवर जवळ जवळ कोसळलीच. आपल्या नेत्रांतून वाहणाऱ्या प्रेमजलाने राधेने कृष्णाच्या चरणांना जणू स्नानच घातले. परंतु तरीही कृष्ण मात्र अजूनही देहभान विरहीत अवस्थेतच होता. राधेचा त्याच्या चरणांना झालेला स्पर्श कृष्णाला बाह्यांगाने जाणवत नव्हताच. परंतु राधेचा भाव मात्र निश्चितपणे कृष्णाच्या हृदयाला स्पर्श करीत होता. त्याचे लक्षण म्हणजे कृष्णाकडून प्रगट होणाऱ्या मुरलीचे सूर अधिकाधिक आर्त होऊ लागले. त्या सुरांची

वाढत जाणारी आर्तता राधेला अधिकाधिक बेचैन करू लागली. शेवटी ती आर्तता राधेच्या मनाच्या सहनशक्तीपलीकडे गेली आणि तिने आपल्या हाताने कृष्णाच्या मुखातील मुरली बाजूला केली. मुरलीचा सूर थांबला तरी त्यातून निर्माण झालेला आर्तभाव मात्र सर्व आसमंताला अजूनही व्यापून राहिला होता. असा किती वेळ गेला माहीत नाही. परंतु काही काळाने जेव्हा कृष्णाचे नेत्र सहजपणे उघडले गेले तेव्हा त्याच्यासमोर अश्रूंनी मुख पूर्ण चिंब झालेली अशी राधा त्याच्या चरणांशी गुडघ्यांवर बसलेली होती.

राधेला पहाताच कृष्ण अतिशय आनंदित झाला, पण चकित मात्र झाला नाही. राधेची भावपूर्ण मुद्रा पाहून कृष्णाची अवस्थाही भावपूर्णच झाली. राधेचे जोडलेले हात त्याने आपल्या हातात घेतले आणि आपले ओठ राधेच्या तळहातावर टेकवून कृष्णाने आपले मुख राधेच्या दोन्ही हातांच्या ओंजळीत ठेवले. पुन्हा मुख वर करून राधेच्या भावपूर्ण नेत्रात कृष्ण आपल्या भावपूर्ण नेत्रांनी किती तरी वेळ पहात राहिला. ते नेत्रांसी जुळलेले नेत्र त्या मनासी जुळलेल्या मनाचे प्रतीक होते. कृष्ण राधेला काही विचारायच्या आतच राधेच्या मुखातून हळुवार व अस्पष्ट असे शब्द बाहेर आले, ''ए कृष्णा, मी आलीय, मी आलीय,'' एवढेच शब्द जेमतेम तिच्या ओठातून बाहेर आले मात्र, राधेच्या मनाठायीच्या भावनांचे सर्व बांध पूर्णतः कोसळले आणि अश्रूंचेही बांध पूर्णपणे फुटले. कृष्णाने राधेचे दोन्ही हात धरून तिला उचलून उठवले आणि हृदयाशी धरून आपल्या शेजारी जवळ बसवून घेतले. कृष्णाने आपला डावा हात राधेच्या खांद्याभोवती अतिशय प्रेमाने ठेवला असता राधेने आपले मस्तक कृष्णाच्या खांद्यावर अलगदपणे ठेवले आणि ती मुसमुसून रडू लागली. कृष्ण आपल्या उजव्या हाताने तिचे मस्तक थोपटीत तिला शांत करीत होता. राधेनेही आपल्या उजव्या हाताने कृष्णाचा डावा हात अगदी घट्ट दाबून धरला आणि कृष्णाच्या प्रेमाच्या उबेत शांत होऊन राधा सुखावती झाली.

अशा अवस्थेत बराच वेळ गेल्यानंतर राधा एकदम भानावर आली आणि जागीच उठून उभी राहिली. कृष्णाकडे बघून अत्यंत मोकळेपणाने हसत राधा कृष्णाला म्हणाली, ''ए कृष्णा, ज्या कारणासाठी मी येथे आले होते ते कारण तर मी अगदी विसरूनच गेले. खरे तर, मला यशोदामाईने तुला बोलावून आणण्यासाठी सांगितले होते. म्हणून तर तुला मगापासून मी शोधत होते. किती वेळ आणि किती ठिकाणी तुला शोधले म्हणून सांगू? परंतु तुझा पत्ताच नाही. कितीजणांना 'तू कोठे आहेस' म्हणून विचारले. पण कोणालाही तुझी माहिती नाही. शेवटी तू येथे सापडलास. बरे झाले, आता यशोदामाईकडे चल बघू. ती तुझी केव्हापासूनची वाट पहात आहे.''

राधेचे बोलणे ऐकून तिच्याकडे पाहून मिश्किलतेने हसत कृष्ण म्हणाला, ''अच्छा, असे आहे तर! यशोदामाईने सांगितले म्हणून तू मला शोधीत होतीस वाटते? मला वाटले तू मला तुझ्यासाठीच शोधत होतीस. तुलाच मला भेटावे सारखे वाटत होते असा माझा आपला उगाचच समज, म्हणजे खरे तर गैरसमजच झाला. बरे, जाऊ दे. तू तुझे काम केलेस ना? मला शोधून काढलेस ना? आता यशोदामाईला 'मी कुठे आहे' ते जाऊन सांग. म्हणजे तुझे काम पूर्ण होईल आणि

माई तुला त्याबद्दल काहीतरी बक्षीसही देईल. आता, 'मला जेव्हा जावे सारखे वाटेल तेव्हा मी जाऊन माईला भेटीन' असा तिला माझा निरोप मात्र कळीव म्हणजे झाले. म्हणजे मग तूही घरी जायला मोकळी झालीस.''

कृष्ण जरी हसत हसत बोलत होता तरी त्याच्या बोलण्यातील गंभीरता राधेच्या लक्षात येत होती आणि तीही थोडीशी गंभीरच होत होती. कृष्णाला काय म्हणायचे आहे ते तिच्या लक्षात येत होते आणि त्याचे तिला अधिकच वाईट वाटू लागले. म्हणून थोड्याशा काकुळतीच्या सुरात ती कृष्णाला म्हणाली, ''ए कृष्णा, तू अजूनही माझ्यावर नाराजच आहेस का? तुझा माझ्यावरचा राग अजूनही गेला नाही का? मी येथे तुला शोधत का आले हे खरे तर तुला नक्की माहिती आहे याची मला अगदी खात्री आहे. पण ते तुला माझ्याच मुखातून ऐकायचे आहे. होय ना? अरे कृष्णा, प्रत्येक गोष्ट काही शब्दाने बोलून दाखविता येत नाही आणि तशी जरुरीही नसते. कारण शब्दांच्या पलीकडे जी मनाची भाषा आहे ती ज्याला कळली ना, त्याला दुसऱ्याच्या मनातील सहज समजते. मुद्दामहून वेगळे सांगावे लागत नाही. तू तर माझे मन पूर्णपणे ओळखून आहेस. मग मला उगाचच बोलायला लावून आणखीनच का लाजवतोस?

ए कृष्णा, मला तुझा राग आला होता हे खरे आहे, पण त्याला कारणीभूतही तूच झाला होतास ना? तू काही काही वेळा हसत हसत अगदी गमतीने बोलल्यासारखे करतोस खरे. पण तुझे बोलणे अगदी जिव्हारी लागते. ते ज्याला लागते त्यालाच कळते. आपले चुकते आहे हे लक्षात आलेले असतेच. पण मन मात्र आपली चुकी कबूल करायला तयार होत नाही. म्हणून मग ते मन नाराज होते, रूसते आणि रागावते सुद्धा. पण तो रागही त्या मनाला झेपतच नसतो आणि त्यातून निर्माण झालेला दुरावा तर त्या मनाला मुळीच सहन होत नसतो. हे मी माझ्या आत्ताच्या ताज्या ताज्या अनुभवानेच सांगत आहे. माझ्याही मनाच्या ठिकाणी तुला न भेटल्यामुळे व्याकुळता निर्माण होऊ लागली. व्याकुळतेचे रूपांतर आर्ततेमध्ये झाले आणि मग मनाच्या ठिकाणी रागामुळे आलेला ताठरपणा हळुहळू सैल होऊ लागला. तुझे स्मरण अधिक तीव्रतेने होऊ लागले आणि तुझ्या भेटीची ओढ वाढू लागली. म्हणूनच काहीतरी कामाचे निमित्त करून तुमच्या वाड्यामध्ये आले होते. निदान तुला पहाता येईल, तुझा शब्द कानावर पडेल असे मला वाटले होते. तेवढाच माझ्या मनाला दिलासा मिळाला असता आणि बरे वाटले असते. तुझ्याशी बोलायचे मात्र नाही असे मी अगदी ठरवून आले होते. तू जरी माझ्याशी बोलण्याचा प्रयत्न केला असतास ना, तरी मी मात्र तुझ्याशी अबोलाच धरणार होते. परंतु तू माझ्याशी बोलून, हसून व अगदी माझी चेष्टा करून मला बोलायला भाग पाडलेच असतेस याची मला अगदी खात्री होती.

ए कृष्णा, पण तुला शोधत शोधत मी या कुंजवनात आले आणि तुझ्या मुरलीचे सूर ऐकले मात्र, मी माझी राहिलेच नाही. केवढी आर्तता त्या मुरलीच्या सुरांमधून प्रगटत होती. मला तर असे जाणवले की माझ्या मनातील आर्ततेचा भावच जणू साकार होत आहे. त्या आर्त सुरांनी माझ्या मनात शिल्लक राहिलेला घट्टपणा पूर्ण विरघळला आणि तोच माझ्या डोळ्यातून वाहू लागला. मला एकदम हलके हलके वाटू लागले. एवढ्या दिवसांचे मनावरील ओझे अचानक दूर झाले आणि मनातील दुरावा कुठच्याकुठे दूर पळाला. तुझ्या प्रेमाने मन पुन्हा भरून आले आणि माझ्या मनाचे 'मी'पण विरून गेले. मी

केव्हा तुझ्या चरणांवर कोसळले हे माझे मलाच कळले नाही. ज्यावेळी मी भानावर आले त्यावेळी तुझ्या शेजारी बसून आणि तुझ्या खांद्यावर माझे डोके ठेवून मी शांतपणे बसले आहे हे माझ्या लक्षात आले. माझ्या खांद्याभोवती तुझा हात ठेवून तू मला ज्या आपलेपणाने जवळ घेतले होतेस आणि ज्या प्रेमाने तू माझे मस्तक आपल्या स्वतःच्या हाताने थोपटत होतास ना, त्या तुझ्या आपलेपणाला आणि त्या तुझ्या प्रेमळ स्पर्शाला मी कधीच विसरू शकणार नाही. त्याचे मला नित्य स्मरण राहील.

ए कृष्णा, पण मला एका गोष्टीची काळजी व थोडीशी भीतीही वाटते, की माझ्या स्वभावात जो राग आहे तो काही अजून पूर्ण गेलेला नाही. तो राग मधून मधून वर डोके काढणारच. बरे, तूही असा आहेस ना, की माझ्या रागालोभाची पर्वा न करता तुझ्या स्वभावानुसार मोकळेपणाने व मिश्किलतेने माझ्याशी बोलत व वागत रहाणारच. मग माझ्याही ठिकाणी राग येणारच, पुन्हा मला त्याचा त्रास हा होणारच आणि मीही तुला असा त्रास देणारच. मागे एकदा मी तुझा प्रिय मित्र जो पेंद्या, त्यालाच विचारले होते की 'कृष्णावर न रागावता प्रेम कसे करावे'. तर त्यावर तो काय म्हणाला माहीत आहे? तो म्हणाला की 'मला तर कृष्णाचा कधीच राग येत नाही. त्याचे रूप, हसणे, बोलणे एवढे मोहविणारे आहे की त्याची मनाला भूलच पडते आणि त्याच्यावर रागवायचे मी अगदी विसरून जातो. पण कृष्ण मात्र कधी कधी माझ्यावर रागावतो. त्यातून मग थोडीशी आमची बोलाचालीही होते. परंतु कृष्णावर मी रागावूच शकत नाही.'

ए कृष्णा, पेंद्याचे बोलणे ऐकून मी अगदी चकितच झाले. पण पेंद्याएवढा निरागसपणा माझ्या ठिकाणी अजिबात नाही हे मी तुला अगदी स्पष्टपणे सांगते. त्यामुळे पेंद्यासारखा निरागसपणा व भोळेपणा हा मला तरी मुळीच जमणारा नाही. तेव्हा कृष्णा, तुझ्यावर न रागावता, तुझे प्रेम कसे कायम ठेवावे आणि ते प्रेम तुझ्यावर कसे करावे हे तूच मला आता सांग. अशी काहीतरी युक्ती मला सुचव, की माझा तुझ्यावरचा राग कायमचा दूर पळून जाईल आणि माझ्या तुझ्यावरच्या प्रेमाच्या आड कधीही येणार नाही.''

राधेचे बोलणे ऐकून कृष्ण अत्यंत मोकळेपणाने हसला आणि म्हणाला, ''अगं राधे, त्याच्यासाठी एक अगदी सोपी युक्ती आहे आणि ती म्हणजे तू आधी रागावूनच प्रेम करीत रहा म्हणजे झाले! तुला राग कशामुळे येतो याचे कारण शोधून काढ आणि तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी प्रेम कशामुळे आहे याचेही कारण शोधून काढ. एकदा का ही कारणे तुला कळली की मग तुझे काम अगदी सोपे झाले. रागाची कारणे काढून टाक आणि प्रेमाची कारणे वाढवीत रहा. तुझ्या मनासारखे झाले नाही, तुझा स्वभाव दुखावला गेला की तुला राग येतो. हो की नाही? अर्थात सर्वांनाच तसे होते म्हणा. त्यात तुझा काही दोष नाही. परंतु तुझ्या मनात जे काही येते किंवा तुझ्या मनाला जे काही वाटते ते बरोबरच असेल कशावरून? मग तेथे स्वभावाचा अहंकार आड येतो.

परंतु खरे प्रेम असते ते दुसऱ्याच्या मनाचा, त्यातील भावनांचा, त्याच्या सुखदुःखाचा विचार करते. दुसऱ्याविषयी एवढा आपलेपणा वाटतो की दुसऱ्याच्या मनाचा विचार आपल्या मनात आधी येतो. केवळ दुसऱ्याचाच विचार आपल्या

मनात असणे हा तर त्याच्याविषयीचा आत्यंतिक आपलेपणा होय आणि आत्यंतिक आपलेपणा म्हणजेच प्रेम होय. ज्याचे विस्मरण झाले असता मनात व्याकुळता निर्माण होते आणि ज्याचे स्मरण झाले असता जवळीकतेचा अनुभव येतो त्याला प्रेम म्हणतात. ज्याच्या वियोगाने मन बेचैन होते आणि ज्याच्या भेटीत सुखाची नुसती चैन होते त्याला प्रेम म्हणतात. ज्याची भेट घडावी म्हणून अधीरता असते आणि ज्याच्या भेटीतच सर्व सार्थकता झाल्यासारखे वाटते त्याला प्रेम म्हणतात. सर्वात मुख्य म्हणजे ज्याची भेट झाली असता जणू आपणच आपल्याला भेटल्याचा आनंद होतो त्याला प्रेम म्हणतात. अशी ही खऱ्या प्रेमाची लक्षणे आहेत आणि म्हणूनच राधे, खरे प्रेम हे अकारणच असते. काहीतरी कारणाकारणाने ते प्रगट होते, काही वेळा मुद्दाम कारण काढूनही ते प्रगट होते. परंतु मुळात ते अकारणच असते. म्हणूनच स्वच्छ, निर्मळ व अत्यंत शुद्ध असते. त्यामुळे त्यातून राग, द्वेष, मत्सर, हेवा, लोभ, मोह किंवा भीती यासारखे कोणतेही विकार निर्माणच होऊ शकत नाहीत.

राधे, या सर्वातून एकच निष्कर्ष काढता येतो, की जेव्हा तू तुझाच विचार प्राधान्याने करीत रहाशील तर त्याचे पर्यवसान कधी ना कधी तरी तुला माझा राग येण्यात हे होणारच. तेच तू जर माझा विचार प्राधान्याने करीत रहाशील, तर त्याची परिणती निश्चितपणे माझ्या प्रेमातच होणार. अर्थात हे एवढे सोपे नाही आणि एकदम जमण्यासारखेही नाही. कारण मनाचे संस्कार व मूळ स्वभाव एवढ्या सहजासहजी बदलत नाहीत. त्याच्यात बदल होण्याची जी काही थोडीफार शक्यता आहे ती या प्रेमामुळेच आहे आणि हा बदलही हळुहळूच होत रहाणार. तोपर्यंत तू एकच गोष्ट कर. ती म्हणजे राग करायचा, पण धरायचा नाही. आणि प्रेम व्यक्त करता आले नाही तरी ते प्रेम मनात धरून मात्र ठेवायचे. एकदा का राग येऊन गेला की मग मात्र मनात धरून ठेवलेले प्रेम मोकळे सोडायचे. त्यातूनच तुझ्या मनात प्रेमाचा मोकळेपणा वाढत व कायम होत राहील. मग काही कारणामुळे जरी राग आला तरी प्रेमाच्या मोकळेपणात तो वाहून जाईल. असे होता होता एक दिवस त्या रागाचे मूळच नाहीसे होईल आणि केवळ प्रेमाचा मोकळेपणा मात्र शिल्लक राहील.''

कृष्णाचे बोलणे ऐकताना राधेला थोडेसे नवलच वाटल्यासारखे दिसत होते. तिच्या मनावर आलेला ताणही हलका होत होता. त्यामुळे मनाच्या मोकळेपणाने राधा कृष्णाशी बोलू लागली.

''ए कृष्णा, तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी आत्यंतिक प्रेम व आपलेपणा आहे याची मला अगदी खात्री आहे. ज्या खऱ्या प्रेमाच्या लक्षणांचे तू वर्णन करून सांगितलेस, ती सर्व लक्षणे अगदी तंतोतंत तुझ्याच ठिकाणी आहेत. आता माझ्या ठिकाणी तसे प्रेम असणे कसे शक्य आहे? तू काय करतोस, तर जसे प्रेम तुझ्या ठिकाणी आहे तसेच प्रेम माझ्या ठिकाणीही आहे किंवा असावे अशी अपेक्षा करतोस. अर्थात तशी तू अपेक्षा करायला काहीच हरकत नाही. पण मग मी जेव्हा कधी कमी पडते ना, तेव्हा मात्र तुला ते सहन होत नाही. बरे, मी कमी पडते हे मलाही ठाऊक असतेच. पण त्या त्या वेळेस माझाही इलाजच नसतो ना. मुद्दामहून का मी कमी पडत असते? नाही ना? बरे, तुझा स्वभाव एक असा आहे की एक तर 'माझे असे कमी पडणे' हे तुला मानवत नाही आणि दुसरे म्हणजे तू लगेचच तसे बोलूनही दाखवतोस. तुलाही धीर धरवत

नाही. त्यामुळे होते काय? तर नेमके माझ्या वर्मावर बोट ठेवल्यासारखे होते आणि मग मला साहजिकच राग येतो. तेव्हा कृष्णा, तू माझ्यासाठी एक गोष्ट करीत रहा. ती म्हणजे माझ्यातील कमतरता वा चुका मला लगेचच अगदी तेथल्या तेथे न दाखवता काही काळानंतर, म्हणजे माझे मन शांत व स्थिर झाल्यावरच सांगत जा. त्यामुळे मग माझ्याही मनाची चिडचिड होणार नाही आणि माझ्या चुकाही नीटपणे माझ्या लक्षात येतील. त्या चुका सुधारण्याची मग मला संधीही मिळेल.''

राधेचे बोलणे ऐकून त्यावर हसतच कृष्ण म्हणाला, ''हेच ते! नेमके हेच तर तुझे चुकते राधे! त्या त्या वेळच्या चुका त्या त्या वेळीच बोलल्या तर त्यातून काही वेळा वाद होतो हे खरे आहे. पण त्या चुकांविषयी नंतर अगदी निवांतपणे बोलले तर त्या निव्वळ गप्पाच होतात. त्यातून निष्पन्न असे काहीच होत नाही. सर्व बोलणे होते. ते मान्यही होते. आपल्या चुकाही कबूल करून त्या स्वीकारल्याही जातात. परंतु पुन्हा प्रत्यक्ष प्रसंग आला की ये रे माझ्या मागल्या! पुन्हा तसेच चुकीचे वागणे व बोलणे घडते. कारण मुळातली वृत्ती हीच जी चुकीची असते त्यात काहीच बदल झालेला नसतो आणि त्या वृत्तीतच बदल होणे आवश्यक असते. ती वृत्ती बदलली की त्याप्रमाणे वागणे व बोलणे हे सहजतेने घडेल. अर्थात वृत्ती बदलायला किती तरी वेळ लागतो. म्हणून त्याचे होणारे संभाव्य दुष्परिणाम टाळण्यासाठी आधी बाह्य बोलण्यात व वागण्यातच सुधारणा करावी लागते. यासाठीच त्या त्या प्रसंगातच बोलणे आवश्यक असते. कारण प्रसंग एकदा का घडून गेला की मग त्यात काही सुधारणा करण्याची संधीच मिळणार नाही.

म्हणूनच राधे, मी तुला त्या त्या प्रसंगातील वर्म काय आहे हे वेळीच समजावून सांगत असतो. तर तुला वाटते की मी तुझ्या वर्मावर बोट ठेवतो. तेव्हा ते वर्म लक्षात घ्यायचे तर मनाने शांतपणे सर्व ऐकून घेतले पाहिजे. मनही शांत तेव्हाच रहाते, जेव्हा त्या मनाला सांगणाऱ्याच्या ठिकाणचा आपल्याविषयीचा आपलेपणा लक्षात येतो आणि सांगणाऱ्या विषयीचा तो आपलेपणा मनामध्ये जागृत रहातो. माझ्या ठिकाणी तुझ्याविषयी हा प्रेमाचा आपलेपणा नुसताच आहे असे नाही, तर तो आपलेपणा सदैव जागृतही असतो. म्हणूनच तर मग मी आधी तुझे योग्य ते कौतुक करतो, जे मी नेहमीच करीत असतो आणि लगेचच जेथल्या तेथेच तुझ्या वागण्यातील न्यूनता दाखवून त्याची पूर्तता कशी करायची हेही सांगत असतो. बऱ्याच वेळा तर ती पूर्तता मीच करून घेतो. पण राधे, हे मात्र तू लक्षात घेत नाहीस. मी तुझे केलेले कौतुकही तू लक्षात ठेवत नाहीस. सर्व विसरून जातेस आणि फक्त जेव्हा मी दाखवलेले न्यूनच तुला आठवते तेव्हा मग तुला राग येतो आणि तुझी चिडचिड होते. खरे की नाही?

राधे, तुझे दुसरे म्हणणे असे आहे की माझ्या अंतःकरणाची जी प्रेमाची अवस्था आहे, तशी तुझ्या अंतःकरणाची कशी काय असणार? तेव्हा तशी ती असणार नाही हे तुझे म्हणणे जरी बरोबर आहे, तरी तशी ती अवस्था कधी होऊच नये का? मुख्य म्हणजे, 'ही माझ्या अंतःकरणाची अवस्था, ही तुझ्या अंतःकरणाची अवस्था' असे म्हणणेही योग्य नाही. कारण मी जी वर्णन करून सांगत आहे, ती खऱ्या प्रेमाची अवस्था आहे. खऱ्या प्रेमाचे ते लक्षण आहे आणि त्या प्रेमाची लक्षणे ही सहजतेने प्रगट होतच असतात. ती मुद्दाम दाखविण्यासाठी म्हणून दाखविता येतच नाहीत. त्यातून कोणी ती लक्षणे

बाह्यांगाने मुद्दाम दाखविण्याचा प्रयत्न केला, तरी त्यातील नकलीपणा व खोटेपणा हा जास्त वेळ लपून राहूच शकत नाही. कधी ना कधी तरी आणि कसा ना कसा तरी तो उघडा पडणारच. तेव्हा काळाच्या ओघात व जीवनातील सर्व प्रसंगात जे टिकून रहाते, एवढेच नव्हे तर जे सहजपणे व समर्थपणे प्रगट होत रहाते तेच खरे प्रेम होय. त्या अवस्थेलाच 'प्रेमाची खरी अवस्था' असे म्हणणे योग्य ठरेल.''

*****



# कृष्णाचा सर्वांविषयीचा जिव्हाळा

''**रा**धे, ही गोष्ट खरी आहे की या अशा प्रेमाची अवस्था माझ्या अंतःकरणात अगदी जन्मतःच आहे. त्याचे कारण मला तुला सांगता येणार नाही. परंतु मला समजायला लागल्यापासून पहिली समज मला हीच आली, की माझ्या ठिकाणी सर्वांविषयी अत्यंत आपलेपणा आहे. सर्वांच्या सुखदुःखाचा माझ्या मनावर लगेचच व खोलवर परिणाम होतो. दुसऱ्यांचे दुःख नाहीसे करावे आणि त्यांना सुखवावे असे मला नेहमी अगदी सहजपणे वाटत असते. 'दीन दुबळ्यांना मनाने सबळ करावे, परावलंबी असलेल्यांना स्वावलंबी करावे, बंधनाचे जीवन जगणाऱ्यांना त्यातून मुक्ती प्राप्त करून द्यावी, आसक्तीने जीवन जगणाऱ्यांना प्रेमाने जीवन जगण्यास उद्युक्त करावे, प्रेमाने व प्रेमासाठी जगणाऱ्यांना खऱ्या प्रेमाची जाणीव करून द्यावी आणि सर्वांना आनंदाचे जीवन काय व कसे असते हे अनुभवास आणून द्यावे' असे मला नेहमीच अगदी मनापासून वाटत असते. तोच माझा स्वभाव आहे आणि तेच माझे अंतःकरण आहे. राधे, असाच मी आहे. त्याला मी तरी काय करू ?

आता तुझे म्हणणे असे आहे, की या सर्व गोष्टी तुझ्याही बाबतीत हळुहळू सावकाशीने घडतीलच. त्यासाठी एवढी घाई व गडबड करण्याचे कारण नाही. माझ्या स्वभावात उतावीळपणा आहे असाही मला दोष दिला जातो. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव, की काळाचा भरवसा नसतो आणि तसा तो कोणी धरूही नये. आज मी आहे, तू आहेस. आपण भेटत आहोत. आपल्याला अनुकूलताही आहे. परंतु हे सर्व नेहमी असेच चालत राहील असे गृहीत धरणे हे वेडेपणाचे आहे. काळ सारखा बदलत असतो, बाह्य परिस्थिती बदलत असते, एवढेच काय व्यक्तींच्या मनाची स्थितीही बदलत असते. अशा वेळी अनुकूलतेच्या काळात बेसावध राहून चालायचे नाही. तर हीच वेळ सावध होण्याची असते हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. मी असा सदैव सावध असतो म्हणून नेहमी घाई गडबडीत दिसतो आणि नेहमी इतरांनाही घाई गडबड करायला लावताना दिसतो. परंतु राधे, एक गोष्ट लक्षात ठेव, की ती माझ्या अंतरातील आर्तता असते. ती माझी आर्तता जर तुला कळली तरच तुला माझे अंतःकरण जाणता येईल आणि माझे अंतःकरण जर तुला जाणता आले, तरच तुला मला जाणता येईल. कारण मी व माझे अंतःकरण हे दोन वेगळे नाहीत. तर मी म्हणजेच माझे अंतःकरण आणि माझे अंतःकरण म्हणजेच मी होय.''

बोलता बोलता अंतर्मुख झालेल्या कृष्णाची अवस्था पाहून राधाही एकदम भावपूर्ण झाली आणि नकळतपणे पुन्हा कृष्णाच्या चरणांजवळ बसली. कृष्णाकडे भरल्या डोळ्यांनी पहात राधा कृष्णाशी आर्त सुरात बोलू लागली.

''ए कृष्णा, तीच तर माझी अडचण होते ना! तुझे अंतःकरण वगैरे मला तर समजूच शकत नाही. तुझे व्यक्तिमत्त्व सुद्धा मला एवढे गहन जाणवत आहे, की तुझ्या व्यक्तिमत्त्वाने तू खरा प्रगट होत आहेस, की खरा असलेला तू लपलाच जातो आहेस हेच मला कळत नाही. तेव्हा तुझ्या अंतःकरणापर्यंत पोहोचणे कठीणच वाटते. कारण ते एवढे खोलवर आहे, की

त्या तुझ्या अंतःकरणापर्यंत जाणे मला तरी अशक्यच आहे. मी जेमतेम तुझ्यापर्यंत पोहोचते आहे हेच मला तरी पुष्कळ वाटते. त्यातून तूच आपणहून तुझे अंतःकरण माझ्यापाशी मोकळे करतोस म्हणून मला तुझे अंतःकरण थोडेफार तरी दिसते व जाणवते. नाहीतर, मला तरी ते कधी स्वतःहून कळले असते असे वाटत नाही.

ए कृष्णा, पण आता तू तुझ्या अंतरातील आर्ततेविषयी सांगत होतास ना? त्यावरून एक गोष्ट माझ्या आता लक्षात आली. मी ज्या वेळेस तुला शोधत शोधत या कुंजवनात आले ना, त्या वेळेस तू वाजवीत असलेल्या मुरलीच्या नादाने मी तर अगदी मंत्रमुग्ध होऊन राहिले होते. पण त्यातून निघत असलेल्या सुरात एक अगदी वेगळ्या प्रकारचीच आर्तता मला जाणवत होती. त्या आर्त सुरांचा माझ्या मनाला स्पर्श होताच माझेही मन माझ्या नकळत अत्यंत आर्त झाले. त्या आर्ततेतही एक वेगळ्या प्रकारचेच सुख होते. त्यामुळे माझे तर सर्व देहभानच हरवले आणि मी केव्हा तुझ्या जवळ येऊन तुझ्या चरणाशी बसले हे मला सुद्धा कळलेच नाही. कृष्णा, हीच ती तुझ्या अंतरातील आर्तता ना, जी तू मगाशी सांगत होतास? पण मला सांग, तुझ्या ठिकाणची ही आर्तता एवढी तीव्र का झाली होती? आणि कोणामुळे व कशासाठी झाली होती?''

राधेचे आर्त भावाचे बोलणे ऐकून कृष्णही एकदम भावपूर्ण झाला. चरणाशी बसलेल्या राधेला आपल्या हातांनी उठवून कृष्णाने आपल्या शेजारी बसवून घेतले आणि तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन कृष्ण तिच्याशी बोलू लागला.

''अगं राधे, हा प्रश्न विचारून तू तर अगदी माझ्या अंतःकरणालाच हात घातलास. तू म्हणतेस त्या प्रमाणे माझे अंतःकरण अत्यंत सखोल आहे हे खरेच आहे. किंबहुना अंतःकरण हे सखोलच असते. मग ते माझे असो, तुझे असो, नाहीतर आणखीन कोणाचेही असो. परंतु ज्यांचे अंतःकरण मोकळे असते, त्यांच्या अंतःकरणातील नानाविध भाव त्यांच्या मनापर्यंत सहजतेने येत असतात आणि अनेक कृतींच्या द्वारे व्यक्त होत असतात. त्यामुळे त्यांच्या अंतरातील अवस्था काही प्रमाणात तरी समजू शकते आणि त्यांच्या शब्दांचा व कृतीचा मागोवा घेता येणे शक्य होते. त्यातूनच मग त्यांच्या अंतःकरणापर्यंत जाण्याचा मार्गही दिसू लागतो. या उलट, ज्यांचे अंतःकरण कोरडे व घट्ट असते त्यांच्या अंतःकरणाचा मात्र थांगपत्ताच लागू शकत नाही. कारण त्यांचे वागणे व बोलणे हे त्यांच्या अंतःकरणापासूनचे नसते, तर केवळ वरवरचे असते, स्वार्थी व मतलबी असते आणि त्यामुळेच ते दिशाभूल करणारेही असते. या पेक्षाही ज्यांच्या अंतःकरणात विपरीत भाव भरलेले असतात ना, त्यांचे वागणे, बोलणे तर फसवेच असते आणि अधिक धोकादायी असते. त्यांचे मनही नेहमी दुष्ट भावाने भरलेले असते. त्यांच्या तर अंतरात डोकावून बघणेच नको आणि बाह्यांगानेही त्यांच्यापासून दूर रहाणेच बरे.

राधे, माझे अंतःकरण मात्र नेहमीच सर्वांविषयीच्या प्रेमाने भरलेले असते आणि ते प्रेम वारंवार उचंबळून माझ्या मनालाही भारून ठेवीत असते. त्यामुळेच सर्वांच्या सुखदुःखाविषयीच्या विचारानेही माझे मन व्याकुळ होते. ती मनातील व्याकुळता माझ्या अंतरापर्यंत अगदी सहजतेने जाऊन पोहोचते आणि माझ्या अंतःकरणालाही आर्त करून ठेवते. सर्वांची संकटे, अडचणी व दुःखे समजावून घेणे, त्यातून सुटण्याचा मार्ग त्यांना दाखविणे, वेळप्रसंगी त्यांना त्या मार्गाने स्वतः घेऊन

जाणे, त्यासाठी त्यांनी सबळ व्हावे म्हणून त्यांना सुखविणे आणि त्यांना खऱ्या प्रेमाचा अनुभव आणून देणे इत्यादी अनेक व्यवधाने माझ्या मनात मग सहजपणे निर्माण होतात. त्यामुळे त्या व्यवधानांची पूर्ती होईपर्यंत माझ्या अंतरातील आर्तताही वाढतच रहाते. अशी अनेकांची अनेक व्यवधाने माझ्या मनाला त्यांच्या माझ्यावरील श्रद्धेपोटी आणि त्यांनी माझ्या धरलेल्या भरवशापोटी, त्याहूनही मुख्यतः माझ्या ठिकाणी असलेल्या त्यांच्याविषयीच्या प्रेमापोटी लागतच असतात आणि ती सदैव वाढतच रहातात.

मग राधे, तूच विचार कर, या आर्ततेमुळे माझ्या अंतःकरणाची अवस्था काय होत असेल? पण याचे उत्तर मीच तुला सांगतो. या आर्तभावाचे मला जराही क्लेश न होता त्यातही एक प्रकारच्या आनंदाचाच अनुभव येत असतो. त्याचे कारण म्हणजे ही आर्तता दुसऱ्यांविषयीच्या आत्यंतिक आपलेपणातून व प्रेमातून आलेली असते आणि प्रेम हे कोणत्याही रूपात व कोणत्याही अवस्थेत नेहमीच आनंददायी असते हे मी स्वानुभवाने अगदी खात्रीपूर्वक सांगतो.

अगं राधे, पण तुला म्हणून मी एक गुह्य सांगतो. मगाशी या कुंजवनात बसून जेव्हा माझ्याकडून मुरलीवादन घडत होते ना, तेव्हा त्यातून प्रगटणारे आर्त सूर हे माझ्या अंतःकरणातील आर्त भावालाच साकार करीत होते हे अगदी खरे आहे. कारण माझे अंतःकरण जेव्हा अत्यंत भावपूर्ण होते, म्हणजेच प्रेम, व्याकुळता, आर्तता, पूर्तता किंवा आनंद अशा कोणत्याही विशिष्ट भावाने भरून येते, तेव्हा ते मोकळेपणाने वाहवण्यासाठीच तर मी मुरली वादनाचे माध्यम घेतो. त्या वादनातून माझ्या अंतरातील सर्व भाव जेव्हा ओसंडून वहातो ना, तेव्हाच माझे मन थोडेसे हलके झाल्यासारखे मला वाटते. परंतु मगाशी माझ्या मुरलीवादनातून साकारणारा आर्तभाव दुसऱ्या कोणासाठीही नव्हता, अगदी तुझ्यासाठीही नव्हता, तर ती आर्तता माझी माझ्याविषयीचीच आणि माझ्यासाठीचीच होती.

अनेकांची दुःखे, अडचणी व मने समजावून घेता घेता कधी कधी मीही जेव्हा एकांतात असतो ना, तेव्हा माझ्या मनात अचानक विचार येतो, की 'माझेही मन कोणी समजावून घेईल का? माझ्याही व्यथा व दुःखे कोणी मला विचारून जाणून घेईल का आणि त्यावर प्रेमाची हळुवार फुंकर घालेल का? मलाही माझ्या आत्यंतिक प्रेमाची कोणी व्यक्ती भेटेल का? की जिच्यापाशी मी माझ्या मनातील सर्व भाव मोकळेपणाने प्रगट करू शकेन. मलाही मन आहे, भावना आहेत हे कोणाच्यातरी लक्षात येईल का? आणि कोणीतरी त्याच्या माझ्यावरील प्रेमाचा मला थोडातरी अनुभव आणून देईल का? मी सर्वांसाठी आहे म्हणताना, माझ्यासाठी कोणीतरी असेल का? राधे, असे सर्व भाव माझ्या मनात एकदम दाटी करून येतात आणि माझी आर्तता पराकोटीची वाढते. त्या आर्ततेची पूर्तता व्हावी असे काही जरी माझ्या मनात असले, तरी माझ्या हातात मात्र नसते. म्हणून मग मी माझ्या हक्काची अशी मुरली माझ्या ओठी धरतो आणि अंतर्मुख होतो. तेव्हा माझ्या अंतरीचे दाटलेले सर्व आर्तभाव वाहून मोकळे होतात आणि माझ्या मनाला अगदी हलके करून पुन्हा उत्तेजित व उत्साहित करतात.

अगं राधे, मागच्या आपल्या भेटीत तुला माझा अतिशय राग आला आणि तू तशीच रागावलेल्या स्थितीतच निघून गेलीस. माझ्याकडून काही तरी कमी जास्त बोलणे झालेही असेल. परंतु बऱ्याच वेळा शब्द हे भाव व्यक्त करायला कमीच पडतात किंवा वेगळाच भाव प्रगट होतो. ठराविक शब्दांना जरी ठराविक अर्थ असले, तरी शब्दांच्या उच्चाराने व नादाने त्यातून भाव मात्र वेगळे वेगळे व्यक्त होऊ शकतात. त्यामुळेच एकाच शब्दातून किंवा वाक्यातून मनातला रागही व्यक्त होतो किंवा व्याकुळता व आर्तताही व्यक्त होऊ शकते. त्यातून पुन्हा प्रत्येकाची बोलण्याची ढबही वेगळी असते आणि शब्दरचनेची शैलीही भिन्न असते. त्यामुळे एखाद्याचे भाव त्याच्या भाषेच्या माध्यमातून पूर्ण कळतीलच असेही नाही आणि नीट कळले नाही तर भाषेचा मूळ हेतू बाजूलाच रहातो आणि परस्परांचे गैरसमज मात्र अधिकच वाढतात. खरे तर, शब्दापलीकडील भाव हे नेत्रांतून प्रगटत असतात आणि तेच नेमके आपल्या नेत्रांनी आपल्याला टिपता आले पाहिजेत. परंतु एकमेकांच्या नेत्रांत पहाण्यासाठी एकमेकांविषयी मनामध्ये प्रेमही तेवढेच भरलेले असावे लागते. त्या प्रेमाशिवाय त्या पहाण्याला व त्या बोलण्याला काही अर्थच नाही असे म्हणण्यापेक्षा, त्या प्रेमामुळेच सर्वाला अर्थ प्राप्त होतो. कारण त्या सर्वांतून निघणारा व जाणवणारा अर्थ हा परस्परांविषयी अधिक प्रेमभाव निर्माण करणारा असतो.

तेव्हा माझ्याकडूनही एखादे वेळा मला जे काही म्हणायचे होते त्याचे योग्य शब्दांकन झाले नसेलही. मी काही नाही म्हणत नाही. परंतु मला काय म्हणायचे आहे व काय सांगायचे आहे याचा विचार न करताच आणि विचारूनही न घेताच जेव्हा तू निघून गेलीस ना, तेव्हा मात्र मीही व्यथितच झालो. कारण जेथे प्रेमाचे संबंध आहेत तेथे मनात प्रेमाचा मोकळेपणा असतोच असतो. त्या प्रेमामध्ये मनाच्या मोकळेपणाने येणे आहे, मोकळेपणाने भेटणे आहे आणि त्याच व तेवढ्याच मोकळेपणाने जाणे आहे, तेही पुन्हा परत येऊन भेटण्यासाठीच. असा मनाचा मोकळेपणा न घेताच तू जेव्हा निघून गेलीस ना, तेव्हा मात्र मला अतिशय वाईट वाटले. कारण तुझे नि माझे जे काही प्रेमाचे संबंध आहेत त्याचा पायाच हलल्यासारखा झाला. त्यातून मग पुढे तूही कित्येक दिवस आली नाहीस आणि माझे मनाला अधिकाधिक उदासीनता येऊ लागली. परंतु तुझी वाट पहाण्यापलीकडे मी दुसरे काहीच करू शकत नव्हतो. त्यामुळे दुसऱ्या कशातही माझे मन मुळीच लागत नव्हते आणि दुसऱ्या कोणातही माझे मन अजिबात रमत नव्हते. म्हणून मग मी एकटाच कोणाच्या नकळत या कुंजवनात येऊन बसत असे आणि माझी प्रिय व भरवशाची असलेली सखी जी माझी ही मुरली, तिच्या नादात माझे मन मोकळे करून मी रमत असे.

आजही मी असाच येथे कुंजवनात बसून माझ्या या प्रिय मुरलीशी प्रेमाचे गुंजन करीत बसलो होतो. किती वेळ मी असा बसलो होतो याचे मला तर भानच नव्हते. पण अचानक मला माझ्या मुरलीचा नाद ऐकू येईनासा झाला. अंतरातील त्या नादाचे घुमणारे निनादही हळुहळू थांबले आणि मी देहभानावर आलो. नेत्र उघडून पाहिले तर राधे, तूच माझ्या चरणाशी बसून अश्रुपूर्ण नजरेने माझ्याकडे डोळे लावून बघत होतीस. तुझे निर्मळ अश्रू आणि आर्ततेने भावपूर्ण झालेले मुख पाहिले मात्र, मला माझी खरी प्रिय सखी भेटल्याचा झालेला आनंद गगनातच मावेना. तुझ्या नेत्रात माझ्यावरील प्रेमाची चमक पुन्हा एकदा मला दिसली आणि तुझ्या ठिकाणचे झाकोळले गेलेले माझ्याविषयीचे प्रेम पुन्हा प्रकर्षाने उजाळून प्रगट झाल्याचेच ते

सुचिन्ह होते हे मला जाणवले. त्या आनंदाच्या भरातच मी तुला उचलून माझ्या हृदयाशी धरले आणि प्रेमाने माझ्याजवळ बसवून घेतले. त्यानंतर तुझ्याशी बोलता बोलता माझे अंतःकरण पूर्णपणे मोकळे झाले आणि मनाच्या ठायी आलेला एकाकीपणाचा भाव कोठच्या कोठे नाहीसा झाला. माझ्यासाठीही माझ्या प्रेमाचे कोणीतरी आहे याची माझ्या मनाला खात्री झाली. अशी प्रेमाची व्यक्ती भेटणे हे खरोखरीच अत्यंत भाग्याचेच लक्षण आहे. ही तर माझ्यावरील परमेश्वराची कृपाच म्हणावी लागेल.''

*****



# राधेचा प्रेमनिश्चय

**कृ**ष्णाचे बोलणे ऐकताना आधी नवल वाटत असलेली राधा नंतर नंतर मात्र अगदी भावपूर्ण होऊन राहिली आणि तिच्या डोळ्यांत पाणी तरारून आले. कृष्णाने तिच्या धरलेल्या हातांनी तिने कृष्णाचे हात प्रेमाने अधिक घट्ट दाबून धरले आणि तिच्या भावना मोकळ्या होऊ लागल्या.

''अरे कृष्णा, खरोखरीच तुझ्या अंतःकरणाचा ठाव लागणे हे अशक्यच आहे. तुझ्या अंतःकरणातील व्यथा जेव्हा तू आता मोकळेपणाने सांगितलीस तेव्हाच माझ्या लक्षात आली. आधी मला जरी थोडेसे नवल वाटले तरी नंतर वाईट मात्र अधिक वाटले. सर्वांची दुःखे ओळखून ती नाहीशी करणारा, सर्वांशी नेहमी प्रेमाने बोलणारा व सर्वांशी नेहमी हसत खेळत वागणारा एवढाच तू कृष्णा, आम्हा सर्वांना नेहमी दिसतोस आणि आम्हीही तुला तेवढाच पहातो व समजतो. परंतु तुझे मन, त्यातील तुला येणारा ताण, तुझ्या मनाला होणारे क्लेश व तुझ्या मनोव्यथा या गोष्टींचा कधी विचारही आमच्या मनाला शिवलाच नाही. सर्व निभावून नेण्याचे मनोबळ तुझ्या ठिकाणी आहे हाच व एवढाच विश्वास आम्ही नेहमीच तुझा धरून चालतो. आम्हाला सुख मिळते, स्वास्थ्य मिळते, तुझे प्रेम मिळते आणि आम्ही आनंद घेतो. बस्स्. यातच आम्ही मश्गूल होऊन शेवटी स्वार्थीच बनून राहतो ना? शी, मला तर माझाच राग येतो. माझीच मला चीड येते. एवढे असूनही वर तू म्हणत होतास की तुला माझा भरवसा वाटतो. माझ्या भेटीत तुला तुझी अगदी जवळची अशी प्रेमाची सखी भेटल्यासारखे वाटते.

ए कृष्णा, खरेच, तुझी तर कमालच आहे. अरे, मी तर या गोकुळातील एक साधी गवळण आणि त्यातूनही पुन्हा विवाहित व सासुरवाशीण. तेव्हा मी तुला कसे व किती भेटणार आणि समजावून घेणार हाच एक मोठा प्रश्न आहे. परंतु मी तुला एक गोष्ट निश्चितपणे सांगते, की मी तुझे मन जाणून घेण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करीन. कारण तुझे अंतःकरण जाणणे हा माझ्यासाठी तरी फारच दूरचा पल्ला आहे. अर्थात तुझे मन ओळखणे हेही जरी कठीण असले तरी ते शक्य आहे आणि त्याहीपेक्षा माझ्यासाठी ते अत्यंत आवश्यक आहे. कारण आता मीही तुझ्या प्रेमाशिवाय राहू शकणार नाही हे माझ्याही पूर्णपणे लक्षात आले आहे. ही गोष्ट आता लपवून ठेवण्यात काहीही अर्थ नाही. कितीही लपवून ठेवण्याचा प्रयत्न केला तरी ती गोष्ट आता लपून राहणेही शक्य नाही आणि मला लपवून ठेवायचीही नाही. तू जो माझ्या प्रेमाचा भरवसा धरला आहेस त्याला मी पात्र होऊन राहीनच राहीन याची मला अगदी खात्री आहे. आता मी होऊनच तुझ्याशी प्रेमाने जवळीक साधीत राहीन, प्रेमाच्या मोकळेपणाने वागेन आणि तुझ्याकडून मिळालेल्या प्रेमालाच फक्त मनात धरून ठेवेन. त्या प्रेमालाच स्मरेन आणि त्या प्रेमालाच जागेन. मग त्यासाठी मला कोणत्याही परिणामाला तोंड देण्याची वेळ आली तरी मी डगमगणार नाही किंवा माझा पाय मागे घेणार नाही. सर्व परिणामांची जबाबदारी मी तुझ्या प्रेमबळाने स्वीकारीन आणि आनंदाने तुला सदैव साथ देईन. हे मी तुला दिलेले वचन आहे.''

राधेचे प्रेमभावाच्या बळाचे बोलणे ऐकता ऐकता कृष्णही अत्यंत भावपूर्ण झाला आणि सहजपणे उद्गारला, ''शाब्बास राधे, शाब्बास! अगं नेमकी याच भाावबळाची अपेक्षा मी तुझ्याकडून नेहमी करीत असतो. एका गोष्टीचे कारण मलाही सांगता येणार नाही. परंतु आपल्या अगदी पहिल्या भेटीपासूनच माझ्या ठिकाणी तुझ्याविषयी एक वेगळ्याच प्रकारचा आपलेपणा मला जाणवत आहे. एखादे वेळेस माझ्या ठिकाणी असलेल्या या कमालीच्या आपलेपणाचाच तुला त्रास झाला असण्याची शक्यता आहे. परंतु माझाही नाइलाजच होतो. त्याला मी तरी काय करणार ना? राधे, एक गोष्ट मी तुला खात्रीपूर्वक सांगतो, की तुझे नि माझे संबंध हे जन्मोजन्मीचे ऋणानुबंध आहेत. केवळ याच जन्मीचे नाहीत, तर मागच्या जन्माचेही आणि पुढील जन्मांचेही. आपले हे संबंध परमेश्वराच्या नियतीनुसारच जुळलेले आहेत आणि म्हणून ते परमेश्वरी सत्तेलाही नक्कीच मान्य असले पाहिजेत हे निश्चित. बघू या, परमेश्वराची पुढे काय इच्छा आहे आणि त्याची काय लीला प्रगट होणार आहे ते!''

बोलता बोलता कृष्ण एकदम अंतर्मुख होऊन राहिला आणि तशाच अवस्थेत उठून उभा राहिला. आपल्या बरोबर राधेलाही कृष्णाने हात धरून उठवले आणि राधा व कृष्ण उभयतां एकमेकांचे हात आपल्या हातात धरून गोकुळाच्या दिशेने चालू लागले. एकमेकांशी न बोलताही ते बरेच काही बोलत होते आणि प्रत्यक्ष काही ऐकत नसतानाही त्यांना बरेच काही ऐकू येत होते. त्या प्रेमाच्या अनोख्या संवादातच त्या उभयतांची मने पूर्णपणे रमून गेलेली होती आणि त्या संवादाचे सुख व आनंद त्यांच्या मुखावरून अगदी ओसंडूनच वहात होते.

राधा व कृष्ण एकमेकांच्या हातात हात घालून नंदाच्या राजवाड्यात परत आले, तर सर्वजण त्यांची वाटच पहात होते. यशोदा तर अगदी हवालदिलच झाली होती. एवढेच नव्हे, तर त्याच वेळेस तेथे आलेला राधेचा नवरा अनय हा सुद्धा वाट पाहून पाहून अस्वस्थच होऊ लागला होता. राधा व कृष्ण यांना हसतमुखाने येताना पाहून सर्वांनाच बरे वाटले खरे, परंतु अनयाची नाराजी मात्र लपून राहिली नाही. तरीही तो काहीच बोलला नाही. यशोदेने मात्र कृष्णाला अत्यंत प्रेमाने जवळ घेतले आणि राधेच्याही मस्तकावर व पाठीवर कौतुकाने थोपटले. त्यानंतर थोड्याशा काळजीच्या व थोड्याशा रागाच्या सुरांत यशोदा राधा व कृष्ण या उभयतांना उद्देशून बोलू लागली.

''अरे कृष्णा, अगं राधे, तुम्ही एवढा वेळ करीत तरी काय होतात? कृष्णा, आधी तू असा न सांगता विचारताच कुठेतरी का गेला होतास? बराच वेळ झाला पण तुझा काही ठाव ठिकाणा नाही. तेवढ्यात ही राधा तुझी चौकशी करीत आली. खरे तर, तीच आधी बऱ्याच दिवसांनी आलेली होती. पण तुझ्या भेटीसाठी अगदी व्याकुळ झालेली दिसत होती. म्हणून मग मी तिलाच तुला शोधून आणण्यासाठी सांगितले. आता, ही राधा तुला शोधायला म्हणून जी गेली ती गेलीच. किती वेळ झाला तरी तिचाच पत्ता नाही. मी तर तुमची वाट पाहून पाहून अगदी थकून गेले. तेवढ्यात हा अनयही राधेला शोधत शोधत इकडे आला. वाट पाहून पाहून तोही बिचारा कंटाळला आणि अस्वस्थही झाला. तोही तुम्हा दोघांना

शोधण्यासाठी निघत होता. परंतु मीच त्याला थोपवून धरले. म्हटले, ''त्या दोघांच्या काळजीत आणखी तुझ्या काळजीची भर नको.''

पण कृष्णा, तुम्ही एवढा वेळ करीत तरी काय होता? काय गं राधे? हा कृष्णच सापडायला वेळ लागला, की त्याचा राग घालवायला वेळ लागला? पण एक गोष्ट मात्र निश्चित, की राधे, तुझ्यामुळेच माझ्या या कृष्णाची कळी पुन्हा खुललेली आहे. याचे पूर्ण श्रेय तुलाच दिले पाहिजे आणि तुझे योग्य कौतुकही केले पाहिजे.''

त्यावर अत्यंत मोकळेपणाने हसून राधा म्हणाली, ''अहो यशोदामाई, हा तुमचा मुलगा कृष्ण किती हट्टी आहे माहीत आहे ना? अर्थात माझ्यापेक्षा तुम्हालाच त्याचा जास्त अनुभव असणार. पण लहानपणापासून सर्वांनी त्याचे लाड व कौतुक करून करून त्याला अगदी हट्टी बनवून ठेवला आहे. त्यामुळे स्वारी एकदा का रुसून बसली की बसलीच. त्याला आधी शोधून काढणे कठीण, मग त्याला मनवणे हे एक कठीण आणि बोलते करणे हे तर त्याहूनही कठीण. हसण्याचे तर नावच काढू नका. त्यासाठी मला किती मिनतवारी करावी लागली ते अगदी विचारू नका. शेवटी महत्प्रयासाने स्वारीची कळी खुलली. तीही आपल्यावर मेहेरबानी म्हणून! आता मात्र कृष्ण अगदी खुशीत आला आहे आणि त्याच्या नाराजीची पूर्ण राजी झाली आहे. परंतु तो रुसला होता की नाराज झाला होता हे मात्र मला विचारू नका. कारण त्याचे कारण मलाही अजून कळलेले नाही. बरे, ते जाऊ द्या. आता या तुमच्या कृष्णाला तुम्ही ताब्यात घ्या आणि त्याची मर्जी सांभाळीत रहा. तो आता तुमचा प्रश्न आहे. त्याची जबाबदारी आमच्यावर अगदी मुळीच टाकू नका.

पण यशोदामाई, या कृष्णाला मी शोधून आणले व त्याचा राग घालवून त्याला पुन्हा खुशीत आणले ही माझी कामगिरी काही साधी नाही. त्यासाठी माझी कितीतरी शारीरिक व मानसिक शक्ती खर्ची पडलेली आहे. त्याची भरपाई तुमच्या नुसत्या कौतुकाच्या शब्दाने किंवा पाठीवरील थापेने होणार नाही. त्यासाठी तुम्ही मला काहीतरी प्रत्यक्ष बक्षीस देणेच आवश्यक आहे. हो की नाही कृष्णा?''

राधेच्या स्पष्ट व मजेशीर बोलण्याला यशोदा व कृष्ण या उभयतांनीही अत्यंत मोकळेपणाने हसून दाद दिली. यशोदेने हसून आपली मान डोलवली. तर कृष्ण हसत हसतच राधेला म्हणाला, ''राधे, तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. माझ्यासारख्या हट्टी मुलाला सरळ करणे ही साधी गोष्ट नाहीच मुळी. माझी जो मर्जी संपादन करतो व ती राखतो तो निश्चितच विशेष कौतुकास व बक्षिसासही पात्र आहे. तेव्हा यशोदामाई, तू खरेच राधेला एक छाऽऽनशी वस्तू बक्षीस म्हणून दे ना!''

कृष्णाच्या या बोलण्यावर यशोदेने हसून आपली संमती दिली. पण ती कृष्णालाच म्हणाली, ''अरे कृष्णा, हा तुझ्या व राधेमधील तुमच्या दोघांचा प्रश्न आहे. त्यात मला उगाचच कशाला आणतोस? तुझा राग तिने घालवलेला आहे.

त्यासाठी तिला किती सायास करावे लागले आणि काय कष्ट पडले हे तर तुलाच माहीत आहे. तेव्हा तूच काय ते ठरव आणि तिला योग्य असे बक्षीस दे. बघू या तरी तू तिला काय देतोस ते?''

यशोदेच्या बोलण्याने राधा व कृष्ण यांना अधिकच हसू फुटले. कृष्ण राधेकडे आपादमस्तक न्याहाळून पाहू लागला. राधेचीही उत्सुकता वाढून राहिली. थोड्यावेळाने कृष्ण राधेकडे पहात मिश्किलतेने म्हणाला,

''खरेच राधे, तुला काय बक्षीस द्यावे हा एक मोठाच प्रश्न आहे. मुळात त्या परमेश्वराने तुला सर्व काही आधीच देऊन ठेवले आहे. तुला लाभलेले स्त्रीत्व हेच एवढे नैसर्गिक आणि उत्कृष्ट व सुरेख अवस्थेतील आहे, की त्यात अधिक काही व कशाची भर टाकणे हे शक्यच नाही आणि म्हणून ते आवश्यकही नाही. आता तुझा जो बाह्य साज शृंगार आहे तोही या अनय मामाने तुला अगदी भरपूर दिलेला आहे. तुझा घागरा, तुझी चोळी, तुझी ओढणी ही वस्त्रेही अगदी उत्तम व एवढ्या मनोहारी रंगाची आहेतच, पण या अनय मामाने तर तुला सर्व आभूषणेही देऊन अगदी सजवूनच ठेवले आहे. तुझ्या हातातील ही कंकणे, गळ्यातील माळा, कमरेची मेखला, नाकात चमचमणारी चमकी, कानांतील कर्णभूषणे, मस्तकावरील केसांच्या मधोमध असलेली बिंदी, बस्! कशा कशाला म्हणून अनय मामाने कमतरता ठेवलेली दिसत नाही. मला तर तुला द्यायला काही वावच ठेवलेला नाही. पण एक अपुरेपणा मला जाणवतो. तुझ्या पायाच्या बोटात जोडवीही आहेत. परंतु तुझ्या पायात पैंजण मात्र दिसत नाहीत आणि पैंजणाशिवाय तर तुझ्या नाजूक पायांना शोभाच नाही. तेव्हा पैंजण हेच तुला अतिशय योग्य व सुरेख असे बक्षीस आहे असे मला अगदी निश्चितपणे वाटते. हो की नाही, यशोदामाई?''

कृष्णाच्या या बोलण्यावर यशोदेने हसून व संमतीदर्शक मान डोलवून आपली संमती लगेचच दिली. परंतु राधा मात्र कृष्णाच्या बोलण्याने अगदी लाजून लाजून पार लाल झाली. कृष्णाच्या शब्दांतून तिच्या विषयीच्या वर्षणाऱ्या प्रेमाने राधेला तर अगदी गुदमरल्यासारखेच झाले. लाजून मान खाली घालून ती जी बसली ती किती वेळ मान वरतीच करीना. तेवढ्यात यशोदेने तिच्या अलंकाराच्या कोशातून अत्यंत सुरेख अशी चमचमणारी व मधुर किणकिण करणारी चांदीची पैंजणे आणली आणि कृष्णाच्या स्वाधीन केली. कृष्णाने ती राधेच्या हातात अत्यंत प्रेमाने दिली. राधेने ती पैंजणे लगेचच व तेथल्या तेथेच पायात घालावी या कृष्णाच्या प्रेमाच्या आग्रहाला राधेने लाजूनच संमती दिली. खाली बसून व वाकून ती पैंजणे पायात बांधताना राधेची गडबड होऊ लागली. तिला ते प्रयत्नपूर्वकही जमेना आणि तिला अधिकाधिक ओशाळल्यासारखे होऊ लागले. तिची होणारी तारांबळ व अडचण कृष्णाच्याच लक्षात आली आणि लागलीच पुढे होऊन कृष्ण तिच्या मदतीसाठी सरसावला. कृष्णाने आपल्या हाताने राधेच्या नाजूक पायात ती सुरेख पैंजणे बांधली आणि त्या पैंजणाचे सौंदर्य जणू अधिकच वाढल्यासारखे झाले.

राधेला मात्र आता काय करावे ते सुचेना. तिने वाकून यशोदेला नमस्कार केला आणि तिचे आशीर्वाद घेतले. कृष्णाच्या समोर येऊन उभी राहिली असता कृष्णानेच तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन हस्तांदोलन व अभिनंदन केले.

नंतर ती आपली पैंजणे कौतुकाने दाखविण्यासाठी अनयाच्या जवळ येऊन उभी राहिली. एवढा वेळ अस्वस्थ असूनही स्वस्थतेने सर्व पहात व ऐकत असणारा अनय एकदम आवाज चढवून राधेला म्हणाला,

''राधे, मला वाटते तुझे झाले तेवढे कौतुक पुरे झाले. कारण हा तुमचा कौतुक सोहळा कधी संपेल असे मला तरी वाटत नाही. स्वतःचे तू कौतुक तरी किती करून घेणार आहेस? कृष्णाला तू शोधून आणलेस म्हणजे काही मोठा पराक्रम केलेला नाहीस. आता यशोदामाईने तुझे कौतुक केले हा त्यांचा मोठेपणा आहे. पण म्हणून तूही लगेचच लहान मुलासारखे त्यांच्याकडून बक्षीस कसले मागून घेतेस? तुला काय कमी आहे? घरी काही कमी नाही आणि बाकी मीही तुझे लाड जमेल तसे पुरवीत असतोच की नाही? बरे, मी तुला पैंजणही आणून दिले होतेच ना? पण ते तुझ्या मनाला पसंत पडले नाहीत म्हणून तूच ते वापरीत नाहीस. पुढच्या आठवड्यात मी मथुरेला जाणार होतो तेव्हा तुझ्या आवडीचे पैंजण मी तुला आणून देणारच होतो ना? पण तुला तेवढा धीर नाही. कृष्णाला वाटले की बिचाऱ्या तुझ्याकडे पैंजण जणू नाहीतच. मग त्याच्या सांगण्यावरून यशोदामाई तुला तिचे पैंजण देते काय, तू ते घेतेस काय, तुला ते बांधताही येत नाहीत काय आणि कृष्ण ते तुझ्या पायात बांधतो काय. सर्वच पोरखेळ.

राधे, तुझा हा पोरकटपणा जाणार तरी कधी? बरे, ती पैंजणे घेऊ की नको हे मला विचारण्याची आवश्यकता तर तुला वाटलीच नाही. विचारणे काय, तुला तर माझ्याकडे पहायलाही वेळ नाही. तुला तर माझ्याकडे लक्ष द्यायलाही अजून वेळच मिळालेला दिसत नाही. मी येथे केव्हापासून तुझी वाट पहात ताटकळत बसलो आहे त्याचे तुला काहीच कसे वाटत नाही? अगं, तेथे घरी आई तुझी वाट पाहून पाहून थकली. किती वेळ झाला तरी तुझा पत्ताच नाही. म्हणून शेवटी तुला बोलावण्यासाठी स्वतः मी येथे आलो. घरी किती कामे पडून व अडून राहिली आहेत याची तुला काही तरी कल्पना आहे का? बरे, आईला जर सांगितले की 'राधा येईपर्यंत थांबून रहा. ती आल्यावर सर्व कामे करील', तर आई ऐकायची नाही आणि थांबायचीही नाही. सर्व कामे स्वतःच करणार आणि झेपले नाही की मग सारखी चिडचिड व बडबड करीत रहाणार. पण आईने तरी आता किती कष्ट करायचे? तिचेही वय झाले. तिलाही आता जास्त दगदग झेपत नाही. हे तुला कळायला नको? आतापर्यंत तिने खूप सहन केले आणि अनेक खस्ता खाऊन मला वाढविले. आता आपला विवाह झाल्यानंतर तरी तिला विश्रांती मिळायला नको का?

राधे, मला वाईट याचेच वाटते की हे सर्व मला तुला समजावून सांगण्याची वेळ येत आहे. बाकी सर्व तुला अगदी व्यवस्थित कळते आणि एवढी साधी गोष्टच तुझ्या लक्षात येत नाही वाटते? काही तरी कामाच्या निमित्ताने तू येथे वाड्यात आलीस. आता यशोदामाईंनी त्यांना कृष्णाची काळजी वाटत असल्यामुळे तुला त्याला शोधून आणावयास सांगितले हे त्यांच्या दृष्टीने अगदी साहजिक व बरोबरच आहे. परंतु तू जर त्या वेळेसच त्यांना मोकळेपणाने सांगितले असतेस, की घरी पुष्कळ कामे आहेत आणि सासूबाई तुझी वाट पहात आहेत, तर मला नक्की खात्री आहे की त्यांनी तुला घरीच जायला सांगितले असते. बरे, कृष्णाला शोधायला म्हणून गेलीस ती गेलीसच. बाकी सर्वच मग तू विसरलीस. आपले घर आहे,

घरी सासूबाई आहेत, पती आहेत, बरीच घरकामे आहेत, या कशा कशाची म्हणून तुला आठवण झाली नसणारच. पण कृष्णाला शोधायला काही एवढा वेळ लागणे शक्य नाही. त्यानंतर मग तुम्ही बोलतच बसले असणार. म्हणून मग येथे यायला उशीर झाला असणार. आताच बोलत न बसता घरी लवकर जायला हवे याचे तुला तरी भान नको का?

हे बघ राधे, कृष्ण अजून लहान आहे. त्याचे हे खेळण्या बागडण्याचे वयच आहे. तेव्हा त्याचे एक ठीक आहे. पण तुझे तसे नाही. तुला घरी कामे आहेत, हे तू तरी लक्षात ठेवावयास हवेस. ते विसरून तू जर नुसती या कृष्णाबरोबरच खेळत राहिलीस तर आपल्या संसाराचा खेळखंडोबा होण्यास मुळीच वेळ लागणार नाही. आपल्याला आपले घर व संसार सांभाळायचा आहे हे विसरू नकोस. तेव्हा आता येथे फुकट वेळ दवडीत न बसता आपण लगेच घरी जाण्यास निघूया. चल, चल, लवकर!''

अनयाचे बोलणे व त्याचा बोलण्याचा सूर ऐकून त्या ठिकाणी एकदम गंभीर शांतता पसरली. राधा तर अगदी वरमली आणि थोडीशी घाबरलीही. यशोदेलाही काय बोलावे ते सुचेना. ती स्वस्थच बसून राहिली खरी, पण मनातून तीही अस्वस्थच झाली होती. पण कृष्ण मात्र अगदी शांत होता. शेवटी शांततेचा भंग करीत कृष्णच अनयाशी बोलू लागला.

''अरे, अनय मामा, तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. परंतु यात राधेचा काहीच दोष नाही. खरी चूक घडली आहे ती माझ्याकडूनच घडली आहे. राधा शोधत शोधत मला येऊन भेटली खरी. पण त्यासाठी तिला बराच वेळ लागला. कारण मीच अशा आड जागी जाऊन बसलो होतो, की तिला मी सहजासहजी सापडणे शक्यच नव्हते. यात तिची काहीच चूक नाही. बरे, भेटल्यावरही मी उगाचच एवढा रुसून बसलो होतो की माझी समजूत काढता काढता तीच बिचारी रडकुंडीला आली. शेवटी तिचे अश्रू पाहूनच माझेही मन द्रवले आणि मी परत वाड्यात येण्यास तयार झालो. 'मला उशीर झालाय, मला उशीर होतोय. घरी माझी सर्वजण वाट पहात असतील. माझी सर्व कामे खोळंबून रहिली आहेत' असे तर राधा सारखी मोठमोठ्याने पुटपुटतच होती. पण मीच रागावल्यामुळे तिच्या बोलण्याकडे लक्षच देत नव्हतो. शेवटी तिनेच माझा हात धरून मला जवळजवळ ओढत ओढतच येथे आणले हे अगदी खरे आहे. तेव्हा अनय मामा, कृपा करून राधेवर तू मुळीच रागावू नकोस. रागवायचे असेल तर मला मात्र अगदी खुशाल रागव. मी सर्व निमूटपणे ऐकून घेईन. कारण सर्व चूक माझीच आहे. आणि अनय मामा, माझ्यावर सुद्धा रागवू नकोस ना! पाहिजे तर मी तुझी क्षमा मागतो. मग तर झाले?''

कृष्णाचे अजिजीचे पण लाघवी बोलणे ऐकून अनयालाही अगदी वरमल्यासारखे झाले. तो एकदम हसून कृष्णाला म्हणाला, ''अरे कृष्णा, तुझ्यावर मी केव्हातरी रागावणे शक्य आहे का? मीच काय, या गोकुळातील कोणीच तुझ्यावर अगदी कधीच रागावणे शक्य तरी आहे का? तुझे हसणे, बोलणे, खेळणे हा सर्व नेहमीच आमच्या कौतुकाचा विषय असतो. अर्थात काहीवेळा तुझ्या चेष्टेचा व खोडकर स्वभावाचा आम्हाला राग येतो खरा. नाही असे नाही. परंतु पुन्हा तुझी भेट झाली, तुझे बोलणे ऐकले आणि तुझे हसणे पाहिले की मात्र तो आमचा राग कुठच्या कुठे पसार होतो ते कळतच नाही. कारण तो राग क्षणिक व अगदी वरवरचा असतो. त्यामुळे तो राग धरून ठेवता येणे तर अशक्यच आहे.

कृष्णा, तुला मी खरे सांगतो की मी तुझ्यावर तर रागावलो नव्हतोच, परंतु राधेवरही रागावलो नव्हतो.  खरे तर मी माझ्यावरतीच रागावलो होतो.  संसाराच्या नित्य नव्या कटकटींना व अडचणींना सतत उत्साहाने तोंड देणे हे मला तरी कठीणच जाते.  कुठल्याही गोष्टीत आमचे तिघांचे एकमत असे कधी होतच नाही.  आईचे एक म्हणणे असते, तर राधेचे म्हणणे दुसरेच असते.  मग निर्णय घेताना पंचाईत माझीच होते.  राधेची बाजू घ्यावी तर आईला राग येतो आणि आईची बाजू घ्यावी तर मग राधा नाराज होऊन बसते.  आईची मुलगा म्हणून माझ्याकडून अपेक्षा रहाते, तर राधेची पती म्हणून माझ्याकडून अपेक्षा रहाते.  बरे, कोणाचीही बाजू न घेता स्वस्थ बसून रहावे तर दोघीही नाराज होऊन रहातात.  घरात सतत काही ना काही कारणामुळे किंवा कारणावाचूनही धुसफुस चालूच असते.  घरात शांतता अशी कधी नसतेच आणि असली तरी ती वादळापूर्वीची असते.  केव्हा ढगांचा गडगडाट होईल, विजा चमकतील आणि शेवटी अश्रुधारा बरसू लागतील याचा काहीच नेम नसतो.  तेव्हा परिस्थिती असह्य झाली की साहजिकच मनाची चिडचिड होते आणि त्रागाही होतो.  मग मी अगदी अगतिक होतो.  पण केव्हा तरी, मगाशी मी जसे राधेला बोललो तसे, सर्व एकदम उफाळून येते एवढेच!

राधेला त्या सर्वाची आता सवय झालेली आहे.  त्यामुळे तीही त्याचा जास्त त्रास करून घेत नाही आणि माझेही मन थोडेसे मोकळे झाल्यासारखे होते.  पण कृष्णा, तुला हे सर्व सांगण्यात काहीच अर्थ नाही.  अरे, आम्हा सांसारिकांची दुःखे, अडचणी व ताप तुला कसे कळणार?  तू तर अजूनही एक लहानसा बच्चाच आहेस.  तू खरेच भाग्यवान आहेस, की तुला अद्यापिही या संसाराची झळ लागलेली नाही.  असो, कृष्णा, आता माझा कोणावरच कसलाही राग राहिलेला नाही. आम्ही आता निघतो.  कारण आता तर फारच उशीर झालेला आहे.  आणि त्याला तर आता मीच कारणीभूत झालेलो आहे. तेव्हा त्याची जबाबदारी मी एकटाच घेईन आणि आईला काय तो खुलासा करीन.  तुम्ही कोणीही आमची काळजी करू नका. बराय, यशोदामाई, आम्हाला आता निघण्यासाठी निरोप द्या.''

त्यावर हसून कृष्ण म्हणाला, ''अनय मामा, तू मोकळ्या मनाने येथून जात आहेस हे चांगले झाले.  असाच तू नेहमी मोकळा सोकळा रहा.  त्या त्या वेळेसच त्या त्या व्यक्तींशी मोकळेपणाने बोलत व विचारीत रहा म्हणजे झाले.  एवढेच मी तुला आता सांगतो.  आता तुझ्या सांसारिक अडचणींविषयी मला पूर्ण सहानुभूती आहे.  परंतु त्याविषयी आणि माझ्या असलेल्या वा नसलेल्या सांसारिक अनुभवाविषयी आपण केव्हातरी सवडीने सविस्तर बोलू.  आता या वेळी घाई गडबडीत नको.  परंतु जाताना बरोबर माईने केलेला खरवस मात्र घेऊन जा.  तू, राधा व तुझी आई म्हाळसा काकू असे सर्व मिळून जरूर त्याचे सेवन करा.''

असे म्हणून कृष्णाने स्वतः आत जाऊन एका पात्रातून खरवस आणला आणि ते पात्र अनयाच्या हातात दिले. कृष्णाने राधेकडे पाहून व हसून तिला निरोप दिला.  परंतु राधा मात्र बरीचशी गंभीरच होती.  जेमतेम किंचितसे हसल्यासारखे करून लगबगीने ती अनयाच्या मागोमाग वाड्याबाहेर पडली.  अनय व राधा यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे बघत कृष्ण मात्र बराच वेळ तेथेच उभा राहिला होता.  त्याची मुद्रा अत्यंत गंभीर झाली होती.  पुढे घडणाऱ्या घटनांचे सूचक भावच त्याच्या मुखावर जणू उमटलेले होते.''

कृष्णचरित्रातील राधेच्या भक्तिभावाच्या कथेचे भावपूर्ण व समग्र वर्णन करता करता नारदाच्या अमोघ वाणीचा ओघ केव्हाही थांबेल असे वाटत नसतानाच, नारद बोलायचा क्षणभर थांबला. ते त्याचे थांबणे सतत बोलल्यामुळे आलेल्या शारीरिक थकव्यासाठी नव्हते. तर बोलता बोलता त्याचे मन अंतर्मुख झाल्यामुळेच त्याचा शब्दौघ विसावल्यासारखा झाला होता. त्याच क्षणाचा उपयोग करून घेत लक्ष्मीनेच नारदाशी बोलण्यास सुरुवात केली.

''हे नारदा, सगुण प्रेमभक्तिभावाच्या कथांचे गायन करताना तुझ्या अंतःकरणातील भावपूर्णता प्रसंगात उतरते, की प्रसंगातील भावपूर्णता तुझ्या अंतःकरणात भरून रहाते हे सांगणे कठीण आहे. कारण त्यातील नेमका फरक दाखविता येणे शक्यच होणार नाही. पण तुझ्या त्या भावपूर्ण वर्णनाने माझी अवस्था मात्र निश्चित भावपूर्ण होते एवढेच मला समजते. राधा व कृष्ण यांच्या प्रेमाची झालेली सुरुवात, त्यातून त्यांचे जुळत असलेले प्रेमसंबंध, त्या प्रेमसंबंधामध्ये आलेले अडचणींचे प्रसंग यांचे वर्णन तुझ्याकडून अगदी यथार्थतेने होत आहे. ते ऐकताना पुढे काय घडले ते ऐकण्याची उत्सुकता तर निर्माण होतेच, परंतु त्याच बरोबर एक प्रकारची आर्तताही निर्माण होते. राधेची मनःस्थिती काय झाली असेल या विचाराने माझ्याही मनाला उद्विग्नता येते. राधेच्या मनाचीही, नाही म्हटले तरी, थोडीशी दोलायमान अवस्था झालीच असणार ना? बिचारी राधा, आता कुठे तिचे व कृष्णाचे प्रेमसंबंध जुळायला लागले होते, तर त्यात असे अडथळे निर्माण व्हायला सुरुवात झाली.

पण नारदा, त्या अनयाचे लक्षण मात्र मला काही ठीक दिसत नाही. वागण्या बोलण्यात तो अगदी समजूतदारपणा दाखवीत असला तरी तो काही खरा वाटत नाही, तर वरवरचाच वाटतो. त्याचे मनही तेवढेसे स्वच्छ व मोकळे दिसले नाही. राधा व कृष्ण यांचे हातात हात घालून तेथे हसत हसत येणे, कृष्णाने राधेशी प्रेमाने वागणे, बोलणे, राधेनेही त्याला त्याच प्रेमाने प्रतिसाद देणे हे अनयाला तेवढेसे आवडलेले दिसले नाही. कृष्णाने राधेच्या पायात पैंजणे स्वतःच्या हाताने बांधली हे तर अनयाला मानवणे कधी शक्यच नाही. अर्थात त्यालाही पूर्णपणे दोष देता येत नाही. पण मला यातून अशी काळजी वाटते, की या सर्वाची परिणती पुढे राधेला त्रास होण्यातच होणार. तिची बाह्य परिस्थिती त्यामुळे अधिकच कठीण होणार. बरे, राधेला त्रास झाला म्हणजे त्याचा त्रास कृष्णालाही होणार. असो.

हे नारदा, तू मला आता एवढेच सांग, की या सर्व अडचणी व अडथळे यातून राधा व कृष्ण यांनी काय व कसा मार्ग काढला? आणि त्यांचे प्रेमसंबंध कसे वाढत व फुलत राहिले? मुख्य म्हणजे त्यातून राधेच्या ठिकाणी कृष्णाविषयी भक्तिभाव कसा निर्माण झाला? आणि त्या भक्तिभावाची पूर्ती तिने कशी करून घेतली? मला हे अगदी सर्व सर्व पूर्णपणे व विस्तृतपणे ऐकायचे आहे. त्याशिवाय माझ्या श्रवणतृषेचे खरे शमन होणारच नाही.''

लक्ष्मीची वाढत चाललेली श्रवणाची तहान पाहून नारदाला अत्यंत संतोष झाला. कारण श्रोत्याचे पूर्ण समाधान होत नाही म्हणूनच वक्त्याच्या बोलण्याचा प्रवाह अखंडपणे चालू रहातो हे नारद स्वानुभवाने जाणून होता. त्याचबरोबर स्वमुखातून प्रगटणारे सगुण प्रेमभक्तिचे गायन स्वतःच ऐकताना होणारा आनंद नारदाच्या अनुभवाचा असल्यामुळे, नारदाची बोलण्याची आतुरता ही लक्ष्मीच्या श्रवणाच्या आतुरतेपेक्षा जराही कमी तर नव्हतीच, पण त्यापेक्षा अधिकच होती. त्यामुळे

लक्ष्मीच्या काळजीच्या सुरातील बोलण्याचा परिणाम एवढाच झाला, की नारदाचे थोडावेळ थांबल्यासारखे वाटणारे बोलणे पुन्हा सहजतेने, सखोलतेने व वेगाने प्रगट होऊ लागले.

''अगं लक्ष्मी, प्रेमामध्ये बाह्य अडचणी या येणारच. खरे तर, अडचणी या नाहीत कोठे? जीवनातही काही ना काही अडचणी या येत असतातच की! मग परमेश्वराच्या सगुण प्रेमभक्तिलाही बाह्य अडचणी येण्याची शक्यता आहेच. तसे बघायला गेले तर सगुण प्रेमभक्ती ही एक अडथळ्याचीच तर शर्यत आहे. फक्त सगुण प्रेमामुळे मनातल्या अडचणी शिल्लक रहात नाहीत, मग बाह्य अडचणींवर मनोबळाने व कौशल्याने सहज मात होत रहाते. ज्याप्रमाणे पावसाच्या सतत वर्षावामुळे पर्वतमाथ्यातून उगम पावलेला नदीचा प्रवाह वाटेतील अनेक अडथळ्यांना कधी पार करीत, तर कधी दूर सारीत सागराशी संगमात विलीन होतोच होतो. त्याचप्रमाणे ईश्वराच्या सगुण प्रेमाच्या वर्षावातून अंतरात निर्माण झालेला सगुण प्रेमाचा प्रवाह हा सुद्धा अंतर्बाह्य अडथळे व अडचणी यावर मात करून वहातच रहातो. सुरुवातीला संकोच, भीड, मनाची दुर्बलता, होणाऱ्या परिणामांची भीती, लौकिकाची चाड, मूळचे संस्कार या गोष्टी मनाला ईश्वरी सगुण प्रेमापासून वंचित ठेवतात आणि मनात याच व अशाच अनेक गोष्टी अडथळे होऊन रहातात.

परंतु सगुण प्रेमाच्या लागलेल्या गोडीमुळे त्या प्रेमाचा बाह्यांगाने स्वीकार करणेही एकीकडे क्रमप्राप्त ठरल्यामुळे चालूच रहाते. त्यातूनच प्रेमाचा स्पर्श मनाला होत राहून, ते प्रेम मनावरील प्रकृती स्वभावाच्या आवरणाचा भेद करून मनात हळुहळू उतरतच रहाते. मनात त्या सगुण प्रेमाचे निर्झर निर्माण होऊन त्याच्या गुणधर्मानुसार वाहू लागतात. एकीकडे सगुण प्रेमाचा वर्षाव त्या मनावरती होतच असतो. त्यामुळे ते प्रेमाचे निर्झर वेग घेतात आणि नित्य प्रवाही रहातात. ते प्रेमाचे प्रवाह सातत्याने व वेगाने वहातच राहिल्यामुळे मनातील सर्व अडथळे एकतर विरघळून जातात किंवा बाजूला होतात. ईश्वराच्या सगुण रूपाकडून मिळालेले प्रेम पुन्हा त्या ईश्वराच्या सगुण रूपालाच अर्पण करावे अशी मूळचीच ओढ त्या सगुण प्रेमात सहजपणे असते. त्यामुळे त्या मनातील सगुण प्रेमाला बाह्यांगानेही प्रगट होणे अपरिहार्य होते आणि मग त्या प्रेमाला बाह्य अडचणी निर्माण होतात. कौटुंबिक व सामाजिक बंधने, सर्वसामान्यांची या प्रेमाकडे पाहण्याची वासनेने दूषित झालेली दृष्टी, जननिंदा व त्यातून केला जाणारा मानसिक किंवा वेळप्रसंगी शारीरिकही छळ अशा बाह्य अडचणी समोर 'आ'वासून उभ्या रहातात. त्या अडचणींना टक्कर न देता त्या कौशल्याने बाजूला करूनच त्या अडचणीतून मार्ग काढता येतो. त्याहीपेक्षा मनात निर्माण झालेल्या भावबळाने या बाह्य अडचणींकडे दुर्लक्षच करणे हाच त्यावरचा एकमेव सोपा उपाय असतो. सगुण प्रेमाच्या नित्य स्मरणात व सगुण भक्तीच्या ध्यासात असलेल्यांना खरे तर असल्या बाह्य गोष्टींकडे लक्ष देण्याचे अवधानच नसते. तेवढा वेळही त्यांच्या दृष्टीने फुकट दवडल्यासारखा असतो.

हे लक्ष्मी, तेव्हा राधा व कृष्ण प्रेमाने एकमेकांना नित्य भेटत राहिले. राधा काहीतरी कामाच्या निमित्ताने जवळ जवळ रोजच नंदाच्या वाड्यावर येत असे. मग राधा व कृष्ण कोणाच्या नकळत कुंजवनात जाऊन बसत. कधी कृष्ण पुढे जाई व राधा थोड्या वेळाने मागून जाई. तर कधी राधा आधी पुढे जाई व कृष्ण मागून तेथे जाई. एकदा कुंजवनात जाऊन बसले की कितीतरी वेळ त्यांचे बोलणे होतच राही. एखादे वेळेस राधेला घरी जाण्याची घाई असे, तर एखादे वेळेस कृष्णच काहीतरी गडबडीत असे. तरीही थोडा वेळ तरी एकमेकांना भेटायचेच असे त्यांनी नक्की व पक्के ठरविले होते. भेटण्यात व

बोलण्यात कसा व किती वेळ निघून जाई याचे उभयतांना भानच नसे. अचानक भानावर आल्यावर मात्र दोघांची एकदम गडबड गडबड सुरू होई. त्यातून मग कधी राधेची नाराजी, तर कधी कृष्णाची नाखुशी असे प्रकार सुरू होत. पण ते तेवढ्यापुरतेच असे. पुन्हा दुसऱ्या दिवशी दोघांची भेट होतच असे आणि त्यावेळेस कुठल्याही नाखुशीचा व नाराजीचा पत्ताच नसे. काही वेळेला मधे मधे राधेचे येणे होत नसे. त्यावेळेस कृष्ण थोडासा अस्वस्थ होत असे. परंतु राधेच्या बाह्य अडचणींची कल्पना असल्यामुळे कृष्ण मोठ्या प्रयत्नाने धीर धरून असे. राधेच्या बेचैनीची कृष्णाला निश्चितपणे खात्री असे आणि कृष्णाची अधीरता राधा जाणून असे. त्यामुळे त्या उभयतांची जेव्हा पुन्हा प्रत्यक्ष भेट होई त्या वेळेस त्यांच्यातील परस्परांवरील प्रेमाचा जिव्हाळा व आपलेपणा अगदी मोकळेपणाने प्रगट होत असे. त्यासाठी जराही वेळ लागत नसे आणि त्याला कशाचीही आडकाठी येत नसे.

कधी कधी राधा इतर सर्व गवळणींबरोबरही येऊन कृष्णाला भेटत असे. त्यांच्यासह कृष्णाशी खेळत असे, गंमत जंमतही करीत असे. परंतु कृष्णाला एकट्याने एकांतात भेटण्याची ओढ मात्र तिच्या ठिकाणी जबरदस्त असे. त्याशिवाय तिच्या मनाचे समाधान कसे ते होतच नसे. त्यातूनही नवलाईची गोष्ट म्हणजे कृष्णाच्याही ठिकाणी राधेला एकट्याने व एकांतात भेटण्याची तेवढीच व तशीच ओढ असे. त्यामुळे अशी भेट घेण्यामध्ये कृष्णाचा नेहमीच पुढाकार असे. एखादे वेळेस जरी अगदी कुंजवनातच जावयास नाही मिळाले, तरी कृष्ण राधेला वाड्यातल्या वाड्यातच एका बाजूला घेऊन जाई आणि थोडावेळ तरी त्यांची भेट होतच असे.

हे लक्ष्मी, मागे मी तुला सांगितल्याप्रमाणे कृष्णाची दिनचर्या बदलली. गोपांबरोबर सकाळी सकाळीच तो गुरे राखण्यासाठी म्हणून जो वाड्याबाहेर पडे तो संध्याकाळ झाल्यानंतरच घरी परतत असे. पण त्यावरही कृष्णाने उपाय शोधून काढलाच होता. त्या गवळणी जेव्हा पाणी भरून आणण्यासाठी यमुना नदीवर जात असत त्यावेळेस कृष्ण त्यांची आपणहून गाठ घेई आणि त्यांना भेटून त्यांना प्रेमाचा अनुभव देत असे. मग राधेनेही पाणी भरण्याची कामगिरी स्वतःवर घेतली. सासूबाईंना तिने समजावून सांगितले की त्यांचे आता वय झाले आहे आणि त्यांची तब्येतही ठीक नसते. तेव्हा त्यांनी आता पाणी भरण्याची वगैरे दगदग न करता घरी विश्रांती घेणे हेच योग्य आहे. सासूबाईंवर ही मात्रा बरोबर लागू पडली आणि त्यांनी राधेला पाणी भरून आणण्यासाठी यमुना नदीवर जाण्याची अगदी खुशीने परवानगी दिली. राधेला मग घराबाहेर पडण्याची चांगलीच संधी मिळाली. पण ती मात्र गवळणींबरोबर पाणी आणण्यास न जाता थोड्या वेळाने जाई. त्यामुळे मग कृष्णाची एकट्याने भेट घेणे राधेला शक्य होत असे.

अशा अनेक युक्त्या प्रयुक्त्या करीत राधा कृष्णाची भेट हर तऱ्हेने घेतच राहिली. यातील अनेक युक्त्या कृष्णानेच राधेला सुचविल्या होत्या, तर काही राधेने स्वतः शोधून काढल्या होत्या. कारण खऱ्या गरजवंतालाच नवीन नवीन शोध लागत असतात आणि नवीन नवीन मार्ग दिसत असतात. परंतु आपले ध्येय हर प्रयत्नाने साधता साधता तो ते साधतोच साधतो. कृष्णप्रेमाच्या लागलेल्या गोडीमुळे कृष्णप्रेम अनुभवणे ही राधेची आत्यंतिक गरज होऊन राहिली होती. त्यासाठी कृष्णभेटी घेणेही तिच्यासाठी अत्यंत आवश्यक होते. तिचे ध्येय निश्चित झालेले होते आणि ते तिच्या दृष्टीक्षेपातही होते. आता ते ध्येय गाठण्याचा मार्ग शोधून काढण्याची जबाबदारी सर्वस्वी राधेचीच होती. परंतु हे कृष्णप्रेमाच्या गोडीसाठी होत

असल्यामुळे त्या जबाबदारीचा भार किंवा ताण मात्र राधेला अजिबात जाणवत नसे. कृष्णभेटीच्या अनुभवाचे स्मरण, पुनर्भेटीची ओढ आणि तेच एक व्यवधान यामुळे राधा नेहमी कृष्णाच्या ध्यासातच असे. त्यामुळेच कृष्णप्रेमासाठी राधा ही सदैव आर्तच असे आणि त्याची पूर्तता कृष्णभेटीतील प्रेम अनुभवण्यानेच होत असे.''

राधाकृष्णाच्या प्रेमपुराणात आतून रमलेला नारद त्याचे वर्णनही अगदी रंगूनच करीत होता. त्याला बोलताना मध्येच थांबवणे लक्ष्मीच्या अगदी जिवावर येत होते. परंतु तिचाही अगदी नाइलाज होत होता. तिच्या मनात आलेला प्रश्न विचारल्याशिवाय तिलाही चैनच पडत नव्हते. त्यामुळे न राहवून शेवटी लक्ष्मीने नारदाला मध्येच प्रश्न विचारलाच.

''हे नारदा, या कृष्णाची एक गोष्ट माझ्या अजूनही लक्षात येत नाही, की एवढी व्यवधाने तो कृष्ण कशी काय सांभाळीत होता? एकीकडे गुरे राखायला जायचे, तेथे गोपांशी खेळायचे, त्यांच्या संगे शिदोरी खायची, यमुना तीरावर गवळणींची भेट घ्यायची आणि पुन्हा राधेलाही कुंजवनात एकांतात भेटायचे. एखाद्याची केवढी तरी तारांबळच उडाली असती. मग कृष्ण हे सर्व कसे काय जमवत होता? नाही म्हटले तरी एवढी व्यवधाने सांभाळण्याचा थोडासा तरी ताण त्याच्याही मनावर येतच असणार. मुख्य म्हणजे, तू जे सांगत आहेस, की राधा व कृष्ण नित्य कुंजवनात भेटून प्रेमाचा अनुभव घेत असत, म्हणजे निश्चित तरी काय करीत असत? त्यांचे एवढे बोलणे तरी काय होत असे? कुठल्या विषयांवर त्यांचे बोलणे होत असे बरे? हे सर्व ऐकण्याची व जाणून घेण्याची मला अतिशय आतुरता लागून राहिलेली आहे. तेव्हा त्याची पूर्ती हे नारदा, तू आधी करावीस असेच मी तुला विनविते.''

लक्ष्मीने मध्येच विचारलेल्या प्रश्नामुळे नारद जराही नाराज झाला नाही. लक्ष्मीच्या मनात आलेला प्रश्न हा अगदी साहजिकच आहे हे नारदालाच जाणवले. त्यामुळे लक्ष्मीने मोकळेपणाने प्रश्न विचारल्याचा नारदाला आनंदच झाला. लक्ष्मीच्या प्रश्नावर मोकळेपणाने हसून नारद म्हणाला,

''हे लक्ष्मी, तुला आलेला प्रश्न अगदी बरोबर आहे. एवढ्या अनेक गोष्टी एकाच वेळी साधून करणे हे सामान्य मनुष्याच्या दृष्टीने महा कर्मकठीणच आहे. एवढी व्यवधाने एकदम सांभाळून त्यांची पूर्ती करताना कोणाच्याही मनाला ताणच झाला असता. परंतु हेच तर कृष्णाचे वेगळेपण व वैशिष्ट्य होते. मुळात तो हे सर्व सर्वांविषयीच्या आत्यंतिक प्रेमाने आणि त्यांची त्यांची पूर्ती करण्यासाठी करीत होता आणि हे सर्वजण म्हणजे इतर कोणी नसून कृष्णाच्या प्रेमाची मंडळी होती. या व्यवधानांच्या निमित्ताने कृष्णाचे मन त्याच्या प्रिय जनांचे स्मरण, त्यांच्या सुख स्वास्थ्याविषयीचे विचार, त्यांच्या संबंधातल्या आठवणी यांनीच भरून येई. त्या निमित्ताने कृष्ण त्यांच्या प्रेमाचाच जणू अनुभव घेत असे. या प्रेमामुळे कृष्णाचे मन नेहमी मोकळेच असे. त्यामुळे त्याच्या मनाला कधीही व कोणताही ताण असा जाणवला नाहीच, तर त्याला त्याचा अतिशय आनंदच होत असे.

त्याच बरोबर कृष्णाची बुद्धी ही सुद्धा जन्मतःच शुद्ध, तीव्र व कुशाग्र होती. त्यामुळे बाह्यांगाने सुद्धा ही सर्व व्यवधाने तो अत्यंत कुशलतेने व सावधपणे सांभाळू शकत होता. त्याची त्याने कोणापाशी वाच्यताही केली नाही आणि तो जे काही करीत होता त्याचा पत्ताही त्याने कोणाला लागू दिला नाही. त्यामुळे सकाळी गाईगुरे यांना घेऊन कृष्ण जो बाहेर पडे, तो संध्याकाळी गाईगुरांना घेऊन परत घरी येई. मधल्या काळात अनेक गोष्टींची व्यवधाने सांभाळून त्यांची योग्य

प्रकारे पूर्ती तो अगदी सहजपणे करीत असे. त्या वेळी तो कोणाला व कसा भेटत असे आणि त्यांच्या त्यांच्या भावाची पूर्ती कशी करीत असे हे एक तर त्या कृष्णाला माहीत आणि दुसरे त्या व्यक्तीलाच माहीत. बाकीच्यांना त्याचा थांगपत्ता कधी लागलाच नाही. येथे 'त्याचा' म्हणजे तो कोणाला भेटला याचा, तो कसा भेटला याचा, त्यांच्या भावाची पूर्ती त्याने कशी केली याचा आणि मुख्य म्हणजे त्या कृष्णाच्या मनाचा थांगपत्ता कोणालाही कधी कळूच शकला नाही.

हे लक्ष्मी, मागे तुला सांगितल्याप्रमाणे कृष्णाने गाईगुरांना चरायला नेण्याची कामगिरी स्वतःहून व थोड्याशा हट्टानेच नंद यशोदा यांच्याकडून मागून घेतली होती. खरे तर, नंद हा गोकुळचा राजा असल्यामुळे त्यांच्याकडे अनेक नोकर चाकर होतेच. त्यामुळे कृष्णाला असली कामे करण्याची आवश्यकता अशी नव्हतीच. परंतु त्याचे जे बालमित्र असे गोपबाळ होते त्यांना गाईगुरे चरायला नेण्याचे काम करणे त्यांच्या घरच्या गरीब परिस्थितीमुळे तर आवश्यकच होते. तेव्हा आपल्या प्रिय मित्रांना भेटता यावे, त्यांच्याबरोबर हसता खेळता यावे म्हणूनच तर मुळात कृष्णाने युक्ती योजून गुरे राखण्याची जबाबदारी स्वीकारली होती. कृष्णाला काही गुरे राखण्याची हौस नव्हती. पण केवळ आपल्या मित्रांवरील लोभाने तो गुरेही राखायला तयार झाला होता. यालाच म्हणतात खरे मित्रप्रेम! ज्या प्रेमामध्ये बाह्यांगाचा असलेला उच्च-नीच हा फरक कुठच्या कुठे लयाला जातो आणि ते प्रेम सर्वांशी समभावाने वागून सर्वांनाच सम पातळीवर आणते. म्हणूनच कृष्णासारखा खरा मित्र ज्यांना भेटला ते गोप खरेच परम भाग्यवान होत! त्याचप्रमाणे कृष्ण आपल्या प्रिय सख्या गोपींनाही विसरला नाही. त्यांना नित्य भेटण्याचे आश्वासन कृष्णाने दिले होते आणि दिलेला शब्द हर तऱ्हेने पाळणे हे तर कृष्णाचे ब्रीदच होते. बदललेल्या बाह्य परिस्थितीत कृष्णाला तेही साधायचेच होते आणि राधेलाही एकांतात त्याला भेटायचे होतेच होते.

लक्ष्मी, तुझ्या मनात एखादे वेळेस असा प्रश्न येईल, अजून तो प्रश्न तू मला कसा विचारला नाहीस याचे मला नवलच वाटत आहे, की कृष्णाला राधेविषयी एवढे खास का व काय म्हणून वाटत होते, जे त्याला इतर गवळणींविषयी वाटत नव्हते, ज्यामुळे तो असा त्यांच्यात फरक करीत होता? कृष्णाला राधेविषयी एवढा आपलेपणा व जवळीकता कशी काय वाटत होती? तर या तू न विचारलेल्या, पण तुझ्या मनात येऊ शकणाऱ्या प्रश्नाचे उत्तर हेच आहे, की असा फरक कृष्ण त्यांच्यात करीत नव्हता, तर त्या कृष्णाच्यात करीत होत्या. कृष्णाला राधेविषयी काही खास वाटत होते असे म्हणण्यापेक्षा, राधेला कृष्णाच्याविषयी काही तरी खास आणि तेही अगदी पहिल्यापासूनच वाटत होते असे म्हणणेच अधिक संयुक्तिक होईल. अर्थात राधेचे हे 'खास'पण कृष्णाच्याही अगदी पहिल्यापासूनच लक्षात आले होते आणि म्हणूनच कृष्णाला राधेविषयी आत्यंतिक आपलेपणा व प्रेम अगदी पहिल्या भेटीपासूनच होते. त्यामुळेच 'आपण एकमेकांचे आहोत व एकमेकांसाठी आहोत' हा खास भाव राधा व कृष्ण या उभयतांच्या ठिकाणी अगदी सहजपणे व एकदमच निर्माण झालेला होता. या खास भावामुळेच परस्परांची एकांतात खासगी भेट घेणे त्यांना अत्यंत आवश्यक होत होते. त्याची पूर्ती करण्याची ओढ त्या उभयतांच्या ठिकाणी सारखीच होती आणि ती पूर्ती हर प्रयत्नाने ते करीत असत. अर्थात त्यासाठी बऱ्याचदा कृष्णाचाच पुढाकार असे, तर काही वेळा राधाही पुढाकार घेई. परंतु त्याला मिळणारा उभयतांचा प्रतिसाद मात्र सारख्याच जोराचा व उत्साहाचा असे.

हे लक्ष्मी, तुला एक असा प्रश्न पडलाय की राधा व कृष्ण नेहमी भेटून प्रेमाचा अनुभव घेत असत म्हणजे तरी निश्चित काय करीत असत? आता हेच मुळी निश्चितपणे सांगणे कठीण आहे. कारण प्रेमाचे काही शास्त्र वा गणित नाही. प्रेम हा एक आंतरिक असा प्रबळ भाव आहे. त्याचे मूळ हेच मुळी प्रेमाच्या व्यक्तीविषयीच्या आत्यंतिक आपलेपणातून निर्माण झालेले असते आणि ते एकतर्फी नसते, तर उभयतांठायी सारख्याच उत्कटतेने असते. त्या प्रेमाठायी भेटीची ओढ नित्यच असते. कारण भेटीतच अनेक कृतींद्वारे तो प्रेमभाव साकार होऊ शकतो आणि त्यामुळेच त्या प्रेमाचा अनुभव घेणे शक्य होते, जे त्या प्रेमासाठी अत्यंत आवश्यक असते. प्रत्यक्ष भेटीत अंतःकरणात साठलेल्या प्रेमाच्या भावाने मन पूर्णपणे भरून वाहू लागते, तेव्हा तो प्रेमभाव मनाच्या सर्व भावाने व अंगाने प्रगट होऊ लागतो. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हीच त्या मनाची अनुभव घेण्याची अंगे आहेत. म्हणून तो प्रेमभाव शब्दाच्या रूपे एकमेकांशी बोलण्यातून प्रगट होतो तेव्हा त्या प्रेमाचा अनुभव येतो. एकमेकांचे कुशल विचारणे, सुखवणारे शब्द बोलणे, एकमेकांशी अनेक विषयांवर प्रेमाने बराच वेळ बोलत रहाणे, सुखसंवाद करणे इत्यादी गोष्टी या शब्दांच्या द्वारे घडतात आणि शब्दांच्या परत्या प्रेमभावाला साकार करून प्रेमाचा अनुभव आणून देतात.

प्रेम अनुभवण्याचे मनाचे दुसरे अंग म्हणजे स्पर्श. जे भाव शब्दाद्वारे पूर्णपणे प्रगट होऊ शकत नाहीत ते भाव स्पर्शाने प्रगट होऊ पहातात. परस्परांचे हात प्रेमाने हातात घेऊन ते कुरवाळणे व हळुवार दाबणे, प्रेमाने मस्तकावर हात ठेवून हलकेच थोपटणे, प्रेमाने मुख दोन्ही हातात धरून ते प्रेमाने कुरवाळणे, प्रेमाने परस्परांना आलिंगन देऊन सर्वांगाला स्पर्श करणे अशा विविध कृतींतून प्रेमाचा स्पर्श मनाला होतो. त्याद्वारे परस्परांच्या मनातील प्रेमभावच प्रगट होतो आणि त्यातून परस्परांवरील प्रेमाचा अनुभवच येत रहातो.

प्रेम अनुभवण्याचे मनाचे तिसरे अंग म्हणजे रूप हे होय. शब्द व स्पर्श याच्याही पलीकडे असलेल्या मनातील प्रेमभाव नेत्रांद्वारे रूपाला येतो आणि नेत्रांमध्येच तो पहाताही येतो. ज्यावेळेस प्रेमभाव व्यक्त करायला शब्दही कमी पडतात तेव्हा नेत्र मात्र त्या उत्कट प्रेमभावाने पूर्णपणे भरून रहातात आणि अश्रूंच्या रूपाने तो प्रेमभावच वहात रहातो. अशा वेळी परस्परांच्या नेत्रात नेत्र मिळवून नुसते पहात जरी राहिले, तरी देहाचेच काय सर्व जगाचेच भान हरवून जाते. नेत्रांमध्ये त्या प्रेमभावाचे अनेक रंग व छटा तर दिसतातच, पण त्या नेत्रात त्या प्रेमाचा गहिरेपणाही प्रदर्शित होतो. त्या प्रेमाच्या गहराईत परस्परांची मने पूर्णपणे बुडून जातात आणि प्रेमाच्या ऐक्याचा अनुभव घेतात.

हे लक्ष्मी, प्रेम अनुभवण्याचे या मनाचे चौथे अंग म्हणजे रसपान हे होय. एकमेकांच्या आवडीचे नानाविध रसांचे पदार्थ एकमेकांना देऊन त्यांचे संगतीत सेवन करणे हेही परस्परांवरील प्रेम अनुभवण्याचे एक अंग आहे. यामध्ये एकमेकांच्या आवडींचाच मनात एकीएक विचार असतो आणि स्वतःच्या सर्व आवडी नावडी मनातून तेवढा वेळ तरी पूर्णपणे बाजूला झालेल्या असतात. परस्परांच्या आवडी पुरवता पुरवता दोघांच्याही आवडी एकच होतात आणि उभयताच एकमेकांना अधिकाधिक आवडू लागतात. विविध रसांद्वारे प्रेमरसाचेच सेवन घडते आणि उभयतांची मनेच प्रेमरसपूर्ण होऊन रहातात. त्यामुळे उभयतांना या प्रेमाशिवाय बाकी कशातच रस वाटेनासा होतो. परंतु या प्रेमरसाने त्यांचे जीवन मात्र सहजपणे व

पूर्णपणे रसमय झालेले असते. या प्रेमरसाने थबथबलेली उभयतांची मने परस्परांच्या प्रेमात पूर्णपणे विरघळून राहिलेली असतात. तेथे प्रेमाचा काही वेगळा म्हणून अनुभव घेणेही अनावश्यकच होऊन बसते.

प्रेम अनुभवण्याचे मनाचे पाचवे अंग म्हणजे गंध किंवा सुवास होय. या सृष्टीमध्ये प्रत्येक वस्तूला व व्यक्तीला निसर्गतःच एक विशिष्ट गंध असतो. त्यातूनही फुले व फळे यांचा गंध तर विशेषत्वाने असतो. मने जेव्हा परस्परांच्या प्रेमाने युक्त होतात तेव्हा हा गंध बोलताना शब्दातून, एवढेच नव्हे तर अगदी श्वासातूनही प्रगट होऊन पसरत रहातो. अशा सुमनांचा सुगंध सर्वत्र दरवळून परस्परांना अगदी भारावून ठेवतो. त्याचेच प्रतीक म्हणून प्रेमाच्या व्यक्ती एकमेकांना नानाविध सुगंधित फुले व त्यांच्या माळा अर्पण करतात. ती फुले व माळा केसात, गळ्यात किंवा हातात घालून परस्परांच्या प्रेमाच्या सहवासाची व सुवासाची धुंदी अनुभवत असतात. त्याद्वारे परस्परांच्या ठिकाणी असलेल्या एकमेकांच्या प्रेमाच्या वासाचाच अनुभव जणू ते घेत असतात.

हे लक्ष्मी, अशा तऱ्हेने प्रेमाचा अनुभव घेण्याची ही मनाची पाच अंगे जरी सांगितली तरी ती मुख्य अंगे आहेत. त्या प्रत्येक अंगाला अनेक उपांगेही आहेत हे लक्षात ठेव. त्याहूनही सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे या अंगांद्वारे जो अनुभव घेतला जातो तो उत्स्फूर्तपणे घेतला जातो. त्यामध्ये कुठलीही क्रमवारी अथवा योजना नसते. कुठल्या अंगाने केव्हा व कसा अनुभव घ्यावा याचा काहीही नियम तेथे असूच शकत नाही. तरीही एक गोष्ट मात्र निश्चितपणे खरी आहे, की आपले मन मोकळे करायचे असेल तर ते बोलण्यानेच बरेचसे मोकळे होते आणि दुसऱ्याचे मन जर जाणून घ्यायचे असेल तर त्याच्याशी बोलून व संवाद करूनच जाणता येऊ शकते. अर्थात खऱ्या अर्थाने संवाद होणे ही वाटते तेवढी साधी गोष्ट नाही. नाहीतर, एखादे वेळेस दोघे जण बराच वेळ एकमेकांशी बोलत रहातात तरी एकमेकांची मने एकमेकांना कळतातच असेही नाही आणि कळली तरी ती मने व मते परस्परांची होतातच असे नाही. पुष्कळ वेळ बोलूनही जर उभयतांची असलेली वेगळी वेगळी भूमिका जर तशीच कायम राहिली, तर एवढा वेळ झालेले बोलणे पालथ्या घड्यावर पडणाऱ्या पाण्याप्रमाणे फुकटच गेले असेच म्हणावे लागेल. परंतु प्रेमाच्या दोन व्यक्ती दीर्घकाळ सतत एकमेकांना प्रेमाने भेटत व बोलत रहातात तेव्हा हळुहळू त्यांच्या मनाचे सूर प्रेमाने जुळू लागून संवादी होऊ लागतात आणि मगच त्यांच्यात थोडा थोडा संवाद खऱ्या अर्थाने सुरू होतो.

*****

## राधा-कृष्ण संवाद

**हे** लक्ष्मी, अशा तऱ्हेने राधा व कृष्ण यांच्यात खऱ्या अर्थाने संवाद सुरू व्हायला वेळच लागला. पण ते आधी परस्परांना अत्यंत प्रेमाने भेटत राहिले आणि मोकळेपणाने बोलत राहिले. कृष्णाचा स्वभावच अत्यंत मोकळा सोकळा असल्यामुळे तो नेहमीच अगदी मोकळेपणाने राधेशी बोलत असे. तिच्या संसारातील घडणाऱ्या अनेक गोष्टी आणि त्याचा राधेच्या मनावर होणारा व शिल्लक राहिलेला परिणाम कृष्ण राधेला वारंवार विचारून समजावून घेत असे. सुरुवातीला राधेचा सूर नेहमीच तक्रारीचा असे. अनय व म्हाळसा यांच्या विचित्र वागण्याचा व स्वभावाचा तिला फारच मानसिक त्रास होत असे. म्हणून मग राधा त्यांच्याविषयीच्या तक्रारी कृष्णाला सतत सांगत राही. कृष्ण राधेचे सर्व म्हणणे शांतपणे ऐकून घेई आणि तिला घडणाऱ्या प्रसंगांची दुसरी अनेक अंगे दाखवून देत असे. 'अनय व म्हाळसा यांच्याही काही अडचणी असतील तर त्याही तू समजून घे. त्यांचेही स्वभाव वेगळे आहेत आणि अशी स्वभावाची भिन्नता हा तर या सृष्टीचा नियमच आहे. तेव्हा त्यांच्याशी जुळवून तुलाच घेता आले पाहिजे' असे काही कृष्ण जेव्हा राधेला सांगे, तेव्हा तिला मग कृष्णाचा थोडासा रागच येई आणि ती कृष्णावर नाराज होऊन बसे. कारण राधेची नेहमी अशीच अपेक्षा कृष्णाकडून असे, की कृष्णाने नेहमी राधेचीच बाजू घेऊन बोलावे.

पण कृष्ण राधेलाच समजावून सांगे की ''दुसरे जरी चुकले व रागावले तरी राधेनेच आपले मन शांत राखले पाहिजे. बारीक सारीक गोष्टींना उगाचच जास्त महत्त्व न देता त्यांच्याकडे दुर्लक्षच केले पाहिजे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे दुसरा चुकीचा वागतो हे आपल्या चुकीच्या वागण्याचे समर्थन होऊ शकत नाही. जो तो ज्याच्या त्याच्या चुकीचे फळ भोगील. आपण योग्य वागलो तर त्याचे योग्य ते फळ आपल्यालाच मिळेल. आपण दुसऱ्यावर रागावलो तर आपल्यालाच मनस्ताप होणार आणि आपण जर न रागावता शांत राहिलो तर मनाची शांतीही आपल्यालाच मिळणार. आपले कुटुंब व संसार हा ईश्वराने आपल्याला दिलेला आहे असे समजून आपले कर्तव्यकर्म प्रेमाने, योग्य प्रकारे, ईश्वराची सेवा म्हणून करावे. त्याचे फळ ईश्वरच आपल्याला देईल. नाती ही निमित्तमात्र आहेत. मूलतः सर्व मानवच आहेत आणि सर्व मानव हे तर ईश्वराचे अंशच आहेत हे आपण जाणून असावे.''

कृष्णाचे असे बोलणे ऐकून राधेला नवल वाटे. पण सुरुवातीला तिला कृष्णाचे सांगणे मानवत नसे व पटतही नसे. तरीही ती कृष्णाच्या बोलण्याचा शांतपणे विचार करी आणि पुन्हा दुसऱ्या दिवशी कृष्णाला भेटल्यावर त्याला विचारी, ''ए कृष्णा, तुझे म्हणणे विचार केल्यानंतर योग्य आहे असे बुद्धीला पटते. पण मन मानायला तयार होत नाही. बरे मनाने ठरविले तरी प्रत्यक्ष प्रसंगात ऐन वेळी ते मन सर्व विसरते आणि पुन्हा मूळ पदाला येऊन चुकीचे वागायला मला भाग पाडतेच. मग यावर उपाय काय करावा बरे? आणि सर्व मानव ईश्वराचे अंश आहेत असे तू म्हणतोस तर मग सर्व जण असे विचित्र का

वागतात? कृष्णा, 'ईश्वर, ईश्वर' म्हणून तू जो नेहमी म्हणतोस तो आहे तरी कसा व कोठे आहे? बरे, तो आहे आणि तोच जर सर्व करतो तर आपण मग स्वस्थच बसावे. आपल्यात बदल करण्याचेही मग आपल्याला कारण नाही. हो की नाही?''

राधेने विचारपूर्वक विचारलेल्या प्रश्नांचे कृष्णाला कौतुक वाटत असे. कारण त्यावरून राधा ऐकलेल्याचा काही तरी विचार करते हे कृष्णाच्या लक्षात येत असे आणि त्याचाच त्याला आनंद होत असे. कृष्णही मग राधेला सर्व काही नीटपणे समजावून सांगत असे.

''हे बघ राधे, ईश्वर कसा आहे व कोठे आहे असा दाखवायला ईश्वर काही 'व्यक्ती' नाही. तर ती एक सर्व जगालाही व्यापून असलेली शक्ती आहे. त्या शक्तीमुळेच तर या सर्व जगाचे व सृष्टीचे व्यवहार चालू असतात. त्या ईश्वरी सत्तेतच सर्व काही सहजपणे घडत असते. ती शक्तीच प्रत्येक मानवाच्या ठिकाणी अंशात्मक आहे, ज्या शक्तीमुळे प्रत्येक मानवाचे अस्तित्व आहे आणि जीवन आहे. ती शक्ती अकारण व अचानकपणे या मानवी जड देहात येते तेव्हा मानवाचा जन्म झाला असे म्हणतात आणि जेव्हा ती शक्ती तेवढ्याच अचानकपणे व अकारण या जड देहातून निघून जाते तेव्हा मानवाचा मृत्यू झाला असे म्हणतात. मग या जडदेहाचे एक निरुपयोगी वस्तू म्हणून अग्नीमध्ये दहन करतात आणि त्या देहाला या सृष्टीमध्ये विलीन करतात.

सृष्टीतील सर्वव्यापी शक्तीला 'परमेश्वर' असे म्हणतात, तर मानव देहातील अंशात्मक शक्तीला 'ईश्वर' असे म्हणतात. परंतु सर्वसामान्य जीवांच्या ठिकाणी या 'ईश्वरी' अस्तित्वाचे अज्ञान असते म्हणून त्यांना त्या ईश्वराचे विस्मरण होते. त्या शिवाय प्रत्येकाच्या प्रकृती स्वभावाच्या आवरणाखाली त्या ईश्वराचे अस्तित्व झाकोळले जाते. तरी ती शक्ती मात्र सतत कार्यान्वितच असते. म्हणून तर मनुष्याचे जीवन चालू असते. पण अज्ञानाने सर्वांना असे वाटते की 'आपणच जगत आहोत'. अर्थात या शक्तीचा वापर कसा करावा याचा विचार करण्यासाठी 'मन' आणि तो वापर योग्य प्रकारे करता यावा म्हणून 'बुद्धी' मनुष्याच्या ठिकाणी निसर्गतःच असते. परंतु त्या मनाचा व बुद्धीचा योग्य विकास होणे आवश्यक असते. निसर्गनियमानुसार देह, मन व बुद्धी यांच्यात वाढ होत असतेच, तरी त्यांचा विकास मात्र प्रयत्नपूर्वक करावा लागतो. परंतु सामान्यांचे मन हे सुखाच्या वासनेने दूषित झालेले असते, तर बुद्धी ही जगाच्या मर्यादित अनुभवामुळे कोती झालेली असते. पण जे त्या व्यापक परमेश्वराला जाणतात आणि स्वतःठायीच्या 'ईश्वरालाही' ओळखतात अशांच्या सहवासात व त्यांच्या मार्गदर्शनाने सामान्यांच्याही मनाचा व बुद्धीचा विकास निश्चितपणे होतो आणि स्वतःठायीच्या ईश्वरी शक्तीचा अनुभव मग त्या सामान्यांनाही येऊ शकतो.''

हे लक्ष्मी, कृष्ण असे काही सांगायला लागला की ऐकता ऐकता राधेचे डोळे विस्मयाने अगदी मोठे होत आणि आपले दोन्ही हात जोडून ती कृष्णाला विनवणीपूर्वक म्हणे,

''बस्, कृष्णा बस्! अरे, असे किती तरी वेळ तू बोलत रहाशील. तुझा काही भरवसा नाही. पण जरा माझा काही विचार करशील की नाही? अरे, हे सर्व तुझे बोलणे तर माझ्या डोक्यावरून जात आहे. ऐकून ऐकून तर माझे मन अगदी सुन्न झाले आणि माझी बुद्धी तर जडच होऊन राहिली. ए, जरा माझ्या मनाच्या अवस्थेचा व माझ्या बुद्धीच्या क्षमतेचा विचार करशील की नाही?

पण कृष्णा, आधी मला एक गोष्ट सांग, एवढे हे मोठे ज्ञान तुला तरी कोणी सांगितले? तुझे बोलणे तर एखाद्या मोठ्या ज्ञानी माणसासारखेच मला जाणवत आहे. परंतु एक गोष्ट माझ्या निश्चितपणे लक्षात येत आहे, की मन व बुद्धी यांची वाढ म्हण किंवा काय तो विकास म्हण, तो तर अगदी आधीपासूनच तुझ्या ठिकाणी आहे. मी अगदी पहिल्यापासूनच बघते आहे, की तुझे बोलणे व वागणे अगदी लहानपणापासूनच एखाद्या मोठ्या माणसासारखेच आहे आणि असे मीच नाही, तर सर्वच जण म्हणत असतात. तुझ्या मनातील विचार आणि तुझ्या बुद्धीने घेतलेले निर्णय हे तर कधी सामान्यांसारखे वाटतच नाहीत. त्यापेक्षा तुझ्या ठिकाणी सर्वांच्या विषयीचा कळवळा व आपलेपणा हा तर अगदी आगळा वेगळाच आहे आणि तुझे प्रेम हे तर अत्यंत अद्भुतच आहे. एकदा का तुझ्या प्रेमाची गोडी लागली की मग ते सोडवतच नाही. त्या प्रेमाला विसरणे तर कधीही शक्यच होत नाही हे मी तुला माझ्या अनुभवाने सांगते. तुझ्या प्रेमाच्या स्मरणानेच तर माझ्या मनाला बळ येते. त्या प्रेमाच्या बळावरच तर मी जीवनात थोडीफार चांगली व योग्य वागू शकते. संसारातील सर्व दुःख, राग, त्रास विसरून व सर्व बाह्य अडचणी बाजूला करून पुन्हा तुझ्या भेटीला धावत येण्याची माझ्या ठिकाणी जी शक्ती आहे, ती तर तुझ्या प्रेमामुळेच आहे. मग आणखीन 'ईश्वराची शक्ती' म्हणून तू जी सांगत आहेस ती कोणती बरे? मला तर ती माझ्या ठिकाणी वेगळेपणाने अशी जाणवत नाही.

ए कृष्णा, पण एक मात्र अगदी गमतीची गोष्ट आहे. तुझे सांगणे जरी कळले नाही ना, तरी मला ते ऐकायला मात्र आवडते. एकसारखे तुझे बोलणे ऐकतच रहावे असे वाटते. पण तुझे बोलणे थांबले की मात्र मन रिकामे रिकामेच वाटते. तेव्हा कृष्णा, मला सर्व गोष्टी नीट व साध्या शब्दात समजावून सांग. मुख्य म्हणजे, तुला एवढे हे ज्ञान कसे प्राप्त झाले आणि मला ते कसे कळेल व अनुभवता येईल ते आधी सांग.''

हे लक्ष्मी, राधेच्या अशा बोलण्याची कृष्णाला जरी गंमत वाटत असली तरी तो मात्र राधेला गंभीरपणे सांगतच राही.

''हे बघ राधे, मुळात 'मला काही समजणारच नाही, माझ्या बुद्धीला हे सर्व जड वाटत आहे, सर्व माझ्या डोक्यावरून जात आहे' अशी मनाची नकारात्मक भूमिका घेऊन बसू नकोस. आधी शब्दाने का होईना, पण माहीत करून घे. अगं, कुठलीही नवीन गोष्ट ही प्रथम शब्दानेच कळते. तो शब्द ऐकणाऱ्याला नवीनच असतो आणि म्हणून काही वेळा कठीणही वाटतो. परंतु एकदा का एखाद्या व्यक्तीचे म्हणा किंवा पदार्थाचे म्हणा, नाव निश्चित झाले की मग त्या गोष्टींना त्या नावानेच संबोधित करावे लागते. मग हळुहळू ते नाव आपल्या मुखात सहज बसते. एखादा नवीन विषय माहीत करून घेताना त्या त्या विषयाची भाषा सुद्धा आपल्या मुखातून हळुहळू सहजतेने येते. मग जेव्हा ती वस्तू व व्यक्ती यांच्या

संपर्कात आपण अधिकाधिक येऊ लागतो आणि त्यांच्याशी आपला परिचय अधिकाधिक वाढू लागतो, तेव्हा मात्र ते शब्द व ती भाषा आपल्याला अधिकाधिक सुलभ व सोपी वाटू लागते आणि त्यांच्याविषयी प्रत्यक्ष सहवासामुळे आपल्या ठिकाणी जर प्रेमच निर्माण झाले, तर मग ते शब्द व ती भाषाही आपल्याला अधिकाधिक आवडू लागते. असे झाले ना, की तेच शब्द व तीच भाषा आपल्या डोक्यावरून जात नाही आणि डोक्यातही जात नाही, तर सरळ मनातच शिरून त्या मनाला अत्यंत सुखविते.

ए राधे, याचे तुला एक छान उदाहरण देतो बघ. अगदी तुझ्या दृष्टीसमोरचे आहे. आता माझेच नाव 'कृष्ण' हे उच्चारायला किती कठीण आहे. मला सुद्धा ते माझ्या लहानपणी नीटपणे उच्चारता येत नसे. त्याचा अर्थ तर मला मी थोडा मोठा झाल्यावर नंद तातांनी समजावून सांगितला तेव्हाच कळला. मी जन्मल्यावर महात्मा गर्गमुनी यांनी स्वतः येऊन माझे नामकरण केले हे ऐकून मला तर अगदी आश्चर्यच वाटले. त्यावेळेस त्यांनी माझ्या नावाचा अर्थ सांगितला होता की 'सर्वांना आकर्षून घेणारा, आकृष्ट करणारा असा जो तो ''कृष्ण'' होय.' राधे, तुला तरी सुरुवातीला माझ्या नावाचा उच्चार धडपणे कुठे करता येत होता? तुला तर ते कितीतरी कठीणच जात होते. त्यामुळे तू तर मला 'कुस्ना' किंवा 'क्रिश्ना' असेच म्हणत होतीस. ते ऐकताना मला अगदी मौजच वाटत असे. पण हळुहळू माझे नाव म्हणण्याची तुला सवय लागली आणि आता आपले प्रेमाचे संबंध निर्माण झाल्यावर तर तुझ्या मुखातून जेव्हा अत्यंत प्रेमाने 'कृष्ण', 'कृष्णा' असे शब्द माझ्या कानावर येतात, तेव्हा तर माझ्या मनात सुखाच्या लहरीवरती लहरीच निर्माण होतात.

राधे, तुझ्या नावाचेही अगदी तसेच नाही का? सुरुवातीला जेव्हा मला कळले की तुझे नाव 'राधा' आहे म्हणून, तेव्हा माझ्या मनात प्रथम काय विचार आला माहीत आहे? मी मनात म्हटले, 'राधा' हे नाव तसे म्हणायला सोपे आहे. पण या शब्दाचा अर्थ तरी काय? ना हे नाव कुठल्या देवतेचे, ना कुठल्या नदीचे, ना कुठल्या फुलाचे. मला वाटते अन्न उत्कृष्टपणे रांधते किंवा रांधावे म्हणून 'राधा' हे नाव ठेवले आहे की काय? पण मग जेव्हा तुझ्या ठिकाणी निर्माण झालेले माझ्याविषयीचे प्रेम पाहिले, तुझ्या बोलण्या वागण्यातून सहजपणे दिसणारे माझ्यावरचे प्रेम मला जाणवले आणि मला वाटले तुझे नाव 'राधा' नसून 'धारा'च आहे. प्रेमाची नित्य वाहणारी धाराच जणू तू आहेस. आता तुझे नाव 'राधा' असे उच्चारतानाच मनात अतिशय आनंदाची संवेदना निर्माण होते. तेव्हा शब्दाला महत्त्व त्याच्या अर्थामुळे येते आणि शब्दाला गोडी त्यातील भावामुळे असते हे लक्षात ठेव. म्हणूनच शब्दांचे अर्थ लक्षात घेऊन त्यातील भाव जाणून घेत रहा.

राधे, त्यामुळे 'परमेश्वर' किंवा 'ईश्वर' अशा मोठ्या शब्दांचा बाऊ न करता, त्यांचा आधी अर्थ जाणून नीटपणे लक्षात ठेवलास आणि मग त्या शब्दांचा योग्य वेळी योग्य तो वापर केलास की त्या शब्दांचा जडपणा तुला जाणवेनासा होईल. असो. मुख्य काय, तर सर्व सृष्टीचा व्यवहार जिच्यामुळे चालत आहे, ती व्यापक शक्ती म्हणजे 'परमेश्वर' आणि त्या शक्तीचा जो अंश आपणा प्रत्येकाच्या ठिकाणी आहे तो म्हणजे 'ईश्वर' हे सत्य लक्षात घे. परंतु सर्वांच्या ठिकाणी त्या ईश्वराविषयी अज्ञान आहे म्हणून त्यांना त्या ईश्वराचा विसर पडतो आणि त्यांच्या ठिकाणी संभ्रम निर्माण होतो. या

संभ्रमावस्थेलाच 'मन' असे म्हणतात. या मनाच्या ठिकाणी आत्म्याविषयी अज्ञान व संभ्रम जरी असला तरी आत्म्याची शक्तीही आहे. या शक्तीमुळे ते मन सदैव कार्यरत असते आणि देहाकडून इंद्रियांद्वारा अनेक कर्मे करून घेते. मनाच्या अज्ञानामुळे त्याच्या ठिकाणी प्रकृती, स्वभाव, वासना असे अनेक दोष निर्माण होतात. त्यामुळेच ते मन देहाला दुष्कर्माला प्रवृत्त करते. त्या दुष्कर्माची फळे म्हणजे दुःख, क्लेश, यातना अशी सर्व त्या मनाला मग भोगावी लागतात. त्या भोगांतून पुन्हा दुसरी कर्मे घडतात आणि त्यांचीही फळे भोगावी लागतात. तेव्हा कर्मे, फळे व भोग आणि पुन्हा कर्मे, फळे व भोग या चक्रात सापडलेल्या मनाची त्यातून सुटका होणे कठीण असले तरी आवश्यक आहे. कारण तरच त्या मनाची दुःखे, क्लेश व यातना यातून सुटका होईल आणि शांती, समाधानाचा अनुभव त्या मनाला घेता येईल.

राधे, मघाशी बोलता बोलता अगदी सहजपणे एक गोष्ट तू बोललीस, की तुझ्या मनात जे माझ्याविषयी प्रेम आहे त्याने तुझ्या मनाला बळ प्राप्त होते. त्या प्रेमाच्या स्मरणाने तुला जीवनात योग्य व चांगले वागता येते. त्या प्रेमाच्या ध्यासानेच तुझे मन संसारात कशातही अडकत नाही आणि माझी भेट घेण्याची शक्ती तुझ्या मनाला प्राप्त होते. मग राधे, तुला तर सर्व दुःखावरील व संकटावरील उपायच सापडला की! या प्रेमाच्या शक्तीचा अनुभव तुला आला ना? मग ती शक्तीच तू आता वाढवली पाहिजेस. कारण या प्रेमातच सर्व शक्ती आहे. हे प्रेम हेच त्या परमेश्वरी सत्तेत सामान्य मानवाला मिळालेले मोठे वरदान आहे. पण सध्याच्या काळात मानवांना त्या वरदानाचाही विसरच पडलेला आहे. खऱ्या निःस्वार्थी, निरपेक्ष व सर्व नात्यापरत्या असलेल्या प्रेमाचा तर सध्या लोपच झालेला आहे. पण असे प्रेम तुला भाग्याने माझ्या रूपाने मिळाले, कळाले आणि मानवलेही. एवढेच नव्हे, तर तुझ्या ठिकाणीही ते प्रेम आता निर्माण झालेले आहे. हे प्रेम आहे माझ्याविषयी, पण आहे तुझ्या ठिकाणी. या प्रेमाचे मूळ आहे माझ्या ठिकाणी, पण ते वाढते आहे तुझ्याठायी. हेच तर या प्रेमाचे विशेषत्त्व आहे. आता माझ्या ठिकाणी हे सर्वांविषयी जे प्रेम आहे ना, ते 'आपण सर्वजण त्या एकाच परमेश्वराचे अंश आहोत' या आपलेपणातून अगदी सहजपणाने आहे. म्हणूनच ते प्रेम निःस्वार्थी, निरपेक्ष व विशुद्ध आहे.

राधे, तुला जरी माझ्या या अंतःकरणाच्या अवस्थेची पूर्ण जाणीव नसली, तरी तुझ्या नकळत का होईना, हेच प्रेम तुझ्या ठिकाणी निर्माण होऊ लागले. तेच प्रेम तुला माझ्या भेटीचा ध्यास लावत आहे आणि तुझ्या मनाला शुद्ध करून त्याची शक्ती वाढवत आहे. जेव्हा तुझे मन पूर्ण शुद्ध होईल आणि माझ्या त्या प्रेमाने युक्त होऊन राहील, तेव्हा तुझे मन या संसारातील सुख-दुःखे, नाती-गोती अशा सर्व बंधनातून मुक्त होईल. तुझ्या ठिकाणी मग कोणाविषयीही राग, मोह, द्वेष, मत्सर असे विकार रहाणारच नाहीत आणि सर्वांविषयी तुला तोच आपलेपणा वाटेल, जो माझ्या ठिकाणी नित्य आहे. राधे, तुला खरे सांगतो, पण तुला अगदी अनय व म्हाळसाकाकू यांचा सुद्धा राग येणार नाही. 'बिचारे त्यांच्या स्वभावाने बांधले गेलेले आहेत' म्हणून त्यांच्या वागण्याचा त्यांनाच जास्त त्रास होतो, हे जाणून तुला त्यांची उलट कीवच येईल. या प्रेमामुळे तर तुझ्याकडून त्यांचे दुःख कमी करून त्यांना सुखावण्याचाच प्रयत्न घडेल. संसारातील तुझे प्राप्त कर्तव्यकर्म तुझ्याकडून प्रेमाने अगदी योग्य प्रकारे घडेल आणि पुन्हा तू त्या संसारात मनाने गुंतून न रहाता नेहमी मोकळीच रहाशील.

अगं राधे, मग आता तर तू एकच गोष्ट करायची आहेस, ती म्हणजे हे प्रेमाचे बळ तू अधिकाधिक वाढवत रहायचे आहेस. म्हणजे मग तुझ्या मनाला ही प्रेमाची शक्ती कायमची प्राप्त होऊन राहील. त्यासाठीच व त्या ध्यासानेच तू मला भेटत रहा आणि माझ्या तुझ्यावरील व तुझ्या माझ्यावरील प्रेमाचा अनुभव घेत रहा. सुरुवातीला तुला 'तुझे प्रेम व माझे प्रेम' अशी दोन वेगळी वेगळी प्रेमे आहेत असे दिसेल व वाटेल आणि ते साहजिकच आहे. कारण तशी सुरुवातीला ती असतातच. परंतु पुढे पुढे हे 'मी तू' पणाचे वेगळेपणही संपूर्ण नाहीसे होईल आणि एकीएक 'आपले प्रेम' म्हणून शिल्लक राहील. पण 'मी' व 'तू' हे वेगळेपणही राहिले नाही, तरी फरक राहील तो फक्त बाह्यांगाचा. पण तो फरक आपल्या प्रेमाचा अनुभव घेण्याला बाधा तर आणणार नाहीच, तर सहाय्यभूतच होईल.

आता 'या प्रेमाचा अनुभव मीच तुला देईन. माझ्याच ठिकाणी तूही त्या प्रेमाचा अनुभव घे' असे मी तुला नेहमी व वारंवार सांगत असतो ते का? 'मी'च का? 'दुसऱ्या कोणाकडे जाऊन तू असा अनुभव घे' असे मी तुला का सांगत नाही बरे? असे प्रश्न राधे, तुझ्या ठिकाणी नसतीलही. कारण माझ्याशिवाय तुला दुसरे काही म्हणून माहीतच नाही. तरी मी तुला या प्रश्नांचे उत्तर आपणहून सांगतो. ते नीट समजावून घे आणि चांगले लक्षात ठेव. हे एक गुह्यच आहे आणि ते मी केवळ तुला म्हणूनच सांगत आहे. कारण माझ्या अंतरीचे ते गूज कोणाला सांगावे असे तुझ्याशिवाय मला दुसरे कोणीही नाही. माझ्या अंतःकरणात तुला मी अत्यंत जवळ पहातो आणि म्हणून ते गूज केवळ तुझ्यासाठीच माझ्याकडून प्रगट होत आहे.''

बोलता बोलता कृष्ण एकदम गंभीर झाला. त्याने राधेचे दोन्ही हात आपल्या हातात घेतले आणि आपले नेत्र मिटून घेतले. त्याच्या त्या अंतर्मुख अवस्थेकडे राधा अत्यंत प्रेमाने व एकटक नजरेने पहात होती. कृष्णाच्या मुखावर विशेष तेज झळाळले होते. आता 'कृष्ण दुसऱ्या कोणाचाही राहिलेला नाही. तर केवळ त्याचाच तो आहे' हे राधेच्या लक्षात आले आणि नेत्रात सर्व प्राण व प्रेम साठवून ती कृष्ण पुन्हा देहभानावर येण्याची वाट पहात शांत राहिली. थोड्या वेळाने कृष्णाने आपले नेत्र अगदी सहजपणे उघडले आणि राधेकडे अत्यंत भावपूर्ण नजरेने पाहू लागला. ती भावपूर्णता राधेलाही जाणवली आणि तिच्याही अंतरातील कृष्णावरील प्रेमभाव दाटून तिच्या नेत्रात आला. कृष्णाच्या अंतःकरणातील सर्व भाव स्वीकारण्यासाठी राधेचे अंतर पूर्ण मोकळे झाले. राधेची ती अवस्था झाल्याचे लक्षण म्हणजे कृष्णाचे अंतःकरणातील गूज शब्दरूप होऊन प्रगटू लागले.

''अगं राधे, मघाशी तू जे म्हटलेस ना, की 'अगदी लहानपणापासूनच माझे वागणे व बोलणे अत्यंत वेगळे आहे आणि माझ्या मनाचा व बुद्धीचा विकासही एखाद्या मोठ्या माणसासारखाच झालेला आहे' ते तुझे म्हणणे अगदी खरे आहे. त्याचे कारण असे आहे, की माझ्या ठिकाणच्या त्या 'ईश्वरी शक्तीची' जाणीव माझ्या ठिकाणी जन्मतःच आहे. त्याचा अनुभव मी माझ्याठायी नित्य घेत असतो. तुला ऐकून नक्कीच नवल वाटेल की मी जन्मल्यापासूनचे सर्व काही मला स्पष्टपणे आठवत आहे. सर्व गोष्टी अगदी आत्ताच घडल्याप्रमाणे माझ्या दृष्टीसमोर आहेत. त्याचे रहस्यही मी तुला पुढे

केव्हा तरी सांगणारच आहे.  पण आता तुला मी जे सांगितले ते सत्य आहे.  या ईश्वरी शक्तीच्या जाणिवेमुळेच माझ्या ठिकाणी सर्वांविषयी आत्यंतिक आपलेपणा व प्रेम अगदी सहजपणे आहे.  कारण एक 'ईश्वर'च असा आहे, की ज्याच्याशी सर्वजण जोडलेले आहेत आणि जो सर्वांच्याठायी आहे.  एक 'ईश्वर'च असा आहे की जो सर्वांसाठी आहे आणि सर्वजण त्याच्यासाठी आहेत.  या मुलभूत सत्याचीच जाणीव माझ्या ठिकाणी जन्मापासूनच पूर्ण विकसित झालेली असल्यामुळे माझ्या मनाचा व बुद्धीचा विकास वेगळा म्हणून काही होण्याची वेगळी आवश्यकताच राहिलेली नव्हती.  म्हणूनच अगदी लहानपणापासूनच माझे मन व बुद्धी यांचा उपयोग सर्वांच्या सुखासाठी व हितासाठी होत राहिला.  मनात सर्वांविषयी असलेले प्रेम व बुद्धीच्या ठिकाणी धारण केलेले ईश्वराच्या अस्तित्वाविषयीचे सत्य ज्ञान माझ्याठायी नेहमीच व सहजपणे जागृत असते.

मनातील प्रेम व बुद्धीठायीचे ज्ञान यांचे माझ्या ठायी असलेले ऐक्य हीच माझी कार्यशक्ती आहे.  या कार्यशक्तीचे मूळ माझ्या ठायीच्या आत्मशक्तीत असल्यामुळेच माझ्या ठिकाणी माझ्या कार्यशक्तीचा आत्यंतिक आत्मविश्वास आहे.  हे रहस्य इतरांना माहीत नसल्यामुळे त्यांना माझा आत्मविश्वास समजू शकत नाही.  एवढेच नव्हे, तर काहीजणांना तो माझा अहंकारही वाटतो.  परंतु माझ्या ठिकाणी असलेल्या 'ईश्वरी शक्तीच्या' जाणिवेबरोबर सर्वव्यापी अशा परमेश्वरी शक्तीची जाणीवही माझ्या ठिकाणी सहजपणे आहे.  किंबहुना, या जाणिवा दोन वेगवेगळ्या नाहीतच, तर दोन्ही मिळूनच ती एक जाणीव आहे.

ईश्वरी शक्तीच्या मानवी देहातील मर्यादेचीही जाणीव माझ्या ठिकाणी नेहमी जागृत असते.  त्यामुळे तेथे अहंकाराचे अस्तित्व संभवतच नाही.  परंतु कर्तृत्व मात्र निश्चितपणे आहे.  ज्या ज्या व्यक्ती माझ्या सहवासात काही कारणपरत्वे येतात, ज्यांचे नि माझे काही नातेसंबंध जुळतात, त्यांच्याविषयी माझ्या मनात अत्यंत आपलेपणा निर्माण होतो.  तो आपलेपणा अनुभवण्याची ऊर्मी माझ्याच ठिकाणी निर्माण होत असल्यामुळे मग मीच पुढाकार घेऊन तो आपलेपणा अनुभवू लागतो.  या माझ्या आपुलकीला जे प्रतिसाद देतात त्यांच्याविषयी मग माझ्या मनात प्रेम निर्माण होते.  या माझ्या प्रेमाला जे प्रतिसाद देतात, त्यांच्या सुखाचे, स्वास्थ्याचे विचार माझ्या मनात येतात आणि तसे सुख, शांती व समाधान त्यांना प्राप्त करून देण्याची जबाबदारीही मग मीच आपणहून स्वीकारतो.  यातून ज्यांच्या ठिकाणी माझ्याविषयी प्रेम व श्रद्धा निर्माण होते त्यांना मी माझा सहवास व अंगसंग देऊन, त्यांचे माझ्यावरील प्रेम अनुभवण्याची त्यांना संधी देतो.  या प्रेम सहवासातूनच जे माझ्या मनातून खोलवर जात अगदी माझ्या अंतःकरणापर्यंत येतात, त्यांच्याजवळ मग मी माझ्या अंतःकरणातून गूज प्रगट करतो.

राधे, तुझ्या बाबतीत मात्र अगदी वेगळेच घडले आहे, नाही का?  योगायोगाने आपली भेट झाली आणि पहिल्या भेटीतच तू माझ्या मनात जी शिरलीस व भरलीस ती थेट अगदी माझ्या अंतःकरणापर्यंतच जाऊन केव्हा पोहोचलीस हे मला देखील कळले नाही.  तू नेहमीच माझ्याशी बोलत आहेस, माझ्या अगदी जवळ आहेस, माझ्या संगे खेळत आहेस, हसते

आहेस असे मला एकदम जाणवू लागले. मग तसा अनुभव बाह्यांगानेही प्रत्यक्षपणे घेण्याचा विचार माझ्या मनात आला आणि मी स्वतः पुढाकार घेऊन तसा प्रयत्न सुरू केला. त्यामुळे त्यातून सुरुवातीला अनेक अडचणी निर्माण होऊ लागल्या. बरे, तुझ्या मनाची प्रतिसाद देण्याची अवस्था नसल्यामुळे तुझे प्रेम अनुभवण्याचे माझे प्रयत्न तुलाही अडचणीचेच व वेळप्रसंगी त्रासदायकही ठरू लागले. मलाही ते कळत होते, नाही असे नाही. परंतु माझाही नाइलाज होत असल्यामुळे मी माझे प्रयत्न न सोडता चालूच ठेवले. परंतु तुझ्याही मनात माझे प्रेम थोडेसे का होईना पण शिरलेले होतेच. तेच प्रेम माझ्या सहवासात हळुहळू वाढत राहिले आणि सुरुवातीला रागावत रागावत प्रेम करणारी तू, मग न रागावता, म्हणजे राग आला असतानाही न रागावता, प्रेम करू लागलीस आणि आता तर तुझ्या ठिकाणी माझ्याविषयी प्रेमाशिवाय दुसरे काहीच शिल्लक राहिलेले नाही. म्हणूनच आज माझ्या अंतःकरणातील गूज तुझ्याजवळ प्रगट करण्याची मला इच्छा झाली. तुझ्याशिवाय हे गूज मी दुसऱ्या कोणालाही सांगू शकत नाही, कारण तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही मी माझ्या अंतःकरणात एवढे जवळ पहात नाही. माझ्या अत्यंत प्रेमाची, जिवाभावाची अशी माझी प्रिय सखी एकीएक तूच आहेस, हे अगदी खरे आहे.''

कृष्णाचे बोलणे ऐकताना राधेला जरी एकीकडे नवल वाटत होते, तरी दुसरीकडे ती अत्यंत भावपूर्णही होत होती. थोडा वेळ काय बोलावे हे तिलाही कळेचना. तिच्या भावाचे योग्य शब्दांकन करणे तिलाही जरा कठीणच वाटू लागले. परंतु न बोलता स्वस्थ रहाणे हे राधेला त्याहूनही जास्त कठीण होते. त्यामुळे मिळेल त्या शब्दांचे सहाय्य घेत राधा बोलू लागलीच.

''ए कृष्णा, तू तर मला कोठच्या कोठे म्हणजे अगदी तुझ्याच अंतःकरणातच नेऊन ठेवले आहेस की! अर्थात यात माझे काहीही कौतुक नसून हा केवळ तुझ्या अंतःकरणाचाच मोठेपणा आहे. मोठ्या भाग्याने मला तुझ्या मनात प्रवेश मिळाला आणि मग तुझ्या अंतःकरणापर्यंतचे माझे जाणे अगदी सहज व सुलभच झाले. कारण तुझे मन हे तुझ्या अंतःकरणाचाच एक भाग आहे. त्यामुळे तुझ्या मनापासून तुझ्या अंतःकरणापर्यंत जाण्यात काहीच अडथळे नाहीत आणि काहीही अडचणी उद्‌भवत नाहीत. परंतु माझ्यासारख्या सामान्यांचे मात्र तसे नसते. आपल्या पहिल्या भेटीतच तूही माझ्या मनात तुझ्या आगळ्या वेगळ्या व्यक्तिमत्त्वामुळे अगदी सहज प्रवेश केलास हे अगदी खरे आहे. परंतु मग तिथूनच अडचणी सुरू झाल्या. माझा स्वभाव, स्वभावाचा हट्टीपणा, माझे संस्कार, माझ्या मनात असलेल्या माझ्या संसाराविषयीच्या कल्पना, माझी अर्धवट बुद्धी या सर्व अडथळ्यांमुळे माझ्या मनात झालेला तुझा प्रवेश हा तेथेच अडून राहिला. परंतु तू मात्र माझ्यावरील प्रेमाने पुढाकार घेत राहिलास आणि तुझ्या माझ्यावरील प्रेमाचा अनुभव मला देतच राहिलास.

सुरुवातीला 'नको नको' म्हणताही माझे मन तुझ्याठायी त्या प्रेमाने जडतच राहिले आणि माझ्या मनाला हलके हलकेसे वाटू लागले. तुझ्या प्रेमाने मला युक्त करण्याचा जणू तू चंगच बांधला होतास. त्यामुळे तुझ्या प्रेमाला प्रतिसाद देता देता माझ्या ठिकाणीही तुझ्याविषयी कधी प्रेम निर्माण झाले हे मलाही कळलेच नाही. जेव्हा कळले तेव्हा मात्र मी तुझ्या प्रेमाने अगदी वेडीच झाले. मग तर मला तुझ्याशिवाय चैनच पडेनासे झाले. काहीही करून तुझी भेट घेणे हा एकच ध्यास

माझ्याठायी नित्य असतो. एकदा का आपली भेट झाली की मग मला तर काहीच करावे लागत नाही. सर्व काही अगदी तूच करतोस. त्याला प्रतिसादही माझ्याकडून अगदी सहजपणे दिला जातो. त्यासाठी मला तर काहीही प्रयत्न करावे लागत नाहीत. अगदी सहजपणे ते घडत असते. असा हा महिमाही अगदी तुझ्या प्रेमाचाच आहे.

ए कृष्णा, आत्तापर्यंत आपल्या भेटीत तू अगदी मोकळेपणाने तुझ्या मनातील अनेक गोष्टी मला सांगत आलास. परंतु आता जे तू गूज मला सांगितलेस ते तर कमालीच्या महत्त्वाचे आहे. त्यामुळे तुझ्या माहात्म्याची खरी जाणीव मला अगदी आता होऊ लागली आहे. आमच्यासारख्या सामान्यांत सहजपणे मिसळणारा आणि आम्हाला अगदी सहज जवळीक देणारा असा तू सामान्य नाहीस, तर काहीतरी विशेषत्व तुझ्या ठिकाणी आहे असे मला नेहमीच जाणवत असे. पण त्याचे निश्चित कारण मात्र कळत नसे. पण आता तर माझी अगदी खात्रीच झाली आहे, की तू केवळ कोणी विशेष आहेस असे नाही, तर तू असामान्यच आहेस.

स्वतःठायीच्या ज्या ईश्वरी शक्तीचा सामान्याला जरासुद्धा पत्ता असत नाही, त्या ईश्वरी शक्तीची जाणीव तुझ्या ठिकाणी जन्मतःच आहे हे तर अत्यंत अद्‌भुतच आहे. तुझ्या ठिकाणी असलेले हे ईश्वरी सामर्थ्य व ईश्वरी प्रेम हेच तुझ्या सर्व जीवनाचे मूळ आहे हे आता अगदी माझ्या लक्षात आले आहे. या तुझ्या माहात्म्याचा मी कधीही विसर पडू देणार नाही हाच आता माझा पूर्ण निश्चय आहे. तू मला जे तुझ्या अंतःकरणात अत्यंत प्रेमाने स्थान दिलेले आहेस तेच मला प्रयत्नपूर्वक राखायचे आहे आणि तू जे माझ्या मनात अत्यंत प्रेमाने स्थान घेतले आहेस, त्या तुला मीच प्रयत्नपूर्वक माझ्या अंतःकरणापर्यंत न्यायचे आहे. एकदा का तू माझे अंतःकरण व्यापून राहिलास की मग मलाही कुठलेही भय, चिंता वा काळजी उरणार नाही आणि माझेही जीवन मला तुझ्या प्रेमामुळे सबलतेने व आनंदाने जगता येईल. अरे कृष्णा, परंतु त्यासाठी मी निश्चितपणे आता काय करावे हे मला कृपा करून नीट समजावून सांग ना.''

राधेच्या भावपूर्ण बोलण्यातील आर्तता कृष्णाला जाणवली आणि त्याला तिचे कौतुक वाटले. कारण कृष्ण जाणून होता की आर्ततेमुळेच अनुभवाची अवस्था येते आणि अनुभवातूनच जाणीव निर्माण होते. त्यामुळे राधेच्या आर्ततेची पूर्तता करण्यासाठी कृष्ण प्रेमाने राधेशी बोलू लागला.

''अगं राधे, तुला वेगळे असे मुद्दामहून काहीच करायला नको आहे. मुळात एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेव, की तुला जे काही मिळवायचे आहे, ती काही एखादी वस्तू नाही किंवा तुला जे काही गाठायचे आहे ते काही बाह्य ध्येय नाही. तर ते तुझ्या आतच तुझ्या गाठीशीच आहे. परंतु त्यावर अज्ञानाच्या, अयोग्य संस्काराच्या व स्वभावाच्या, अहंकाराच्या अनेक न सुटणाऱ्या गाठी बसत गेल्यामुळे ते ध्येय तुला दिसू व कळू शकत नाही. परंतु भाग्याने तुझी गाठ माझ्याशी पडलेली आहे. त्यामुळे माझ्या सहवासात माझ्या प्रेमामुळे या तुझ्या अनेक समजुतीच्या व स्वभावाच्या गाठी हळुहळू सैल पडून सुटत राहतील आणि तुझे मन अधिकाधिक मोकळे होऊ लागेल. त्यामुळे आपल्या भेटीगाठी सुद्धा प्रेमाच्या अत्यंत मोकळेपणाने होत राहतील. एवढ्या वेळेच्या आपल्या भेटीतून व सहवासातून निर्माण झालेल्या प्रेमातून तुला माझ्याकडे

पहाण्याची प्रेमदृष्टी आलेलीच आहे. त्याला आता जे माझे खरे माहात्म्य तुला जाणवू लागले आहे त्याची जोड मिळेल. त्यातून तुला माझे अंतःकरण पाहण्याची दृष्टी मिळत राहील. माझे अंतःकरण जाणता जाणता माझ्या अंतःकरणातील भावही हळुहळू तुझ्या ठिकाणी निर्माण होत राहतील. एकदा का माझ्या अंतःकरणासारखीच तुझ्याही अंतःकरणाची अवस्था झाली, की मग तुलाही माझीच दृष्टी प्राप्त होईल. या माझ्या दृष्टीने सर्वांकडे म्हणजे अगदी सर्वांकडे तू पाहू लागलीस ना, की मग सर्व जग जणू त्या ईश्वराच्या प्रेमानेच प्रकाशित झालेले आहे असे तुला दिसेल. त्या प्रेमप्रकाशात परमेश्वराने मांडलेला हा सृष्टीरूपी खेळ कसा रंगला आहे हे तुझ्या लक्षात येईल.

या सृष्टीच्या खेळात अनेक भिन्न स्वभावाची, भिन्न प्रारब्धाची, भिन्न मतांची माणसे परमेश्वराच्या नियतीनुसार एकत्र आलेली आहेत. गाढ अज्ञानाने व्याप्त झाल्यामुळे त्यांना हा सृष्टीचा खेळ दिसत नाही व म्हणून कळतही नाही. तरीही त्यांना या खेळात सहभागी होणे भागच पडते. त्यांच्या त्यांच्या समजुतीनुसार व कुवतीनुसार खेळून एक तर ते या खेळाचा पोरखेळ करतात, नाहीतर खेळ खंडोबा करून ठेवतात. परंतु त्यातून निर्माण होणारे दुःख, क्लेश व यातना हे परिणाम त्यांना भोगावेच लागतात. त्याचा दोष प्रत्येकजण दुसऱ्याला देऊन मोकळा होऊ पहातो. परंतु मनाने खरा मोकळा असा कधी तो स्वतः होतच नाही. राधे, याला अनय, म्हाळसा व अगदी तू सुद्धा अपवाद नाहीस. पण तुला हा खेळ पाहण्याची दृष्टी आली आणि त्या खेळाचा आनंद घेण्याची वृत्ती जर तुझी झाली, तर एक तू मात्र अपवाद ठरशील आणि त्या खेळाचा पूर्ण आनंद तुला अनुभविता येईल. मग तुझ्या ठिकाणी राग, द्वेष, मोह इत्यादी विकारांना थाराच राहणार नाही. सुखही नाही, दुःखही नाही असा एकीएक आनंदच तू नित्य अनुभवत राहशील.''

*****



# राधेची भावपूर्णता

**हे** लक्ष्मी, अशा तऱ्हेने अनेक प्रकारे कृष्ण राधेपाशी बोलत राही, बोलत राही आणि राधा ऐकत राही, ऐकत राही. कृष्ण आपले अंतःकरण मोकळे करीत राही, करीत राही आणि राधेचे मन पूर्ण मोकळे होऊन कृष्णाच्या प्रेमाने व माहात्म्याने भरत राही, भरत राही. कृष्णप्रेमाने नित्य भरलेल्या तिच्या मनात मग कोणाविषयी, म्हणजे अगदी अनय व म्हाळसा यांच्याविषयी सुद्धा राग राहिला नाही. या सर्वांना तिनेच समजून घ्यायचे आहे आणि सांभाळून घ्यायचे आहे हे राधेला समजून राहिले. कृष्णप्रेमाने हे सर्व तिच्याकडून घडत असल्यामुळे तिच्या मनात कुठलाही ताण व तणाव नसे. तर या खेळाची तिला एक प्रकारची मौजच वाटत असे. कृष्णाला तिच्या कुटुंबातील सर्व गोष्टी सांगताना आता तिचा तक्रारीचा वा रडगाण्याचा सूर नसे, तर ती कृष्णाला सर्व एक गंमत म्हणून सांगत असे. परंतु म्हणून राधा काही संसारात सुखावली वा सुस्तावली असे झाले नाही.

कृष्णाचे खरे माहात्म्य लक्षात आल्यावर त्याच्या अंतःकरणाची अवस्था वारंवार पाहण्याचा, विचारून जाणून घेण्याचा ध्यासच राधेच्या ठिकाणी निर्माण झाला. त्यामुळे संसारात मनाचे स्वास्थ्य असूनही तिच्या मनाची अस्वस्थता मात्र वाढतच राहिली. कृष्णाची भेट घेण्यासाठी ती सदैव बेचैन व तळमळत असे. तशी भेट होऊ शकली नाही की मात्र राधा अतिशय व्याकूळ होई. परंतु मनाचा तोल जाऊ न देता आणि दुसऱ्या कोणावर म्हणजे अगदी कृष्णावरही अजिबात न रागावता, राधा कृष्णाची एकांतात भेट घेतच राही. नेहमीच तिला कृष्णाला एकट्याला भेटणे शक्य होत असेच असे नाही. पण आपल्या मनाची गाडी त्यासाठी अडवून न ठेवता ती कृष्ण सर्वांच्यात असतानाही तेथे त्याची भेट घेतच असे. कारण आता एक गोष्टी खात्रीने तिच्या लक्षात आली होती, की कृष्ण हा सर्वांच्यातही एकटाच असतो. खरे तर, तो नेहमीच एकला असतो. तेव्हा आपण आपल्या भावाने त्याच्याशी कधीही, कुठेही अगदी सर्वांच्यातही एकांत साधू शकतो. त्या एका कृष्णालाच आपल्या आत घेऊ शकतो, साठवू शकतो, पाहू शकतो, आठवू शकतो आणि त्याच्याशी अगदी बोलूही शकतो. पण तरीही कृष्णाला एकट्याने भेटून एकांतात त्याचे प्रेम मोकळेपणे व पूर्णपणे अनुभवण्याची तिच्या मनाची ओढ मात्र जराही कमी न होता वाढूनच राहिलेली होती. कारण एकांतातच कृष्णाचे अंतःकरण केवळ तिच्यासाठी आणि तिच्यासाठीच प्रगट होत असे आणि कृष्णाशी तिला मोकळेपणाने कितीतरी संवादही करता येत असे.

हे लक्ष्मी, कृष्णाच्या सहवासात कृष्णाच्या अंतःकरणाची व्यापकता पहाता पहाता आणि त्या अंतःकरणाची सखोलता जाणता जाणता राधेला कृष्णाचे माहात्म्य अधिकाधिक जाणवत असे. त्यामुळे कृष्णाच्या प्रेमाचा आनंदही तिला खऱ्या अर्थाने घेता येत असे. परंतु काही वेळेला मात्र तिच्या मनावर थोडेसे दडपणही येत असे. केव्हा थोडीशी उदासीनता वा नैराश्यही वाटत असे. कृष्णाला आपल्याविषयी जो विश्वास व भरवसा वाटत आहे तो आपल्याला खरा करून दाखविता येईल ना? अशी शंका उगाचच तिच्या मनात येऊनही जात असे. पण परिणाम ठेवून जात असे. थोडा वेळ तिला अगतिक

झाल्यासारखेही होई. परंतु थोडाच वेळ! लगेचच ती आपल्या मनाला सावरून घेई. तिच्या मनाचा पुन्हा निश्चय होई की कृष्ण मला जर त्याच्यापासून वेगळे पहात नाही, तर मग मीही त्याच्यापासून वेगळी राहणार नाही आणि अंतःकरणाच्या अवस्थेने कृष्णाशी अगदी नक्की एकरूप होऊन राहीन.

असे कृष्णाच्या प्रेमाच्या निश्चयाने सबळ झालेले राधेचे मन कृष्णाच्या भेटीसाठी आर्त होई आणि वेगाने कृष्णाकडे धावून जाई. शरीराने प्रत्यक्ष कृष्णापाशी पोहोचण्याच्या आतच मन कृष्णापाशी जाऊन पावलेले असे. मग प्रत्यक्ष भेटीत कृष्णापाशी आल्यावरती तर सर्व विरह विरून जात असे. कृष्णाच्या ठिकाणीसुद्धा भेटीची तेवढीच आर्तता व आतुरता आहे हे जाणवल्यावर मात्र राधेच्या मनातील उरलेले सर्व बांध कोसळूनच पडत असत. सर्व लौकिक बंधने बाजूला होत आणि कृष्णाच्या प्रेममिठीत स्वतःला पूर्णपणे झोकून देऊन हरवलेली राधा, कृष्णाला सर्वार्थाने मिळत असे. प्रेमभावाची पूर्तता व भक्तिभावाची तृप्तता करणाऱ्या त्या राधाकृष्णाच्या मीलनात कोण कोणाशी मिळत आहे हे खरेच कळत नसे.''

*****



# राधा-कृष्ण भेटीतील अडचणी

**ना**रायणाच्या सगुण प्रेमाला व सगुण भक्तीला साकार करणाऱ्या राधाकृष्णाच्या भेटीचे वर्णन करताना नारदाचा आनंद त्याच्या सर्वांगाद्वारे प्रगट होऊन मुखावरून ओसंडत होता. राधा व कृष्ण यांच्या भेटीचा आनंद जणू काही नारद स्वतःच अनुभवत होता असे म्हटले तर ते अगदी खरेच होते. सगुण प्रेमभक्तिने नारायणाशी अंतर्बाह्य ऐक्य पावलेला नारद त्या एकरूपतेचा आनंद अंतःकरणात नित्यच अनुभवीत असे. राधा व कृष्ण यांच्या ऐक्यभेटीचे वर्णन करताना तो आनंद त्या निमित्ताने व्यक्त झाला इतकेच. परंतु त्यामुळेच तो आनंद लक्ष्मीला पाहता आला आणि त्याचा आनंद तिलाही झाला. परंतु नारायणाच्या सगुणकथांचा आनंद अनुभवाला आणून देणाऱ्या श्रवणभक्तिची गोडी मात्र लक्ष्मीच्या ठिकाणी अधिकाधिक वाढतच होती. भक्तिभावाठायी असलेले आर्तता व पूर्तता हे दोन्ही भाव तिच्या श्रवणभक्तिमध्ये सामावलेले असल्यामुळे, लक्ष्मी केवळ श्रवणाचा आनंद घेत स्वस्थ बसूच शकली नाही. लक्ष्मीच्या ठिकाणी फक्त अधिक ऐकण्याचीच आतुरता वाढत होती असे नव्हे, तर राधेच्या निमित्ताने व रूपाने जो भक्तिभाव नारद साकार करीत होता, त्याचे आणखीन रूपरंग प्रगट व्हावेत अशी उत्कट इच्छा तिच्या ठिकाणी अगदी सहजपणे होती. त्यात नवल असे काहीच नव्हते. कारण श्रवणभक्तिचे ते सहज लक्षणच आहे. त्यामुळे राधाकृष्णाच्या ऐक्यभेटीच्या आनंदात पूर्णपणे रममाण झालेल्या नारदाला पुढील कथाभाग वर्णन करण्यासाठी देहभानावर आणणे व ठेवणे अत्यंत आवश्यकच होते. त्यासाठीच लक्ष्मी नारदाशी पुन्हा बोलू लागली. राधेच्या कृष्णावरील उत्कट व अनन्य अशा प्रेमाचे वर्णन ऐकून लक्ष्मीही भारावलीच होती. तिचेही मन प्रेमाने भरून राहिले होते. त्यामुळे लक्ष्मीचाही कंठ राधेच्या कौतुकाने व प्रेमाने दाटूनच आल्यासारखा झाला होता. तिच्या त्याच भावाची अवस्था तिच्या बोलण्यातून प्रगट होत होती.

''हे नारदा, खरेच राधेच्या ठिकाणी कृष्णप्रेमातून निर्माण झालेल्या भक्तिभावाचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. अर्थात राधा केवळ कौतुकासच पात्र आहे असे नव्हे, तर तिची अवस्था आदर्शवतच आहे यात शंका नाही. पण माझ्या ठिकाणी या कौतुकाबरोबरच थोडीशी काळजीही निर्माण होत आहे. कारण राधा आधी एक स्त्री, त्यातून पुन्हा विवाहित स्त्री. मग पुढे कितीतरी संकटे व अडचणी निर्माण झाल्याच असणार आणि त्याला राधेला तोंड हे द्यावे लागलेच असणार. त्या सर्वातून राधा कशी निभावून गेली असेल या विचाराने माझ्याच मनाला ताण जाणवत आहे. अर्थात त्या सर्वातूनही ती यशस्वीरीत्या पार पडली असणार, याचीही खात्री तुझ्या बोलण्याच्या एकंदरीत सुरावरून मला वाटत आहे. राधा व कृष्ण यांच्या या जगावेगळ्या प्रेमसंबंधाची परिणती नक्कीच आनंददायी झाली असणार. परंतु ते सर्व सविस्तर ऐकण्याची आतुरता माझ्या ठिकाणी अगदी शिगेला पोहोचलेली आहे. तुझ्या अंतःकरणाचीही अवस्था अगदी माझ्यासारखीच झाली असणार हे तर सांगायलाच नको. तेव्हा हे नारदा, तू आता आपल्या उभयतांच्या भावाची त्वरित पूर्ती करावीस हेच बरे आणि हेच खरे!''

लक्ष्मीच्या बोलण्यावर नारदाने आनंदाने संमतीदर्शक मान डोलावली आणि पुन्हा तो लक्ष्मीशी बोलू लागला, ''हे लक्ष्मी, राधेचे कौतुक तर निश्चितच आहे. पण राधेचे खरे विशेषत्व होते, की ती कृष्णाशी असलेल्या प्रेमाच्या संबंधात केव्हाही, कधीही व जराही कमी पडली नाही. त्या संबंधाचे मूळ असलेला कृष्ण हा त्याच्या सहज अवस्थेनुसार नेहमीच मोकळा, सबळ व आत्मविश्वासाने युक्त असाच असे. पण राधेच्या मनाची मात्र केव्हा केव्हा दोलायमान अवस्था होत असे. तिला कधी नैराश्यही येई आणि ती निरुत्साहीसुद्धा होत असे. पण तिने एक केले, तिने कृष्णाला अत्यंत प्रेमाने व श्रद्धेने धरून ठेवले. जेव्हा तिचे प्रेम कमी पडत आहे असे राधेला वाटे, तेव्हा ती श्रद्धेवर जोर देई आणि जेव्हा श्रद्धा कमी पडत आहे असे वाटे, तेव्हा राधा प्रेमावर भर देई.

सर्वात महत्त्वाचे म्हणजे राधेने तिच्या व कृष्णाच्या संबंधात दुसऱ्या तिसऱ्या कोणालाही कधीच मधे येऊ दिले नाही. कृष्णाचे सांगणे पटले नाही म्हणून तिने दुसऱ्या कोणाला कधी काही विचारले नाही किंवा कृष्णाचे प्रेम अनुभवायला मिळाले नाही म्हणून तिने त्या प्रेमाची अपेक्षा दुसऱ्या कोणाकडूनही धरली नाही किंवा त्या प्रेमाला दुसरीकडे शोधत बसली नाही. त्यांच्या संबंधात इतर कोणाला वावच नसे. राग-लोभ, दुरावा-जवळीकता, अबोला-संवाद जे जे म्हणून काही घडत असे ते केवळ राधा व कृष्ण यांच्यातच घडत असे. इतरांना त्यांचा जराही मागमूस लागत नसे. पण सर्वांची परिणती मात्र राधा व कृष्ण यांचे परस्परांवरील प्रेम अधिकाधिक दृढ होण्यातच होत असे आणि राधेच्या ठिकाणचा प्रेमातून निर्माण झालेला भक्तिभाव सतत वाढत राही. कृष्णाच्या प्रेमसंबंधात कोणी जर कमी पडत असेल तर ते आपणच आहोत हे राधेने पूर्णपणे ओळखले होते. ती कमतरताही तिलाच भरून काढायची आहे याचीही जाणीव राधेला झाली होती आणि कृष्णाच्या प्रेमभक्तीने तिला ते निश्चितपणे साधता येईल याचीही पक्की खात्री राधेच्या ठिकाणी होती. पण असे सर्व घडण्यासाठी पुष्कळ काळ जाणे आवश्यक होते आणि त्या काळात पुष्कळ काही घडायचे होते. काय घडणार आहे, कसे घडणार आहे, हे राधेला तर ठाऊक नव्हतेच, पण कृष्णालाही माहीत नव्हते. परंतु परमेश्वरी सत्तेत रंगणाऱ्या या सृष्टीरूपी खेळात उत्साहाने व आनंदाने खेळण्यासाठी कृष्ण नेहमीच अत्यंत आतुर व सदैव तत्पर असे.

हे लक्ष्मी, मागेच तू मला विचारले होतेस आणि मीही तुला सांगितले होते त्याप्रमाणे राधा व कृष्ण यांचे प्रेमसंबंध हा गोकुळातील एक कुतूहलाचा, चर्चेचा व टीकेचा विषय झाला होताच. परंतु त्याला तेवढीशी गंभीरता आली नव्हती. त्याला एक महत्त्वाचे कारण म्हणजे राधेचा नवरा अनय याचेही कृष्णाशी थोडेफार प्रेमाचे संबंध होते. काही ना काही कामानिमित्त अनयाचे पुष्कळदा नंदाच्या वाड्यावर जाणे होत असे. कृष्णाकडे एक सुंदर, गुणवान, बुद्धिवान, थोडासा खोडकर व खेळकर मुलगा म्हणूनच अनय पहात असे. त्याच्या ठिकाणी कृष्णाविषयी कौतुकही होते. परंतु कृष्णाला एक लहान मुलगा म्हणूनच तो पहात असल्यामुळे त्याच्या दृष्टीने कृष्णाला आपल्या अडचणी वगैरे सांगून त्याचे काही मार्गदर्शन घेण्याचा प्रश्नच निर्माण होत नसे. आपल्याला सर्व काही कळते व समजते अशी त्याची अगदी प्रामाणिक समजूत होती. आपले कामकाज व कुटुंबातील कर्तव्ये प्रामाणिकपणे करणे एवढेच त्याला ठाऊक होते. घरामध्ये आई व बायको यांच्यामुळे द्विधा मनःस्थिती होऊन अनयाला त्याचा मानसिक त्रास व क्लेश होत असतच. परंतु हा आपला वैयक्तिक प्रश्न आहे

आणि तो आपला आपल्यालाच सोडवायचा आहे अशी मनाची पक्की धारणा असल्यामुळे, कृष्ण हा अनयाच्या दृष्टीने त्याच्यासाठी परकाच होता. घरातील खाजगी गोष्टी कृष्णाला व इतर बाहेरच्या कोणालाही सांगणे अनावश्यकच नव्हे, तर अयोग्यच आहे अशी अनयाची निश्चित समजूत होती. त्यामुळे कृष्णाशी त्याचे भावनिक नाते असे कधी निर्माणच झाले नव्हते. अनयाचे मुळात संबंध नंद व यशोदा यांच्याशीच येत असल्यामुळे केवळ त्यांचा मुलगा म्हणूनच तो कृष्णाकडे पहात असे. म्हणून जेव्हा सुरुवातीला अनयाच्या कानावर राधा व कृष्ण यांच्याविषयी काही गोष्टी उडत उडत आल्या तेव्हा अनयाला त्याचे काहीच वाटले नाही. केवळ एक गमतीची गोष्ट म्हणूनच त्याने त्याच्याकडे पाहिले. त्याला काही विशेष महत्त्व द्यावे असे अनयाला कधी वाटलेच नाही.

हे लक्ष्मी, पण अनयाची आई म्हाळसा, हिची गोष्ट मात्र वेगळीच होती. मुळात स्त्री स्वभावानुसार जुन्या संस्काराची व कोत्या मनाची असल्यामुळे म्हाळसेला मात्र राधा व कृष्ण यांचे प्रेमसंबंध मानवणे तर शक्यच नव्हते. त्यातून म्हाळसेच्या बरोबरीच्या इतर स्त्रिया नेहमी चेष्टा करून तिची हेटाळणी करीत. 'आपल्या सुनेवर तुझा काहीच कसा ताबा नाही? तुझे ती ऐकत नाही याचा अर्थ काय? तिला तूच शिस्त लावली पाहिजेस. नाहीतर तुझ्या व तुझ्या मुलाच्या संसाराचा सत्यानाश झाल्याशिवाय रहाणार नाही' असे सतत बोलून त्या म्हाळसेचे कान फुंकत असत. हलक्या कानाच्या व मनाच्या म्हाळसेच्या मनात हळुहळू भिनलेले हे विष तिच्या राधेविषयीच्या वागण्या बोलण्यातून प्रगट होऊ लागले. राधेच्या कामात उगाचच चुका काढणे, तिला सारखे घालून पाडून बोलणे, कृष्णाचे नाव घेऊन तिला सतत टोमणे मारणे असे प्रकार म्हाळसेने राधेला त्रास देण्यासाठी म्हणून सुरू केले.

सुरुवाती सुरुवातीला राधा थोडीशी घाबरली. या गोष्टींना कसे तोंड द्यावे हे तिलाही कळेनासे झाले. तिलाही केवढातरी मानसिक त्रास हा झालाच. परंतु मनामध्ये निर्माण होत असलेल्या कृष्णप्रेमामुळे राधा हळुहळू सावरली आणि धीटपणे बदललेल्या परिस्थितीला तोंड देण्यासाठी तिची मानसिक तयारी झाली. आधी ती आपल्या सासूबाईंच्या बोलण्याला समजुतीने उत्तर देण्याचा प्रयत्न करीत असे. परंतु त्यांची समजूत कधीच पटत नसे. मनाची सर्व कवाडे जाणून बुजून बंद केलेली असल्यामुळे म्हाळसेला राधेचे सांगणे पटत तर नसेच, पण खरेही वाटत नसे. राधेच्या साध्या व सरळ वागण्या बोलण्याचा मुद्दाम चुकीचा अर्थ काढून म्हाळसा राधेशी सतत वाद घालीत राही. बरे, राधेने काही खुलासा करायचा प्रयत्न केला तर 'वर तोंड करून मला उलट उत्तरे देऊ नकोस' असे म्हणून म्हाळसा राधेला अधिकच रागावत असे. राधेवर मुद्दामहून कामाचा जास्त बोजा टाकणे, तिला शिळेपाके अन्न देणे असे प्रकार करून म्हाळसेने राधेचा प्रत्यक्ष छळ करावयासही कमी केले नाही. पण राधा बधली नाही. तिच्या भूमिकेला ती प्रयत्नपूर्वक धरून राहिली. राधेच्या मनात सतत वाढत असणाऱ्या कृष्णप्रेमात या बाह्य परिस्थितीमुळे एक प्रकारची आर्तताच निर्माण झाली आणि कृष्णप्रेमाची तिची भूक अधिकच वाढत राहिली. त्यामुळे त्या प्रेमाची पूर्ती करण्यासाठी राधा कृष्णाकडे अधिकच ओढली गेली. म्हाळसेने अनयाचेही मन दूषित करण्याचा प्रयत्न केला. राधा व कृष्ण यांच्याविषयी लोक काय काय बोलत आहेत हे सर्व तिने

आपल्या पदरची भर घालून मुद्दाम अनयाच्या कानावर घातले. पण अनयाने हसून तिकडे दुर्लक्ष केले आणि म्हाळसेलाही तसेच दुर्लक्ष करण्यास सांगितले.

राधेनेही सुरुवातीला तिला होणाऱ्या त्रासाची कल्पना अनयाला दिली. परंतु अनय राधेला नेहमी एकच सांगे की 'आईचे आता वय झाले आहे. तिची तब्येतही सारखी बिघडत असते. म्हणून तिचा स्वभावही चिडचिडा झालेला आहे. तसा तिचा मूळचा स्वभावही थोडासा संशयी व हेकेखोर आहेच. तेव्हा राधे, तू आईच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस, तर तिला सांभाळून घे. शेवटी तुलाच तिच्याशी जमवून घ्यायला हवे. मी काही तुमच्यामध्ये पडणार नाही.' असे म्हणून अनय आपली जबाबदारी झटकून टाकी. मग राधाही अगतिक होई आणि हे सर्व कृष्णाला जाऊन सांगे. तर कृष्ण ते सर्व गमतीनेच घेई. त्यामुळे राधेच्या तक्रारीच्या सुरातील हवाच निघून जाई. कृष्ण तर उलट राधेला अनयाच्या व म्हाळसेच्या वागण्या-बोलण्याची नक्कलच करून दाखवी. तेव्हा मात्र राधेचा राग शांत होई आणि हसून हसून तिची अगदी मुरकुंडी वळत असे. मग कृष्ण राधेला म्हणे, 'बघ राधे, अनय व म्हाळसेच्या मी केलेल्या नकलेची जर तुला एवढी गंमत वाटते आणि एवढे हसायला येते, तर मग प्रत्यक्ष जे असली आहे त्याचा का तुला एवढा त्रास होतो? त्यासाठी तुझी मानसिकताच तू बदल ना! हाच त्यावरचा उपाय आहे.'

राधाही शांतपणे याचा विचार करी आणि आपल्या मनाला त्रास देण्यात अनय व म्हाळसा यांना यश मिळवूनच द्यायचे नाही असा मनाशी ठाम निश्चय करी. प्रत्यक्ष प्रसंगामध्ये मग तिला कृष्णाने केलेली अनय व म्हाळसा यांची नक्कलच आठवू लागे आणि तिला मनातल्या मनात अतिशय हसूच येई. तिच्या मनावर आलेला ताणही कुठच्या कुठे नाहीसा होई आणि तिलाही सर्वांची गंमतच वाटू लागे. परंतु बाह्यांगाने तसे मुळीच न दाखवता ती शांत राही आणि मनातल्या मनात कृष्णाच्या प्रेमाच्या स्मरणात दंग होऊन राही. राधेच्या शांत राहण्याचा म्हाळसा वेगळाच अर्थ काढत राही आणि राधेवर अधिकच राग करीत असे. राधेला त्रास देण्याची कुठलीही संधी म्हाळसा सोडतच नसे.

राधेला कृष्णाला भेटण्याची संधीच मिळू नये यासाठी म्हाळसेचे जास्तीत जास्त प्रयत्न सुरू असत. प्रथम तिने राधेला नंदाच्या वाड्यावर पाठवण्याचे बरेचसे कमी केले. त्यातूनही काही कामानिमित्त नंदाच्या वाड्यावर जावे लागले किंवा यशोदेकडून बोलावणेच आले तर ती मोठ्या नाईलाजाने राधेला जाऊ देई. परंतु त्या वेळेस ती स्वतःही राधेबरोबर जात असे आणि काम झाले की लगेचच राधेला घेऊन घरी परत येई. त्यामुळे राधेला व कृष्णाला भेटण्याची संधीच कमी उपलब्ध होई. परंतु तेवढ्या वेळातही कृष्ण व राधा एकमेकांकडे बघून हसत आणि थोडेसे बोलतही. अर्थात हे सर्व म्हाळसेच्या समक्षच होत असल्यामुळे त्यांच्या वागण्या-बोलण्याला मर्यादा या येतच असत. परंतु त्याची तक्रार न ठेवता राधा व कृष्ण मिळालेल्या संधीचा जास्तीत जास्त उपयोग करीत आणि त्यांच्या प्रेमाचा आनंद अनुभवीत असत. त्याचवेळेस राधा व कृष्ण यांचे नेत्रपल्लवीने व हाताच्या खुणांनी एवढे बोलणे होत असे, की त्याचा पत्ता म्हाळसेला केव्हाही लागणे शक्यच नव्हते. राधा व कृष्ण यांना आपण कसे दूर ठेवले या समजुतीने म्हाळसा खुशीत असे, तर राधा व कृष्ण आपण

परिस्थितीच्या मर्यादेतही परस्परांचे प्रेम कसे अनुभवले या विचाराने अत्यंत आनंदात असत.  अशा तऱ्हेने कृष्णप्रेमाने सबळ झालेली राधा जराही नाराज अशी होतच नसे.  परंतु कृष्णभेटीची ओढ कायम असल्यामुळे म्हाळसेबरोबर परत घरी निघताना म्हाळसेचे लक्ष नाही असे पाहून कृष्णाला 'पुन्हा भेटूया' अशी नेत्रखूणही तिच्याकडून अगदी सहजतेने घडत असे आणि कृष्णही हसून तिला तेवढ्याच सहजतेने 'नक्की, अगदी नक्की' अशी खात्री देत असे.

मग म्हाळसेच्या लक्षात आले, की राधा पाणी भरण्याच्या निमित्ताने यमुनेवर जाते आणि त्यावेळेस वाटेतच राधा व कृष्ण एकमेकांना भेटतात.  त्यावर उपाय म्हणून म्हाळसेने राधेला पाणी आणण्यासाठी यमुनेवर पाठवण्याचेच थांबवले आणि पाणी आणण्यासाठी स्वतःच यमुनानदीवर अट्टाहासाने जाऊ लागली.  पण अशा अडचणी म्हणजे खऱ्या प्रेमिकांना एक आव्हानच असते.  बदललेल्या परिस्थितीमुळे डगमगून न जाता किंवा परिस्थितीला शरण न जाता, परिस्थितीच्या अडचणींतून बाहेर पडण्याचा मार्ग ते शोधीतच रहातात आणि त्यांना तसा काहीतरी योग्य मार्ग सापडतोही.

*****



# कृष्णाच्या राधेशी भेटी

**रा**धा आता परिस्थितीमुळे घरीच अडकून पडली आहे असे पाहिल्यावर राधेला भेट देण्याची व राधेची भेट घेण्याची जबाबदारी साहजिकच कृष्णाने स्वीकारली. ज्या वेळेस अनय कामानिमित्ताने बाहेर गेलेला असे व म्हाळसाही पाणी भरण्यासाठी यमुना नदीवर गेलेली असे, त्या वेळेसच वेळ साधून व संधी घेऊन कृष्ण स्वतःच कोणाच्याही नकळत राधेच्या घरी जाऊन तिला भेटत असे. असा प्रथम जेव्हा अचानकच कृष्ण राधेला तिच्या घरी जाऊन भेटला तेव्हा राधाही आधी एकदम बावरलीच. कृष्णस्मरणात दंग असलेली राधा त्यावेळेस मोठ्या डेऱ्यामध्ये दही घुसळत बसली होती. कृष्णाला पाहून चकित झालेली राधा एकदम उठून उभीच राहिली. कृष्णाला पाहून राधेला तर काय करावे हे सुचेनाच. एकीकडे कृष्णाला पाहून झालेला आनंद, तर दुसरीकडे घरात कोणी नसताना कृष्ण आला म्हणून मनावर आलेले दडपण. अशा मनाच्या द्विधा स्थितीत असलेल्या राधेकडे पाहून कृष्णाने स्मित हास्य केले आणि तिला काळजी न करण्यास सांगितले. परंतु राधेला काळजी ही वाटलीच, पण तिची स्वतःची नव्हे, तर तिला अतिशय काळजी वाटत होती ती कृष्णाचीच. म्हणूनच न राहवून ती कृष्णाला म्हणाली,

''ए कृष्णा, तू तर अगदी कमालच केलीस. माझ्यासाठी तू किती करतोस रे! माझी व्याकुळता तुझ्यापर्यंत कशी व कधी पोहोचली बरे? मी तर तुझ्या भेटीसाठी केव्हापासूनची अगदी बेचैन झालेली आहे हे तुला कसे काय कळले? पण कृष्णा, तू एवढी जोखीम पत्करणे अयोग्य नाही का? अरे, येथे येताना व परत जाताना तुला कोणी पाहिले तर केवढा तरी मोठा गहजब होईल. कृष्णा, मी तुला खरेच सांगते की माझ्यासाठी तू एवढा मोठा धोका घेऊ नकोस. आधीच लोक तुला नावे ठेवतच आहेत, त्यांना निंदा करायची संधी तू आपणहून तरी देऊ नकोस. तू आलास आणि मला भेटलास याचा मला आनंद तर अतिशयच झाला आहे. हे तर तुझे माझ्यावर केवढे तरी उपकारच आहेत. परंतु आता तू येथे क्षणभरही थांबू नकोस. लवकरात लवकर येथून निघून जा असे मीच तुला विनवून सांगत आहे.''

राधेच्या बोलण्यावर कृष्ण आधी मोकळेपणाने हसला खरा, पण मग थोडासा गंभीर होऊनच राधेला म्हणाला, ''अगं राधे, ही उपकाराची भाषा कशाला बरे? जेथे खऱ्या प्रेमाचे संबंध आहेत तेथे 'उपकार' हा शब्दच येऊ शकत नाही. कारण प्रेमाचे संबंध हे अन्योन्य असतात. त्यामध्ये भेटीची ओढ उभयतांना सारखीच असते. त्या प्रेमात परस्परांची भेट घेणे आणि प्रेमाचा अनुभव घेणे याची जरुरी उभयतांना सारखीच असते. त्यामुळे कोणा एकाला जर काही बाह्य अडचणींमुळे भेट घेता येणे शक्य झाले नाही, तर दुसऱ्याकडून त्यातून मार्ग काढून स्वतःहून भेट घेणे घडणे हे अत्यंत साहजिकच आहे.

एवढे दिवस तू हर प्रयत्नाने कितीतरी अडचणींवर मात करून माझी भेट घेत राहिलीस. पण सध्या केवळ बाह्य अडचणींमुळे तुला ते शक्य होत नाही म्हणून मी काही स्वस्थ बसू शकत नाही. आता प्रयत्न करण्याची पाळी व जबाबदारी माझी आहे. तेव्हा प्रयत्नपूर्वक, पण युक्ती प्रयुक्तीने तुझी भेट मी घेत रहाणार आणि तुला माझी भेट देत रहाणार. उरला

प्रश्न जो निंदेचा नि टीकेचा, तो तर आपल्या संबंधात आता शिल्लकच राहिलेला नाही. आपले संबंध निश्चितच व केव्हाच त्याच्या पलीकडे गेलेले आहेत. आपल्याला तरी लौकिकाची चाड व पर्वा करण्याचे कारण राहिलेले नाही. आपल्या प्रेमाच्या शुद्धत्त्वाची ग्वाही इतर कोणीही देण्याची जरुरी नाही. त्याचे शुद्धत्त्व हे स्वयंसिद्ध आहे. त्यासाठी मी माझ्या अंतःकरणातील प्रेरणेलाच नेहमी प्रमाण मानतो. मुख्य म्हणजे तुझाही तसाच भाव आहे आणि आपल्या प्रेमसंबंधाच्या शुद्धत्त्वाची खात्री तुझ्या ठिकाणीही तेवढीच आहे, जेवढी माझ्या ठिकाणी आहे.

राधे, आणखीन एक गोष्ट लक्षात ठेव, की गोकुळामध्ये कोणाच्याही घरात केव्हाही जाण्याचा तर माझा हक्कच आहे. सर्वांना जाऊन भेटणे आणि त्यांची ख्याली खुशाली विचारणे हा माझा स्वभाव तर सर्वांनाच माहीत आहे. त्यामुळे मी कधीही कोणाकडे गेलो तर त्याचे कोणालाही नवल वाटत नाही. आता सुद्धा मी तुमच्या घरी आलो तेव्हा मला अजिबात ठाऊक नव्हते, की तू घरी एकटीच आहेस म्हणून. मी इकडून सहज जात होतो तो वाटेत तुमचे घर दिसले. बरेच दिवसात तुमच्यापैकी कोणाचीही भेट झालेली नाही. म्हणून विचार केला की तुमची सर्वांची नीट विचारपूस करावी आणि सर्वांची खुशाली जाणून घ्यावी. घरात येऊन पहातो तो काय, तू येथे एकटीच आहेस. आता त्याला मी तरी काय करणार? लगेच निघून जाणार का? तेही बरोबर ठरले नसते. तुला, एवढेच काय तुझ्या घरच्यांनाही जर हे कळले असते तर नक्कीच आवडले नसते. हो की नाही? बरे, आता घरी आलेल्या पाहुण्यांचा काही पाहुणचार तरी करशील की नाही? तुमच्या घराची काही रीत भात आहे की नाही? काही न घेताच जर मी इकडून तसाच निघून गेलो तर तुझ्या घरचे लोक उगाच तुलाच रागावतील. तेव्हा राधे, आता जास्त वेळ दवडू नकोस. मलाही वेळ नाही. नेहमीप्रमाणेच मी घाईघाईतच आहे. लवकर मला काहीतरी हातावर दे, म्हणजे मग मी निघायला मोकळा.''

आपला हात पुढे करून उभा राहिलेला कृष्ण राधेशी मोठ्या गंभीरतेच्या अविर्भावात जरी बोलत होता तरी त्यातील त्याचा मिश्किल भाव काही लपून राहिला नव्हता. त्याच्या बोलण्याच्या सुरावरून व त्याच्या मुखावरून राधेला तर ती मिश्किलता लगेचच कळली होती. म्हणूनच कृष्णाचे बोलणे ऐकत असतानाच राधाही अगदी मोकळेपणाने हसून कृष्णाला दाद देत होती. कृष्णाने पुढे केलेल्या हातावर राधेनेही तेवढ्याच मिश्किलतेने आपल्या हाताने टाळी दिली, तर कृष्णाने राधेचा हात सोडलाच नाही. एवढेच नव्हे, तर कृष्णाने राधेचा दुसरा हातही आपल्या हातात घेतला आणि राधेचे दोन्ही हात आपल्या दोन्ही हातात गुंफून घेतले. आपले बोलणे संपवता संपवता कृष्णही राधेच्या हसण्यामध्ये सामील झाला आणि त्या उभयतांच्या हास्याचा फुलोरा कितीतरी वेळ तेथे फुलून राहिला.

कृष्णाच्या हातातील आपले हात सोडवून घेऊन कृष्णाला देण्यासाठी काहीतरी आणावे म्हणून राधा घराच्या आतील भागाकडे जाऊ लागली. कृष्णाने दह्याच्या डेऱ्याकडे बोट करून राधेला खूण केली. कृष्णाची खूण राधेला कळली आणि आवडलीही. तिने आपल्या हाताने त्या डेऱ्यातील लोणी काढले आणि कृष्णाच्या हातावर ठेवू लागली. तर कृष्णाने राधेच्या हातातील लोणी आपल्या मुखात घेतले. एवढेच नव्हे, तर त्यातील थोडे लोणी आपल्या हाताने राधेच्या मुखात भरवले.

कृष्णाने लोणी खाता खाताच राधेला हाताच्या खुणेनेच 'छान, मस्त' असे सूचित केले. लोण्याने माखलेले आपले हात व मुख त्याने प्रेमाने राधेच्या पदरालाच पुसले आणि तो राधेला म्हणाला,

''ए राधे, खरेच तुझ्या हाताची गोडी काही औरच आहे. असे गोड लोणी खाण्यासाठी मला जर रोजच या वेळेस यावे सारखे वाटले तर माझी काय बरे चूक आहे? आता रोज मी जर या वेळेसच तुझे लोणी खाण्यासाठी आलो तर त्याचा दोष मला मात्र देऊ नकोस. तुला आधीच सांगून ठेवतो. बरे, एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेव. अनय किंवा म्हाळसेने कोणी जर तुला विचारलेच की 'कृष्ण येथे आला होता का?' तर जरूर सांग की 'हो, कृष्ण येथून जात होता आणि सहजपणे घरात डोकावला. आपल्या सर्वांची त्याने चौकशी केली आणि लगेचच निघून गेला.' परंतु कोणी तुला विचारलेच नाही तर मात्र अगदी 'आळी मिळी गुपचिळी' ठेव. तू आपणहून कोणाला काहीही सांगूच नकोस. कारण 'मी येथे आलो नाही, तू मला लोणी दिले नाहीस आणि ते मी खाल्ले नाही' हेच खरे आहे. हो की नाही?'' असे म्हणून हसत हसत कृष्ण जसा धावत पळत आला होता तसाच धावत पळत निघून गेलाही.

हे लक्ष्मी, लोणी म्हणजे नवनीत. तेव्हा राधा व कृष्ण यांचे प्रेमही नवनीताप्रमाणेच शुद्ध, मुलायम पण तरीही नित नवे आणि अतिशय आनंददायी होते.

आपल्या अनुपस्थितीत कृष्णाचे आपल्या घरी येणे-जाणे असते असे म्हाळसेच्या कानावर आले मात्र, तिने रागाने आकाश पाताळ अगदी एक केले. एक दोनदा तर यमुना नदीवरून पाणी घेऊन घरी परतल्यावर जेव्हा म्हाळसेने राधेच्या पदराला लोणी लागलेले पाहिले तेव्हाच तिच्या मनात शंका आली. तिने लागलीच राधेला त्याचा खुलासा विचारला. राधेनेही थोडेसे वरमल्याचा आविर्भाव करून 'ताक घुसळताना डेऱ्यातील लोणी अंगावर उडाले आणि ते मी माझ्या पदराने पुसले' असे उत्तर दिले. पण त्या उत्तराने म्हाळसेचे समाधान न होता तिचा राधेवरील संशय अधिकच बळावला. 'कृष्णच येथे येऊन गेला' यासंबंधीची म्हाळसेला तर अगदी खात्रीच पटली. ''एवढी वर्षे मी ताक घुसळत होते तेव्हा माझ्या अंगावर कधी लोणी उडाले नाही ते?'' असे राधेला ऐकू जाईल एवढे मोठ्याने पुटपुटत मग म्हाळसा नुसती चडफडत बसली. अनयाच्या कानावर तिने हे सर्व घातले आणि राधेचे हे 'थेर' ताबडतोब थांबविण्यासाठी अनयास बजावले.

अनयाने राधेकडे चौकशी केली असता तिने मान्य केले की 'या बाजूला कृष्ण केव्हा जर आला तर घरात डोकावून जातो आणि आपल्या सर्वांची विचारपूस करून लगेच निघून जातो.' अनयाने स्पष्ट शब्दात आपली नापसंती व्यक्त केली आणि राधेला खडसावलेही की ''ही गोष्ट गैर आहे हे तुलाच कळले पाहिजे आणि तसे तूच कृष्णालाही सांगितले पाहिजे. नाही तर मला त्याची गंभीरतेने दखल घेऊन काहीतरी कडक कारवाई करावी लागेल.'' म्हाळसेने पाणी आणण्यासाठी बाहेर जायचेही थांबवले. नाही तरी तिला ते झेपत नव्हतेच. पण घरात पाणी तर आवश्यक होतेच. मग त्यासाठी राधेलाच पुन्हा बाहेर पडणे भाग पडले आणि तिचे यमुनातीरी जाणे सुरू झाले. मग राधा व कृष्ण यांचा भेटण्याचा मार्ग मोकळा झाला आणि त्यांचे भेटणे पूर्वीसारखेच चालू झाले.''

*****

# भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व

**बो**लता बोलता नारद थोडासा थांबला आणि लक्ष्मीकडे सहेतुक नजरेने पहात राहिला. जणू लक्ष्मीच्या काहीतरी अभिप्रायाचीच तो वाट पहात होता. नारदाचा हेतू लक्ष्मीच्याही लगेचच लक्षात आला. त्यामुळे थोडा वेळ थांबूनच लक्ष्मीही विचारपूर्वक नारदाशी बोलू लागली.

''हे नारदा, या कथा ऐकताना मनाला अतिशय बरे वाटते खरे. परंतु एकंदरीत विचार करताना मात्र निश्चितपणे जाणवते की या गोष्टी वाटतात तेवढ्या साध्या व सोप्या नाहीत. जेवढ्या सहजपणे तू त्या वर्णन करून सांगत आहेस तेवढ्या त्या सहज नाहीत. त्यासाठी मनाचे केवढेतरी बळच हवे. तरच सर्व काही शक्य आहे. कारण जरा जरी मनाची दुर्बलता असेल तर ती ऐन वेळी आड आल्याशिवाय राहणार नाही. असे मनोबळ राधेपाशी होते आणि ते तिला कृष्णप्रेमातूनच प्राप्त झालेले होते हे माझ्या पूर्णपणे लक्षात आले आहे. कृष्णाच्या ठिकाणी त्याचे आत्मबळ सहजपणे होतेच. परंतु राधेच्या मनोबळाचेच मला अधिक कौतुक वाटते. कारण शेवटी सर्वांचा परिणाम तिलाच झेपवून न्यायचा होता. सर्वाला प्रत्यक्ष तोंड तिलाच द्यावे लागले असते. तिच्या कुटुंबाच्या चौकटीला जर धक्का पोहोचला असता तर त्याचे बाह्य दुष्परिणाम तिलाच भोगावे लागले असते. कोणी निंदा व टीका केली असती तर कृष्णाने तिकडे लक्षच दिले नसते. परंतु राधेला मात्र ते सर्व प्रत्यक्ष सहनच करावे लागले असते.

या दृष्टीने हे नारदा, मला मात्र पुन्हा पुन्हा असे वाटत राहते की राधेच्या या अडचणींचा कृष्ण काही विचार करीत होता की नाही? माझ्या मनात कृष्णाविषयी जराही शंका नाही. तसा विचार तो नक्कीच करीत असणार याची मला अगदी खात्री आहे. परंतु सकृत्‌दर्शनी तरी कृष्णाने एवढा धोका पत्करणे आवश्यक होते का? असा प्रश्न माझ्या मनात येतोच आहे. सुरुवातीला कृष्णानेच पुढाकार घेणे योग्य होते. कारण त्यामुळेच राधा व कृष्ण यांचे प्रेमाचे एवढे संबंध जुळले हे अगदी खरे आहे. परंतु एकदा संबंध जुळल्यावर मग जशा गोष्टी घडत होत्या तशाच घडू दिल्या असत्या तर बरे झाले नसते का? उगाचच धोका पत्करण्याएवढे काय कारण होते बरे? कारण पुढाकार घेणे व धोका पत्करणे यात केवढा तरी फरक आहे. पुन्हा त्यात जो धोका होता तो राधेलाच जास्त होता, नाही का? हे नारदा, तेव्हा कृष्णाच्या अंतःकरणाची अवस्था त्या वेळेस निश्चित काय होती हे मला नीट समजावून सांग. त्याहीपेक्षा कृष्णाच्या अंतःकरणातील अवस्थेला अनुरूप असलेला राधेचाही भाव कसा होता हे जाणून घेण्याची माझी आतुरता अधिक आहे.''

लक्ष्मीचे बोलणे ऐकता ऐकता गंभीर होत असलेला नारद तेवढ्याच गंभीरपणे पुन्हा लक्ष्मीशी बोलू लागला. ''हे लक्ष्मी, हेच तर कृष्णावताराचे विशेषत्व होते. मुळात कृष्णाचा सगुण अवतार हाच मुळी या नारायणाच्या ठिकाणी 'आपले

प्रेम अनुभवावे' अशी ऊर्मी निर्माण झाल्यामुळे आणि त्या प्रेमऊर्मीची पूर्ती करण्यासाठी झाला होता. तीच मूळ प्रेमउर्मी कृष्णाच्याही अंतःकरणात अगदी पहिल्यापासून आणि सहजपणे होती. त्यामुळे हे स्वतःचे स्वतःवरील प्रेम म्हणजेच आत्मप्रेम, कृष्ण अनेकांना निमित्त करून अनुभवीत असे. म्हणूनच अनेकांना ईश्वरी प्रेम अनुभवण्याची संधी मिळाली. त्यातूनच काही जणांच्या ठिकाणी कृष्णाविषयी प्रेम निर्माण झाले. परंतु कृष्णाचे माहात्म्य त्यांना माहीत नसल्यामुळे या प्रेमाचे केवळ सुखच ते अनुभवू शकले. त्यामुळे त्यांची संसाराची दुःखे कायमची दूर झाली खरी, परंतु त्यांना खरा आनंद अनुभवता आला नाही, ज्याचा नित्य अनुभव कृष्णाठायी होता. म्हणूनच राधेसारखीने जिने कृष्णाचे प्रेमही अनुभवले आणि त्याचे माहात्म्यही जाणले, तिच्याठायी मात्र आत्यंतिक कृष्णप्रेमातून कृष्णाचे माहात्म्य अनुभवण्याचा ध्यास निर्माण झाला. कृष्णच तिचा सर्वस्वी झाला आणि ती सर्वस्वी कृष्णाचीच आणि कृष्णासाठीच आहे असाच तिचा भाव झाला. या राधेच्या भक्तिभावाची पूर्ती करण्याची जबाबदारी केवळ राधेचीच नव्हती तर कृष्णाचीही होती, असा भाव कृष्णाचा होता आणि तशी पूर्ती तो करीत होता. हेच तर सगुण प्रेमभक्तिभावाचे विशेषत्व आहे.

हे लक्ष्मी, आपल्या ठिकाणच्या ईश्वरी अस्तित्वाचा अनुभव घेऊन व्यापक परमेश्वराशी ऐक्य पावण्याचे इतरही अनेक मार्ग आहेत. ज्ञानमार्ग, ध्यानमार्ग, योगमार्ग अशा या मार्गांमध्ये ज्याची त्याची वाटचाल ज्याची त्यालाच करावी लागते. त्या मार्गात काही अडचणी आल्या तर अधिकारी सत्पुरुषांकडून मार्गदर्शन घेता येते. परंतु प्रयत्न फक्त ज्याचे त्यालाच करावे लागून पूर्तीही ज्याची त्यालाच करावी लागते. ज्ञानमार्गाने जाणाऱ्याच्या बुद्धीला त्याच्या बुद्धीच्या मर्यादेमुळे ज्ञान पूर्णपणे आकलन होऊ शकले नाही तर आत्मज्ञानी असे सत्पुरुष त्याला ते ज्ञान पुन्हा पुन्हा आणि अनेक अंगाने सांगतील. पण तरीही जर त्याच्या बुद्धीला ते ज्ञान आकलन होऊ शकले नाही आणि त्याच्या मनाचे दोषही जर कायम राहिले असतील, तर त्या सत्पुरुषांचाही काही इलाज चालणार नाही. तेही काही मदत करू शकणार नाहीत. एवढेही करून एखाद्याच्या बुद्धीला सर्व ज्ञान आकलन झाले असे जरी त्याला वाटले, तरी त्या ज्ञानाचा अनुभव हा त्याचा त्यालाच घ्यायला लागतो. परंतु तेवढेसे ते सोपे नसते तर अत्यंत कठीणच असते. कारण अनुभवाची अवस्था ही बुद्धीच्याही पलीकडची आहे आणि ज्ञानमार्गी शब्दज्ञानालाच अनुभव मानून त्याच्या अहंकाराने बुद्धीपाशीच अडकून राहतो.

ध्यान मार्गाचा अवलंब करणाऱ्याला त्याच्या ठिकाणी ईश्वराचे अस्तित्व आहे हे माहीत झालेले असते. त्याच ईश्वराचे ध्यान धरून त्या ईश्वराशी ऐक्य पावण्याच्या प्रयत्नात तो सदैव असतो. परंतु त्या ईश्वरी तत्त्वाला काहीच रंगरूप नसल्यामुळे त्या ईश्वराचे ध्यान करायला काहीच आधार वा माध्यम नसते. त्याच बरोबर मनातील इतर व्यवधानेही असतातच. ती सर्व व्यवधाने बाजूला सारून ईश्वराकडे ध्यान लावण्याचा त्याचा प्रयत्न चालू असतो. परंतु ही व्यवधाने एवढ्या सहजासहजी बाजूला होत नाहीत. त्यातूनही थोडावेळ ती व्यवधाने बाजूला झालीच, तरी पुन्हा लगेचच मनाचा पूर्ण ताबा घेतात आणि ध्यानाच्या अवस्थेला बाधीत करतात. अशा तऱ्हेने ध्यानमार्गी ध्यानधारणेने ईश्वरापर्यंत पोहोचूही शकत नाही, मग त्या ईश्वराला प्राप्त करून घेणे तर दूरच राहिले. पण अशा ध्यानमार्गीयालाही दुसरा कोणीही काहीच मदत करू शकत नाही. कारण तेथे दुसऱ्या कोणाचाही काहीच इलाज चालू शकत नाही. केवळ त्याचे त्यानेच प्रयत्न चालू ठेवणे

एवढेच त्या ध्यानमार्गीयाच्या हातात असते. त्यात यशस्वितेची खात्री तर नसतेच परंतु तशी शक्यताही अत्यंत कमीच असते.

योग मार्गाने जाणारा हा देहभान विरहीत अशा समाधीच्या आधारे ईश्वराशी योग जुळवून ऐक्य पावण्याचा प्रयत्न करीत असतो. बाह्य विषयांकडे सहज प्रवृत्ती असलेल्या मनाच्या सर्व वृत्तींचा अवरोध करून, मनाला देहापासून वेगळे करण्याचा आणि अंतरातील ईश्वरी शक्तीशी त्या मनाचा संयोग करण्याचा हा प्रयत्न अत्यंत कठीणच आहे. त्यासाठी केवढी तरी खडतर अशी तपश्चर्याच करावी लागते. कारण मनाला उन्मनी अवस्थेत नेणे व ठेवणे ही साधी गोष्टच नाही. मनाला बाह्य विषयांपासून प्रयत्नपूर्वक दूर करण्यासाठी नेत्र व कान बंद करून घ्यावे लागतात. पण तरी मनःचक्षूंपुढे सर्व दिसत असतेच आणि सर्व ऐकूही येत असतेच. मग बाह्यांगाने कुठेतरी प्रयत्नपूर्वक एकांतात व नीरव शांततेच्या ठिकाणी जाऊन बसावे लागते.

मन एकाग्र करण्यासाठी जेवढे जेवढे म्हणून हट्टाने प्रयत्न करावेत तेवढी तेवढी मनाची सहजावस्था निघून जाते. आधीच वासनेने व विकाराने युक्त असल्यामुळे अशुद्ध झालेल्या मनावरील दबाव व ताण वाढतच राहतो. त्यामुळे या प्रयत्नपूर्वक लावलेल्या समाधीचा कशाने व केव्हा भंग होईल हे सांगता येत नाही. एखाद्या क्षुल्लकशा कारणाने वर्षानुवर्षे केलेली तपश्चर्या बाधीत होते आणि मनाची अधोगती होऊन ते पूर्वस्थितीला घसरून येते. अशा योगमार्गीयांनासुद्धा बाहेरून दुसऱ्या कोणालाही मदत करता येणे शक्यच नसते. कारण त्यांच्यासाठी दुसरा कोणी हा त्यांच्या मार्गातील एक अडथळाच असतो. त्यामुळे दुसरा कोणी त्यांच्यामध्ये त्यांना नको असतो आणि त्यांचे त्यांना तर जमत नसते. तरीही हट्टाने ते योगसाधना करीत रहातात. परंतु त्या साधनेचे साध्य मात्र त्यांना कधीच गाठता येत नाही. नित्य साधना करीत रहाण्यातच स्वतःला धन्य मानून खोटे समाधान अनुभवण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. अर्थातच त्या प्रयत्नांत ते योगमार्गी कधीच यशस्वी होत नाहीत.

हे लक्ष्मी, या सर्वांपेक्षा भक्तिमार्गाने जाणारा हा आगळा वेगळा व विशेष असतो. ईश्वरस्वरूपाचा अनुभव घेणाऱ्या महात्म्यांनाच तो ईश्वराचे रूप मानतो. प्रेमस्वरूप अवस्थेतील महात्म्यांच्याकडून त्यांच्या सहवासात ईश्वरी प्रेमाचा अनुभव त्या भक्ताला सहजपणे लाभत असतो. त्या प्रेमाने आकर्षित झालेले त्याचे मन पुन्हा पुन्हा त्या महात्म्यांच्या संगतीत येत रहाते. त्यांच्या संगतीत भक्ताच्या मनालाही मग प्रेमाचा संग जडतो. मनाची प्रेमासक्ती वाढत राहते आणि मन संसारातील विचारांपासून व विकारांपासून सहजपणे अनासक्त होत राहते. त्यासाठी वेगळे कुठलेही प्रयत्न करावे लागतच नाहीत. महात्म्यांच्या नित्य सहवासात राहिल्याने त्यांचे ईश्वरी अनुभवाचे जीवनही पाहायला मिळते आणि त्यांचे ईश्वरी माहात्म्य जाणवू लागते. मग मनाठायी प्रेमामुळे त्यांच्याच रूपाचे ध्यान, त्यांचेच व्यवधान लागून राहते आणि मन त्यांच्या प्रेमस्मरणात अधिकाधिक रमू लागते.

ईश्वरी स्वरूपाच्या अनुभवाचे ज्ञान महात्म्यांच्या मुखातून ऐकता ऐकता, तो अनुभव त्या महात्म्यांच्याच ठिकाणी आहे याचा निश्चय श्रद्धेने कायम झालेला असतो. त्यामुळे त्यांच्याठायी ईश्वरी स्वरूपाच्या अनुभवाची बाह्य लक्षणे त्या भक्तांना सहजपणे पाहता व जाणता येतात. ईश्वरी स्वरूप जरी निर्गुण निराकार असले, तरी त्या ईश्वरी स्वरूपाचा अनुभव घेणाऱ्या सगुण महात्म्यांचीच भक्ति त्या भक्तांकडून आत्यंतिक प्रेमाने व श्रद्धेने घडू लागते. ईश्वराच्या त्या सगुण रूपालाच 'माझा देव' असे म्हणून व मी 'त्याचा भक्त' हा भाव धरून त्या भक्तांकडून मग भक्तिमार्गाची वाटचाल सुरू होते. अलक्ष्य अशा ईश्वरी स्वरूपाचेच सगुणरूप असलेला असा हा देव त्या भक्तांचे सहज लक्ष्य होतो. त्या सगुण रूपावर प्रेम करून त्याचे स्वरूप माहात्म्य जाणावे आणि त्याचे स्वरूप माहात्म्य जाणून त्याच्यावर अखंड प्रेम करीत रहावे असा ध्यास त्या भक्तांच्याठायी त्यांच्या देवावरील आत्यंतिक प्रेमामुळे लागतो. त्या प्रेमध्यासातून निर्माण झालेला भक्तिभाव आपल्या देवालाच अर्पण करून ते भक्त आपल्या प्रेमध्यासाची पूर्ती करीत रहातात.

अशा भक्तांच्या भक्तिभावाचा स्वीकार त्या महात्म्यांकडूनही होतो. कारण त्यांनाही त्यांच्या प्रेमस्वरूप अवस्थेमुळे त्यांच्याठायीच्या ईश्वरी प्रेमाचा बाह्यांगानेही अनुभव घेण्यासाठी जोडीदार हा हवा असतोच. भक्तांना त्यांच्या भक्तिभावामुळे महात्म्यांच्या व त्यांच्या अनुभवाच्या अवस्थेतील अंतर जाणवत राहते आणि व्याकूळ करते. मग ती विभक्तता दूर व्हावी या ध्यासापोटी त्या भक्तांकडून सहजपणे त्या महात्म्यांची काया, वाचा, मने अशी सर्वांगीण भक्ती घडू लागते. अन्योन्य प्रेमातून अशी देव व भक्त यांची जोडी जेव्हा जमते तेव्हा तेथे आनंदाचा अनुभव हा उभयतांना घडोघडी येऊ लागतो. परस्परांचे प्रेम अनुभवून आनंदाचा अनुभव घेण्याची आतुरता उभयतांच्या ठिकाणी असते. अर्थात देवाच्या ठिकाणची आतुरता सुरुवातीला भक्तापेक्षा जास्तच असणार. त्यामुळेच प्रेमभावाची पूर्ती करण्याची जबाबदारी व पुढाकार हा देवाचाच जास्त असतो आणि साहजिकपणे तो तसा दिसतोही. पण एकदा का भक्त देवाच्या प्रेमाने युक्त होऊन राहिला, की त्याच्या ठिकाणी देवाला आपले प्रेम अर्पण करण्याचा जो भक्तिभाव निर्माण होतो, त्या भक्तिभावाची पूर्ती करण्याची जबाबदारी व पुढाकार साहजिकपणे भक्ताचाच असतो. देव ज्याला अत्यंत प्रिय आहे असा भक्त देवालासुद्धा अत्यंत प्रिय होऊन राहतो यात नवल ते काय? किंबहुना देवाला तर भक्त आपलेपणापोटी आधीपासूनच म्हणजे अगदी सुरुवातीपासूनच आवडत असतो. म्हणून तर एक दिवस देव हाही भक्ताच्या आवडीचा होतो आणि मग दोघेही एकमेकांना प्रिय होऊन राहतात. या प्रियतेमधूनच ईश्वरस्वरूप देवाशी भक्ताचे ऐक्य शक्य होते आणि ईश्वराशी पुन्हा काही वेगळेपणाने ऐक्य साधणे आवश्यकच रहात नाही.

हे लक्ष्मी, म्हणूनच या नारायणालासुद्धा त्याच्याशी ऐक्य पावण्याचे जे अनेक मार्ग आहेत, त्यामध्ये भक्तिमार्ग आणि त्या भक्तिमार्गाने त्याच्या जवळ येऊन ऐक्य पावणारा भक्त हा सर्वाधिक प्रिय आहे. कारण भक्त हा आपल्या प्रेमाने देवाला अगदी सुरुवातीपासूनच बांधून घेतो आणि स्वतःलाही त्याच प्रेमाने देवाशी बांधून ठेवतो. भक्तांच्या भक्तिमार्गाच्या वाटचालीत ही प्रेमाची बांधिलकी अधिकाधिक व्यापक होऊन वाढत राहते. भक्तिभावाने ऐक्य झाल्यावरती ही बाह्य बंधनेही

सहजपणे गळून पडतात आणि भक्त मुक्तपणे देवप्रेमाचा अनुभव घेत राहतो. देव व भक्त यांची ही परस्पर प्रेमाची बांधिलकी हेच भक्तिमार्गाचे विशेषत्व आहे आणि यातच भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व आहे.''

नारदाच्या बोलण्याने प्रभावित झालेली लक्ष्मी थोडीशी गंभीर होऊनच नारदाशी बोलू लागली.

''हे नारदा, तुझ्याकडून प्रगट झालेले सगुण प्रेमभक्तिचे माहात्म्य खरोखरीच अद्‌भूत व अलौकिक आहे. ते जेवढे जेवढे श्रवण करावे तेवढी तेवढी श्रवणाची गोडी अधिकाधिक वाढतच राहते. त्याचे श्रवण करणे एवढे गोड आहे, मग तो प्रेमभक्तिचा अनुभव किती गोड असेल बरे, असा केवळ विचार करीत न बसता त्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा हेच अधिक बरे आणि हेच योग्य होय. परंतु अशा ईश्वरस्वरूपाचा अनुभव घेणाऱ्या महात्म्यांची भेट व्हावी कशी आणि भेट झाली तरी त्यांचे माहात्म्य ओळखावे कसे हाच मोठा प्रश्न आहे. राधेचे ते परमभाग्यच म्हणायचे की ईश्वरस्वरूप असा प्रत्यक्ष अवतारच तिला कृष्णाच्या रूपाने भेटला. त्याचे प्रेम तिला सहजपणे मिळत गेले आणि हळुहळू त्या प्रेमाचा अनुभव घेता घेता तिच्याही ठिकाणी कृष्णप्रेम निर्माण झाले. प्रत्यक्ष सहवासाने व संवादाने राधेला कृष्णाचे अंतःकरण जाणता येऊ लागले आणि त्याच्या ईश्वरस्वरूपाचे माहात्म्यही जाणवू लागले.

हे नारदा, परंतु गोकुळातील इतर सर्वांच्या बाबतीत असे थोडेच घडणार होते? ते तर कृष्णाच्या माहात्म्याविषयी पूर्णपणे अनभिज्ञच असणार. त्यामुळे ते कृष्णाकडे एक सामान्य व्यक्ती म्हणूनच पाहत राहणार. त्यामुळे राधा व कृष्ण यांचे प्रेमसंबंध हे त्यांना केवळ सांसारिक पातळीवरचेच दिसणार. यात त्यांना दोष कसा देता येईल बरे? फार तर कृष्णाचे प्रेम त्यांना थोडेफार कळत असेल. परंतु कृष्णाचे ईश्वरस्वरूप व त्याचा अनुभव या गोष्टी त्यांना कशा जाणवणार? केवळ कृष्ण सर्वांवर प्रेम करतो एवढ्यावरूनच त्यांना त्याचे माहात्म्य कसे बरे कळणार? नाही का? कृष्णाकडून दुसऱ्याही काही अद्‌भूत गोष्टी घडल्या असत्या, की ज्या सामान्यांच्या मनाच्या कल्पनेच्या व बुद्धीच्या आकलनाच्या पलीकडे असतात, तरच सामान्यांनाही कृष्णाचे असामान्यत्व व विशेषत्व जाणवले असते. त्यांच्याकडून कृष्णाविषयी काही तरी वेगळा विचार घडला असता आणि त्यांना कृष्णाकडे पाहण्याची काहीतरी वेगळी दृष्टीही लाभली असती. तेव्हा सर्व सामान्यांनी राधा व कृष्ण यांच्या प्रेमसंबंधावर टीका व निंदा करणे हे साहजिकच आहे. तशी टीका व निंदा जाणून बुजून स्वतःवर ओढवून घेण्याची राधा व कृष्ण यांना आणि विशेषतः कृष्णाला काय बरे आवश्यकता होती? हेच मला अजून नीटपणे कळत नाही. तेव्हा हे नारदा, तू मला पुन्हा ते सर्व पूर्णपणे समजावून सांग ना!''

लक्ष्मीच्या बोलण्यावर क्षणभरही न थांबता नारद उद्‌गारला, ''अगं लक्ष्मी, लोकांची टीका व लोकांची निंदा याचा किती विचार करायचा आणि त्याला किती महत्त्व द्यायचे हेही एकदा ठरवावेच लागते ना? कारण लोकांची मते अज्ञानावर, अपुऱ्या माहितीवर आणि दूषित पूर्वग्रहांवर अवलंबून असतात. त्याला वाजवीपेक्षा जास्त किंमत देण्याचे अथवा त्याची दखल घेण्याचे काहीच कारण नाही. तेव्हा ज्यांनी कृष्णाचे माहात्म्य जाणले नाही त्यांना दोष देणे योग्य नाही हे जरी खरे असले, तरी राधेसारख्या ज्यांनी ते जाणले त्यांनी कृष्णप्रेमाचा अनुभव का घेऊ नये? त्यांनी कृष्णाची भक्ती का करू नये

बरे? खरे की नाही? त्यांनी अशा लोकांच्या टीकेला घाबरण्याचे काहीच कारण नाही. लोकांची निंदा मुद्दाम ओढवून घेण्यासाठी काही करायचे नाही हे बरोबरच आहे. परंतु म्हणून काही करायचेच नाही हे मात्र बरोबर नाही. तेव्हा आपण प्रेमाने व श्रद्धेने करीत रहावे आणि त्यासाठी कोणी काही टीका व निंदा केली तरी त्याकडे दुर्लक्ष करावे हेच सर्वात उत्तम होय.

तेव्हा राधेच्या ठिकाणी कृष्णप्रेम निर्माण झाले आणि कृष्णाचे अंतःकरण जाणता जाणता तिला कृष्णाचे माहात्म्यही जाणवू लागले. त्यातूनच तिच्या ठिकाणी कृष्णाविषयी भक्तिभाव निर्माण झाला. राधेच्या भक्तिभावाची कृष्णाला खात्री वाटत असल्यामुळेच त्याने तिच्या भक्तिभावाचा स्वीकार केला. कारण भक्तिभावाचा स्वीकार करणे ही केवळ कृष्णाची जबाबदारी नव्हती, तर तो त्याचा धर्मच होता. तेच तर त्याचे जीवनकार्य होते आणि त्याची पूर्ण जाणीव व आत्मविश्वास कृष्णाच्या ठायी अगदी लहानपणापासूनच सहजपणे होता. कृष्णावताराचे तेच तर आगळे वेगळेपण व विशेषत्व होते. लक्ष्मी, हे मी तुला पहिल्यापासूनच सांगत आहे. ते नीटपणे व कायमचे लक्षात ठेव. म्हणजे मग तुझ्या मनात कुठलीच शंका शिल्लक राहणार नाही. आता एक गोष्ट निश्चित आहे, की राधेच्या ठिकाणी जे कृष्णाविषयी प्रेम निर्माण झाले ते कृष्णाच्या राधेवरील प्रेमामुळे निर्माण झालेले होते आणि कृष्णाठायी राधेविषयी प्रेम निर्माण झाले त्याचे मूळ कृष्णाच्या अंतःकरणातील प्रेमस्वरूप अवस्थेमध्ये होते. म्हणूनच राधेचा भक्तिभाव स्वीकारण्यामध्ये राधा व कृष्ण या दोघांच्याही परस्परांवरील प्रेमाचीच पूर्ती होत होती. त्याचसाठी राधेचा भक्तिभाव स्वीकारणे हे कृष्णासाठीही त्याच्या ठायीच्या प्रेमपूर्तीसाठी अत्यंत आवश्यकच होते. एकदा एखादी गोष्ट आवश्यक आहे असे ठरले की मग त्या गोष्टीच्या पूर्तीसाठी वा प्राप्तीसाठी स्थळ, काळ व वेळ या गोष्टी दुय्यम पण पूरक ठरतात. त्या जशा असतील तसा त्यातून मार्ग काढणे हेच उचित ठरते आणि मुख्य आपला हेतू साधणे हेच योग्य ठरते.

हे लक्ष्मी, तुझा दुसरा प्रश्न मात्र अगदी बरोबर आहे. सर्वसामान्यांना कृष्णाचे माहात्म्य सहजासहजी कळणे शक्य नव्हते हे खरेच आहे. कृष्णाकडून ज्यांना प्रेम मिळाले ते त्या प्रेमाने निश्चितच सुखावले. त्यांना कृष्णाचे कौतुकही जरूर वाटले. परंतु कृष्णाचे माहात्म्य मात्र त्यांना कळू शकले नाही. कारण कृष्णाचे माहात्म्य जे त्याच्या अंतःकरणाच्या अवस्थेत होते, तेथपर्यंत पोहोचणे सामान्यांना शक्य नव्हतेच. परंतु त्याहीपेक्षा त्यांना ते आवश्यकही वाटत नव्हते, हे महत्त्वाचे. त्यामुळे सामान्यजन बाह्यांगाने कृष्णाच्या जवळ येऊनही मनाने त्याची खरी जवळीकता साधू शकले नाहीत. भाग्याने मिळालेल्या संधीचा लाभ सर्वांनाच पूर्णपणे घेता आला नाही. कारण प्रेमापलीकडील कृष्ण काही त्यांना दिसू शकला नाही. त्यांचे कृष्णाकडे पाहणे हे केवळ प्रेमासाठी व प्रेमापुरतेच राहिले.

*****

## नारदाचा कंसाला हितोपदेश

**हे** लक्ष्मी, परंतु गोकुळवासीयांचे भाग्य तेवढेच नव्हते. तर ते त्याहीपेक्षा जास्त होते. कारण कृष्ण जसा जसा मोठा होऊ लागला होता तसा तसा त्याच्याकडून पराक्रमही घडू लागला होता. त्यातून कृष्णाठायीची ईश्वरी शक्तीच प्रगट होऊ लागली होती आणि ती तशी काही जणांना जाणवू लागली होती. त्याचे असे झाले, की कंसाच्या मनातील देवकीच्या पुत्राविषयी असलेली भीती नाहीशी झालेली नव्हती. देवकीला आठवा पुत्र न होता मुलगी झाली आणि तीही जन्मतःच मृत पावलेली होती हे त्याला विचित्रच वाटले होते. त्या गोष्टीवर त्याचा मुळीच विश्वास बसलेला नव्हता. त्याच्या मनातील शंका कायम असल्यामुळे तो सदैव भीतीग्रस्त असे. त्याच्या मनाची नेहमीच बेचैनावस्था असे.

'देवकीच्या आठव्या पुत्राला, पहारेकऱ्यांना गुंगारा देऊन कोणीतरी पळविले असेल आणि त्याच्या बदली एक कोणाचीतरी मृत कन्या आणून ठेवली असेल का?' अशा विचाराने तो अगदी बेजार झाला होता. त्यासाठी त्याने त्या गोष्टीचा गुप्तपणे छडा लावण्यास सुरुवात केली. आपल्या गुप्त हेरांना त्याने त्याच वेळी जन्मास आलेल्या मथुरेतील व मथुरेच्या परिसरातील सर्व बालकांचा तपास करावयास व त्यांच्यावर नजर ठेवण्यास सांगितले. भीतीने पछाडलेला कंस तर एवढ्या टोकाला गेला की देवकीच्या पुत्राला शोधण्यासाठी त्याने मायावी राक्षसांचेही सहाय्य घेतले. परंतु त्याला त्यात यश मिळाले नाही.

कृष्णाला मारण्याच्या उद्देशाने गेलेल्या त्या राक्षसांचे कपट कृष्णाने लगेचच ओळखले आणि त्यांनाच ठार केले. अगदी लहान वयातही कृष्णाकडून प्रगटणारी ही त्याची ईश्वरी शक्ती सामान्य लोकांना आकलन होणे तर शक्यच नव्हते. परंतु जाणकार लोकही बुचकळ्यात पडत असत. काही लोक त्या गोष्टींकडे एक नवल म्हणून पहात, तर काहींना असे वाटत असे की एखादी अदृश्य शक्ती कृष्णाचे रक्षण करीत आहे. म्हणून मग ते लोक देवदेवतांची कृतज्ञतापूर्वक पूजाअर्चा करीत आणि 'कृष्णाला असेच त्यांनी नेहमी सांभाळावे' म्हणून त्या देवतांची प्रार्थना करीत. नंदाला कृष्णजन्माचे रहस्य माहीत असल्यामुळे जरी नवल वाटत नसे, तरी त्याला कृष्णाची अत्यंत काळजी मात्र नेहमीच वाटत असे. यशोदेला कृष्णाचे कौतुक वाटत असे. परंतु भीतीही तेवढीच वाटत असे. म्हणून ती कृष्णाची रोज दृष्ट काढून त्याच्याकडून देवदेवतांची प्रार्थना म्हणवून घेत असे आणि कृष्णही तेवढ्याच श्रद्धेने व यशोदेच्या आपलेपणापोटी ती सांगेल तसे तसे सर्व करीत असे. त्याच्याकडून प्रगटणाऱ्या ईश्वरी शक्तीची जाणीव त्याला निश्चितच होती. परंतु त्याचा अहंकार त्याच्या ठिकाणी नसल्यामुळे त्याच्याकडून देवदेवतांच्या मूर्तींपुढे नम्र होणे व त्यांना वंदन करणे अगदी सहजपणे घडत असे.

हे लक्ष्मी, अशा अनेक राक्षसवधाच्या गोष्टी जेव्हा कंसाच्या कानावर आल्या तेव्हा मात्र तो चांगलाच हादरला. देवकीचा आठवा पुत्र कृष्णाच्या रूपानेच जिवंत असावा अशी शंका त्याच्या मनात बळावत चालली आणि त्याची भीती वाढू लागली. अशी कंसाच्या मनाची भयाकुल अवस्था असतानाच एक दिवस माझेच त्याच्याकडे अचानक जाणे घडले. मी

नारायणाचा एकनिष्ठ भक्त आहे हे कंसाला पूर्णपणे ठाऊक असूनही त्याने माझा अनादर न करता यथोचित स्वागतच केले. कारण देवकीच्या आठव्या पुत्राचे रहस्य जाणून घेण्याची इच्छा त्याच्या मनात होती. त्यामुळे दोन्ही हात जोडून विनयपूर्वक तो माझ्याशी बोलू लागला.

''हे मुनिवर्य, वसुदेव व देवकी यांच्या आठही मुलांच्या बाबतीत जे काही घडले ते आपण तर सर्व जाणून आहातच. मी वेगळे काही आपल्याला सांगण्याची आवश्यकता नाहीच. देवकीच्या आठव्या पुत्राच्या हातून माझा वध होणार आहे हे कळल्याबरोबर मी तर देवकीच्या सर्वच पुत्रांचा जन्मतःच वध केला. कारण मला कोणताही धोका पत्करायचा नव्हता. परंतु आठव्या पुत्राच्या वेळी काहीतरी चमत्कार झाला. कारण ते बालक जन्मतःच मृत पावलेले होते. माझ्या मनात शंकेने घर केले. काहीतरी घोटाळा झाला असावा अशी माझी खात्री पटली आणि मी मथुरेच्या परिसरात त्याचा शोध सुरू केला. मुद्दामहून मायावी राक्षस त्या मुलाचा शोध घेण्यास आणि वध करण्यास पाठवले. त्या सर्वांचाच गोकुळामध्ये नंदाच्या मुलाकडून वध झाला. त्या मुलाचे नाव 'कृष्ण' आहे असेही माझ्या कानावर आले आहे. एवढ्या लहान वयात त्या मुलाकडून सर्व राक्षसांचा वध झाला यावरून हेच सिद्ध होते की त्या मुलामध्ये काहीतरी दैवी शक्ती आहे. त्याशिवाय त्याच्याकडून अशी कृत्ये घडणे शक्यच नाही याची मला पक्की खात्री आहे. माझा वध करण्यासाठी जन्माला आलेला मुलगा हा दैवी शक्तीने युक्तच असणार याविषयी माझ्या ठिकाणी जराही शंका नाही. कारण त्याशिवाय कोणत्याही लहान मुलाकडून माझा मृत्यू ओढवणे शक्यच नाही. नंदाच्या या मुलाविषयी कळल्यापासून माझी तर झोपच उडाली आहे. मन बेचैन आहे. तरी हे मुनिवर्य, आपणच माझ्या मनातील ही शंका दूर करावी आणि माझे मन शांतवावे. सर्व त्रैलोक्यात संचार करणाऱ्या आपल्याला या विश्वात घडणाऱ्या सर्व घडामोडी विदित असतात हे मी जाणून आहे. तरी खरे काय ते सांगून मला भयमुक्त करावे अशी विनंती मी करतो.''

हे लक्ष्मी, कंसाची अशी भयभीत अवस्था पाहून मला त्याची कीवच आली. त्याला चार गोष्टी सांगून त्याचे मन त्याच्याकडून घडणाऱ्या पापकर्मापासून दूर वळवावे या हेतूने मी त्याच्याशी बोलू लागलो.

''अरे कंसा, पापकर्मे करताना मनुष्याने कितीही शौर्याचा आविर्भाव आणला तरी त्या कर्मांची फळे भोगण्याची वेळ आली की मात्र त्याची भीतीने गाळणच उडते. मनुष्य कर्मे करताना ती अगदी हसत हसत करतो, पण त्याची फळे भोगताना मात्र अगदी रडकुंडीला येतो. पण एखाद्याने कितीही गयावया केली तरी कृतकर्माची प्राप्त फळे कधीच आणि कोणालाच चुकवता येत नाहीत. ती अगदी अटळ आहेत. देवकीच्या आठव्या पुत्राच्या हातून तुझा मृत्यू आहे ही आकाशवाणी झालेली असल्यामुळे ती कुठल्याही परिस्थितीत सत्य ही होणारच आहे. त्याला कोणीच थोपवू शकणार नाही. कारण प्रत्यक्ष नारायणाचाच अवतार देवकीच्या पोटी झालेला आहे हे त्रिवार सत्य आहे. तेव्हा त्याच्या हातून असणारा तुझा मृत्यू अटळ आहे. तो टाळण्याचे तू जरी कितीही प्रयत्न केलेस तरी ते वृथाच ठरणार आहेत. त्या तुझ्या प्रयत्नांमुळे तुझ्या पाप कर्मात अधिकच भर पडत राहील. आधीच उग्रसेनाला राज्यासनावरून हटवून, वसुदेव-देवकीला बंदीवासात ठेवून आणि तिच्या

सात पुत्रांचा जन्मतःच वध करून तू पापाचे केवढेतरी डोंगर रचून ठेवलेले आहेसच. त्यातच देवकीच्या आठव्या पुत्राला शोधण्याच्या निमित्ताने मथुरेच्या परिसरातील कितीतरी अजाण व निष्पाप बालकांचा वध करवून तू तुझ्या पापात आणखीनच भर घातली आहेस. पण मला वाटते अजूनही वेळ गेलेली नाही. आपल्या कर्मांचा तुला जर खराच पश्चात्ताप झाला तर पापाच्या गर्तेत अडकलेल्या तुझा अजूनही उद्धार होऊ शकेल. सर्वसत्ताधीश असलेल्या व्यापक परमेश्वराची तू अगदी मनापासून आळवणी कर. म्हणजे तुला तुझ्या कल्याणाचा निश्चित काहीतरी मार्ग सापडेल.

अरे कंसा, मृत्यू हा तर सर्वांनाच केव्हाना केव्हा तरी येणारच आहे. तो टाळण्याचे प्रयत्न केव्हाच यशस्वी होऊ शकत नाहीत. त्या मृत्यूला आनंदाने सामोरे जाणे हेच केवळ आपल्या स्वाधीन आहे. पण ती आनंदाची अवस्था मनाच्या ठायी पूर्ण शांती व समाधान असेल तरच अनुभवता येईल आणि मनाला शांती व समाधान ही केवळ सत्कर्मांमुळेच प्राप्त होऊ शकते. दुष्कर्मांचे फळ मात्र नेहमीच मनाठायी अस्वस्थता, तगमग, भीती हेच आहे. दुष्कर्माचे मूळ हे मनाच्या दूषित अवस्थेमध्ये आहे आणि मन हे द्वेष, मत्सर आदी विकारांमुळे दूषित होत असते. तेव्हा प्रथम सर्व पाप कर्मे थांबवून तुझी अधोगती वाचव आणि पुण्यकर्म कर, म्हणजे तुझे मन स्वच्छ व निर्मळ होत राहील. परमेश्वराच्या अस्तित्त्वाची आणि सत्तेची जाणीव ठेव आणि त्यालाच पूर्णपणे शरण जा. केवळ तोच तुला आता वाचवू शकेल.

कंसा, तुला एक गोष्ट मी स्पष्टपणे सांगतो, की गोकुळात नंदाचा पुत्र म्हणून असलेला कृष्ण हाच खरा देवकीचा आठवा पुत्र असून, तो साक्षात नारायणाचा अवतार आहे. येथे तुझ्या बंदीगृहात जन्माला येऊन तो नंदाच्या वाड्यात कसा गेला हा एक वेगळाच इतिहास आहे. खरे तर तो एक चमत्कारच घडलेला आहे. पण तो तुला सांगण्याची काहीही आवश्यकता नाही आणि सांगून तुला त्याचा उपयोगही होणार नाही. त्याच्या हातून तुझा मृत्यू आहे हे विधिलिखितच आहे. पण केवळ तुझा वध करण्यासाठीच त्याचा अवतार झालेला नाही. तर सामान्य जनांना खऱ्या शुद्ध प्रेमाचा अनुभव आणून देऊन त्यांच्या मनाची शुद्धी करणे, जेणेकरून त्यांना समाधान व शांतीचा लाभ होईल, यासाठी त्याचा अवतार झाला आहे. तूही जर त्याला पश्चात्तापदग्ध मनाने भेटशील, तर तुलाही तो मोठ्या मनाने क्षमा करील आणि तुझाही प्रेमाने स्वीकार करील याची खात्री बाळग.

कंसा, एक गोष्ट लक्षात ठेव, की कृष्णाच्या हातून तुझा वध आहे याचा अर्थ असा नव्हे की तो आज लगेचच तुझा वध करणार आहे. तसे जर त्याला करायचे असते तर त्याने केव्हाच केले नसते का? अगदी तुझ्या कारागृहात जन्माला आल्याबरोबर तुझा वध त्याने करायचा ठरवले असते तर त्याला ते शक्य नव्हते का? पण कृष्णाला त्याची घाई नाही. तोही व्यापक परमेश्वराच्या नियतीने बांधला गेलेला आहे. त्या नियतीनुसार जी गोष्ट जेव्हा घडणार आहे तेव्हाच ती घडणार आहे. ज्याला जेव्हा मृत्यू यायचा तेव्हाच त्याला तो येणार आहे. तेव्हा तुझ्या मृत्यूची वेळ जेव्हा येईल तेव्हाच तुझ्यावर काळाची मात होईल आणि तुझा मृत्यू ओढवेल. त्यासाठी कृष्ण निमित्तमात्र होणार असेल तर हे तुझे भाग्यच नव्हे काय? कारण कृष्णाच्या हातून तुझा मृत्यू झाल्यामुळे तुझा निश्चितच उद्धार होईल. पण त्या आधीच जर तू आपणहून कृष्णाच्या चरणी

गेलास तर त्याच्या प्रेमामुळे तुझा उद्धार तू जिवंत असतानाच होईल आणि त्याचे समाधान तुला प्रत्यक्षच अनुभवता येईल. पण तसे जर तू केले नाहीस आणि आपल्या दुष्कृत्यामुळे तुझे पापच वाढवीत राहिलास तर मात्र स्वतःचे मरण तू स्वतःच्या हातानेच अकाली ओढवून घेशील. तेव्हा हे कंसा, लवकरात लवकर सद्बुद्धी धारण कर आणि विवेकाने सन्मार्गाचा अवलंब कर, हे एकच माझे तुला आपलेपणाने सांगणे आहे.''

माझे बोलणे ऐकून कंस थोडासा गंभीर झाला, पण क्षणभरच! पुढच्याच क्षणाला उसने अवसान आणून तो मोठ्याने हसला आणि मला म्हणाला,

''अहो नारद मुनी, तुम्ही कृष्णाविषयी जी माहिती सांगितलीत त्याचे मला जराही आश्चर्य वाटले नाही. कृष्णाकडून प्रगटलेल्या दैवी शक्तीच्या कहाण्या जेव्हा माझ्या कानावर आल्या तेव्हाच माझी अगदी खात्री पटली होती, की ज्याच्या हातून माझा मृत्यू होणार आहे तो देवकीचा आठवा पुत्र हाच आहे म्हणून! फक्त तुम्हाला विचारून मी मात्री खात्री पक्की करून घेतली एवढेच. आता त्याचे काय करायचे आणि त्याच्याशी कसा मुकाबला करायचा हे माझे मी पाहून घेईन. त्यासाठी माझा मी समर्थ आहे. मला दुसऱ्या कोणाच्याही मदतीची अजिबात जरुरी नाही आणि कोणीही काहीही ज्ञान मला सांगण्याची तर मुळीच आवश्यकता नाही. मलाही पुष्कळ ज्ञान आहे. अगदी मी तुमच्यासारखा पूर्ण ज्ञानी नसेनही. पण जे काही ज्ञान मला आहे ते माझ्यासाठी पुरेसे आहे. ईश्वराची शक्ती सर्व प्राणीमात्रांच्याठायी आहे, तर तशी मग ती माझ्या ठिकाणी सुद्धा आहेच ना? त्यामुळे कृष्णाला सामोरे जाण्यामध्ये मला अजिबात भीती वाटत नाही. दोन ईश्वरी शक्ती एकमेकांशी भिडल्यानंतर जास्तीत जास्त काय होणार आहे, तर त्यातील एक शक्ती टिकून राहील आणि दुसरी शक्ती त्या शक्तीत विलीन होऊन जाईल, एवढेच ना? त्याला माझी पूर्ण तयारी आहे. कारण शेवटी सर्व शक्ती त्या अनंतात विलीन होणार आहेत हे सत्य आहे. मग आज काय आणि उद्या काय? माझ्या दृष्टीने तर त्यात काहीच फरक पडत नाही. फक्त कृष्ण माझ्या समोर केव्हा येतो याचाच ध्यास मला लागून राहिलेला आहे. पण खरे तर कृष्णच माझ्या समोर यायला घाबरत असावा. कारण गोकुळात तर तोच लपून बसलेला आहे. माझ्यासमोर प्रत्यक्ष येण्याची त्यालाच हिंमत होत नसावी.''

हे लक्ष्मी, कंसाच्या त्या केवळ वल्गना होत्या हे मला तर ठाऊकच होते. कारण त्याच्या बोलण्यातील पोकळपणा काही लपून राहिला नव्हता. तरीही माझ्या ठिकाणी मात्र त्याच्याविषयी दयाच होती. म्हणून मी पुन्हा त्याची समजूत घालून त्याला सावध करण्याचा प्रयत्न केला.

''अरे कंसा, तुझ्याकडे शब्दज्ञान तर पुष्कळच दिसत आहे. पण लक्षात ठेव की प्रत्यक्ष प्रसंगात ते ज्ञान कधीच कामाला येत नाही. ईश्वरी शक्तीविषयी तू जे काही बोललास ते तत्त्वतः सत्यच आहे. त्यामुळेच सर्वजण जिवंत आहेत आणि जीवन जगत आहेत. परंतु जीवनाचा अनुभव घेणारे मात्र केवळ मनच आहे हे विसरू नकोस. ते मन ज्याचे दुर्बल आहे त्याला जीवनात अनन्वित यातना व क्लेश भोगावे लागतात. ज्याच्याकडून पुण्यकर्मे घडतात त्याचेच मन नेहमी सबळ असते. त्याचेच मन सहनशील, शांत व समाधानी असते. त्यामुळे संसारात प्रारब्धाने कितीही संकटे व अडचणी आल्या

तरी मनोबळावर त्यातून पार पडता येते. परंतु जो पापकर्मी आहे त्याचे मन अत्यंत कमकुवत असते. तो नेहमीच कुठल्या ना कुठल्या तरी भीतीने ग्रस्त असतो. मृत्यूच्या भयाने तर तो सदैव व्यापलेलाच असतो. मनुष्याच्या देहाला मृत्यू हा एकदाच येतो. परंतु पापी व दुराचाऱ्याचे मन मात्र भीतीने मृत्यूचा अनुभव क्षणाक्षणाला घेत असते.

अरे कंसा, तू बाह्यांगाने जरी कितीही आव आणलास तरी तुझ्या मनातील घबराट काही लपून राहिलेली नाही. ती तर तुझ्या चेहऱ्यावर अगदी स्पष्टपणे दिसत आहे. तेव्हा अजूनही वेळ गेलेली नाही. कृष्णाला येथे सन्मानपूर्वक बोलवून घे आणि तुझ्या दुष्कृत्यांची कबुली त्याच्याकडे दे. कृष्णच यातून योग्य तो मार्ग काढेल आणि अधोगतीने जाणाऱ्या तुझ्या मनाचा उद्धार करेल. त्यामुळेच तुझ्या मनाला खरी शांती व समाधान प्राप्त होईल.''

हे लक्ष्मी, उन्मत्त व अहंकाराने पछाडला गेलेला कंस काहीही ऐकण्याच्या मनःस्थितीतच नव्हता. चांगले विचार, चांगली बुद्धी व चांगली कर्मे यांच्या सर्व सीमा पार करून तो या सर्वांच्या पलीकडे केव्हाच गेलेला होता. त्याने गोकुळात पाठवलेल्या राक्षसांपैकी एकही परत आला नव्हता. त्या सर्वांनाच कृष्णाने यमसदनास पाठवले होते. तरीही कंसाची घमेंड मात्र कायमच होती. त्याच गुर्मीच्या सुरातच कंस उत्तरला,

''अरे नारदा, ते कदापिही होणे शक्य नाही. ज्या मार्गाने मी आतापर्यंत चालत आलो आहे त्याच मार्गाने मी पुढेही चालत राहणार. त्या मार्गापासून आता परत फिरणे शक्य नाही अणि ते मला आवश्यकही नाही. तुमच्या ज्ञानाप्रमाणे शेवटी सर्व मार्ग एकाच ईश्वराकडे जातात ना? मग झाले तर! मला काळजी करण्याचे काहीच कारण नाही. मी स्वीकारलेल्या मार्गानेही मीसुद्धा त्या ईश्वरी शक्तितच विलीन होणार आहे ना? मग मुद्दामहून माझा मार्ग बदलण्याची मला काहीच आवश्यकता वाटत नाही. आता त्या कृष्णाची गाठ घेणे आणि त्याला जाऊन भिडणे हाच एकमेव ध्यास माझ्या ठिकाणी लागलेला आहे. त्या ध्यासाची पूर्ती वाटेल त्या मार्गाने मी करणार म्हणजे करणार. त्या शिवाय या गोष्टींचा सोक्षमोक्ष होणार नाही. मग त्यातून जो काय निर्णय होईल तो मी मान्य करीन. परंतु आता मागे फिरणे माझ्याकडून कदापिही घडणार नाही. ही माझी भूमिका अंतिम आहे. ती कशानेही वा कोणाच्याही सांगण्याने जराही ढळणार नाही हे त्रिवार सत्य आहे.''

असे म्हणून कंस तरातरा राजवाड्याच्या आतील दालनात निघून गेला. मी मात्र नियतीमध्ये आता या नारायणाची काय लीला प्रगट होणार आहे आणि कृष्णाचे माहात्म्य कसे प्रगट होणार आहे याचा ध्यास घेऊन तेथून त्वरित निघालो. कारण नारायणाच्या सगुण अवतारातील प्रगटणाऱ्या लीला नित्य पाहणे, अनुभवणे आणि प्रेमाने गात राहणे हाच माझा भाव आहे, स्वभाव आहे आणि अनुभवही आहे.''

नारदाचे बोलणे ऐकता ऐकता लक्ष्मीला वाटणारे नवल नारदाच्या प्रत्येक वाक्यागणीक वाढतच राहिले. तिच्या लगेचच लक्षात आले की कृष्णचरित्र आता काही वेगळेच वळण घेत आहे. तिला ते अगदी अनपेक्षित होते. त्याहीपेक्षा नारदाच्या वागण्याचे तिला जास्त नवल वाटत होते. म्हणून न राहवूनच तिने नारदाशी बोलण्यास सुरुवातच केली.

''अरे नारदा, तुझी तर अगदी कमालच आहे. तू आधी कंसाकडे कशासाठी गेलास हेच मला समजत नाही. तो दुष्ट व राक्षसी प्रवृत्तीचा आहे हे तुला माहीत होते. मग तुला तर त्याच्याकडे जाण्याचे कारणच नव्हते. बरे, गेलास तर गेलास, 'कृष्ण गोकुळात आहे' हे गुह्य तू त्याला कशाला सांगितलेस? कृष्ण गोकुळात चांगला सुरक्षित असताना तू कंसाला त्याचा पत्ता सांगून काय साधलेस हेच मला कळत नाही. कंसाची अशी तुझ्याकडून खात्री पटल्यावर तो कृष्णवधासाठी जास्तीत जास्त प्रयत्न करणार आणि मग कृष्णावरची व गोकुळावरची संकटेही अधिकच वाढणार. त्याला मग जबाबदार कोण? तूच ना! त्याहीपेक्षा तू कंसाचे हृदय परिवर्तन करण्याचा जो प्रयत्न केलास तो तर अगदी कहरच होता. अरे, कंसासारखा नीच व कठोर मनाचा मनुष्य केव्हातरी आपली चूक कबूल करेल काय? आणि त्याचे मत परिवर्तन होणे केव्हा तरी शक्य आहे का? एकवेळ दगडाला पाझर फुटेल, पण अशा माणसांचे मन कधीही द्रवणे शक्य नाही. ही काळ्या दगडावरची रेघ आहे.

बरे, एवढे तू कळकळीने सांगूनही त्याच्यात काही बदल झाला नाही ना? तुला त्यात यश नाहीच मिळाले ना? मग अपयशाची एवढी पक्की खात्री असताना शहाण्या माणसाने तरी काही प्रयत्न न करणे हेच योग्य नव्हे का? खरेच नारदा, मला तर या तुझ्या वागण्या बोलण्याचा काहीच अर्थबोध होत नाही. या मागची तुझी निश्चित भूमिका तरी काय? ती मला नीट समजावून सांग. कारण त्याशिवाय माझ्या मनाची झालेली ही संभ्रमावस्था दूर होणे शक्यच नाही. तरी त्वरित मला या मनाच्या गोंधळलेल्या अवस्थेतून बाहेर काढावेस अशी मी तुला अगदी विनंतीच करते.''

लक्ष्मीने एका मागोमाग एक विचारलेले प्रश्न ऐकता ऐकताच नारदाच्या मुखावर मिश्किल हास्य उमटत होते. पण तरीही लक्ष्मीच्या प्रश्नांची गंभीर दखल घेत नारद लक्ष्मीशी बोलू लागला.

''हे लक्ष्मी, तुझ्या मनात आलेले प्रश्न व शंका जरी सकृत्दर्शनी योग्य वाटत असल्या, तरी जर तू थोडासा विचार करशील तर तुझ्याच लक्षात येईल, की ते प्रश्न व शंका सर्व फोलच आहेत. तुझा पहिला प्रश्न जो मी कंसासारख्या नीच व दुष्टाकडे का गेलो यांसबंधीचा आहे ना, त्याचे उत्तर असे आहे की, मी प्रथमतः या नारायणाचाच एकनिष्ठ भक्त आहे. आणि त्यामुळेच त्याने मांडलेल्या या सृष्टीरूपी खेळाचा पूर्ण आनंद घेणे हा माझा सहज स्वभाव व स्वधर्म आहे. आता या नारायणानेच सृष्टी निर्माण करतानाच ती त्रिगुणात्मक निर्माण केलेली आहे हे सत्य आहे. तेव्हा सत्त्व, रज व तम या त्या तीन गुणांचे अस्तित्व मान्य करायलाच हवे. त्या त्या गुणांनी युक्त असलेल्या व्यक्तींना आपल्याला डावलता येणारच नाही. तीन गुणांचे भिन्नत्व दिसले तरी त्यातील या नारायणाचे अंशात्मक अस्तित्व एकच आहे.

अर्थात ही गोष्टही खरी आहे, की तमोगुण हा या नारायणापासून दूर म्हणजे अधोगतीला नेणारा आहे. तेथे केवळ अज्ञानाचा अंधःकार व अहंकार यांचेच साम्राज्य आहे. नारायणाच्या अस्तित्वाविषयी पूर्ण नास्तिकता आणि केवळ स्वतःच्या अस्तित्वाविषयीचीच आस्तिकता तेथे आहे.

रजोगुण हा विषयसुखाची लोलुपता वाढवणारा आहे. तेथे नारायणाविषयी आस्तिक्य भाव आहे. पण तो केवळ स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी आणि अधिकाधिक विषयसुख प्राप्त व्हावे यासाठीच आहे. त्यासाठीच या नारायणाची मदत त्यांना हवी असते आणि त्यांचा असा प्रयत्न सकामतेने पूजाअर्चा, व्रतवैकल्ये व उपास तापास करून चालू असतो. आपले सर्व सोडून व बाजूला करून नारायणाच्या जवळ प्रेमाने यावे असा विचारही त्यांच्या मनाला शिवणे कधीही शक्य नसते.

लक्ष्मी, सत्त्वगुण मात्र नारायणाच्या अस्तित्वावर पूर्ण श्रद्धा ठेवून त्याच्यासाठी काहीतरी करण्याच्या प्रयत्नात असतो. सात्त्विक वृत्ती हा तेथे स्थायीभाव असतो. नारायणाविषयी तेथे प्रेमाची भावना असते. या सत्त्वगुणानेच नारायणाजवळ जाणे शक्य होते. वेळप्रसंगी हा नारायणच अवतार घेऊन त्या सत्त्वगुणाला आश्रय व आधार देतो आणि सबळ करतो. या सत्त्वगुणामुळेच नारायणाची सगुण प्रेमभक्ति घडू शकते आणि नारायणाच्या पूर्ण कृपेलाही या सत्त्वगुणानेच पात्र ठरणे शक्य होते.

हे लक्ष्मी, या त्रिगुणांचे यथार्थ ज्ञान माझ्या ठिकाणी सदैव जागृत असते आणि म्हणूनच माझ्या सद्भावाने व अनुभवाने युक्त होऊन, मी मुक्तपणाने या त्रिगुणात्मक सृष्टीत संचार करीत असतो. या तीन गुणांचे जसे मला आकर्षण व मोह नाही, तसेच त्यांची मला बाधाही होऊ शकत नाही. म्हणूनच अगदी निर्भयपणे या सृष्टीत विहार करून नारायणाच्या या त्रिगुणात्मक सृष्टीलीलेला मी पहात असतो. वेळप्रसंगी त्या लीलेमध्ये सहभागीही होतो. पण त्या लीलेचा आनंद मात्र पूर्णपणे घेतो. तेव्हा कंसाकडचे माझे जाणेही तेवढ्याच सहजपणे झाले होते. कंसालाच भेटण्यासाठी म्हणून मी काही मुद्दामहून त्याच्याकडे गेलो नव्हतो. परंतु मथुरेच्या बाजूने जात असताना त्याच्याकडे सहजतेने वळलो इतकेच! अर्थात कंसाच्या दुष्कृत्यांची व पापाचरणाची माहिती मला पूर्णपणे होती. परंतु कृष्णावतारातील नारायणाच्या खेळामध्ये कंसाचे अस्तित्व विशेषत्वाने होते आणि त्याच्या संबंधात कृष्णाकडून विशेष खेळ होणार होता, याचीही जाणीव माझ्या ठिकाणी पक्केपणाने होती. कृष्णाच्या त्या खेळात सक्रिय सहभागी होण्याची संधी मला कंसाला भेटल्यावर मिळाली आणि ती मी साधून त्याचा आनंद पूर्णपणे अनुभवला हे मात्र अगदी खरे आहे.

हे लक्ष्मी, तुझा दुसरा प्रश्न, की 'कृष्ण गोकुळातच आहे' हे गुह्य मी कंसाला का सांगितले आणि त्यामुळे कृष्णाच्या सुरक्षिततेला धोका नाही का पोहोचला?' हा प्रश्न तर मला अत्यंत गमतीचाच वाटत आहे. एकतर ही गोष्ट मी काही आपणहून कंसाला सांगितली नव्हती. गोकुळातील कृष्णाच्या अस्तित्वाची शंका त्याच्या मनात प्रकर्षाने वाढत होतीच. मी केवळ दुजोरा देऊन त्याची खात्री करून दिली एवढेच. पण त्यात अयोग्य असे काहीच नव्हते. कारण मुळात कृष्ण काही घाबरून गोकुळात लपून बसलेला नव्हता. त्याच्या पित्याने म्हणजे वसुदेवानेच अत्यंत काळजीपोटी कृष्णाला सुरक्षित अशा गोकुळात नंदाच्या स्वाधीन केलेले होते. बरे, कृष्णाच्या हातूनच कंसाचा मृत्यू आहे हे निश्चितच ठरलेले असल्यामुळे कृष्णाला कंसापासून भीती असण्याचे काहीच कारण नव्हते. उलट ती भीती कंसालाच कृष्णापासून होती. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे तसेच काही कारण घडल्याशिवाय कृष्णाकडून कंसाचा वध झालाच नसता. नाहीतर, कृष्णाने कंसाचा वध

आतापर्यंत केव्हाच केला नसता का? त्याला काय अडचण होती? काहीच नाही. त्याने केवळ मनात आणण्याचाच अवकाश होता. एवढेच काय, जन्मतःच कंसाचा वध करणेसुद्धा कृष्णाला अगदी सहज शक्य होते. पण तसे घडायचे नव्हते. योग्य वेळीच योग्य गोष्टी घडत असतात याची जाणीव कृष्णालाही होतीच. म्हणूनच तो योग्य घडीची वाट पहात होता.

आतापर्यंत अनेक मायावी राक्षसांना कृष्णाला मारण्यासाठी पाठवून कंसाने त्यांच्याकडून परस्पर कृष्णाला मारण्याचे प्रयत्न केले. त्यांत कंसाचा प्रत्यक्ष सहभाग नसल्यामुळे तो नामानिराळाच राहिला होता. कृष्णाशी उघड उघड शत्रुत्व त्याने स्वीकारले नव्हते. तो आडून आडून कृष्णावर आघात करू पहात होता. परंतु कृष्णाचा घात काही तो करू शकला नाही. म्हणूनच मी कृष्णाचा पत्ता मुळीच लपवून न ठेवता कंसासाठी मुद्दामच प्रगट केला. त्यामुळे त्याला कृष्णाशी समोरासमोर शत्रुत्व करणे आता भाग पडले होते. अर्थात कृष्णावर संकटे येणार होतीच आणि त्याच्यामुळे सर्व गोकुळावरही एखादे वेळेस संकटे ओढवली असती हेही खरे आहे. पण त्यातून स्वतः निभावून जाण्याचे व सर्वांना तारून नेण्याचेही सामर्थ्य कृष्णाच्या ठिकाणी असल्याचा माझा विश्वास पक्का असल्यामुळे, माझ्या मनात कृष्णाविषयी व गोकुळवासीयांविषयी अजिबात काळजी नव्हती. एक गोष्ट निश्चित होती, की कंसाच्या अंतकाळाची सुरुवात आता झालेली होती आणि त्यासाठी मी निमित्त झाल्याचा मला अतिशय आनंदच होत होता. कारण कृष्णाला मारण्याच्या निमित्ताने कंसाची दुष्कृत्ये व पापकर्मे आता अधिकाधिकच वाढणार होती आणि त्यामुळे कृष्णरूपाने आलेल्या आपल्या मृत्यूला कंस आपणहूनच अधिक वेगाने आपल्या जवळ ओढणार होता.

हे लक्ष्मी, कंसासारख्या दुष्ट व राक्षसी वृत्तीच्या माणसाशी मी एवढ्या कळकळीने का बोलत होतो, याविषयी तुझ्या मनात आलेल्या प्रश्नाचे उत्तर मात्र अगदी सोपे आहे. तीच तर माझ्या अंतःकरणाची सहजावस्था आहे. तो तर माझा सहज स्वभावच झालेला आहे. नारायणाच्या माहात्म्याने व प्रेमाने सदैव भरून वाहणाऱ्या माझ्या अंतःकरणात सर्वच प्राणिमात्रांविषयी सहजपणे कळवळा असतो. मानवी जन्म महद्भाग्याने प्राप्त होऊनही, अज्ञानाने वा अहंकाराने अधोगतीला जाऊन स्वतःचाच सर्वनाश ओढवून घेणाऱ्या जिवाविषयी माझ्याठायी नुसतीच दया व कणव निर्माण होते असे नाही, तर त्यांना अधोगतीपासून वाचवण्याचाही माझा प्रयत्न असतो. त्यांना सन्मार्गाला लावून सद्गती प्राप्त करून द्यावी याच्यासाठी माझे आटोकाट प्रयत्नही असतात.

सन्मार्गाने जाणारा एखाद्या साध्याशा चुकीनेसुद्धा त्या मार्गापासून च्युत होऊन अधोगतीला जाऊ शकतो. त्याचप्रमाणे वाईट मार्गाने जाणाऱ्यालाही काही कारणाने क्षणात उपरती होऊ शकते आणि त्याची अधोगती थांबून तो सन्मार्गाकडे वळू शकतो. या सृष्टीच्या इतिहासात असे अनेक प्रसंग घडलेले आहेत. अनेक वर्षांची तपश्चर्या एखाद्या क्षणिक मोहाच्या प्रसंगामुळे नष्ट झालेली आहे किंवा एखाद्या दुराचरणी व्यक्तीला मृत्यूवेळ जवळ येऊन ठेपल्यावर आपल्या पापकर्मांचा पश्चात्तापही झालेला आहे आणि त्यावेळेस त्यांच्याकडून त्यांचे पूर्वसंस्कार जागे झाल्यामुळे या नारायणाची

अंतःकरणपूर्वक आळवणी घडली.  या नारायणानेही कृपावंत होऊन त्यांचा उद्धार केलेला आहे.  याला या सृष्टीचा इतिहास साक्षीदार आहे.

म्हणूनच सन्मार्गाने जाणाऱ्यांना त्यांचा उसाह कायम ठेवून मी नेहमीच सावध करीत असतो आणि कुमार्गाने अधोगतीला जाणाऱ्यांना सन्मार्ग सांगून व दाखवून, मी त्यांच्याविषयी नेहमीच आशा बाळगून असतो.  निराशा माझ्या मनाला कधीच स्पर्श करू शकत नाही.  माझ्यासारखी जबरदस्त आशावादी व्यक्ती तुला एखादे वेळेस या त्रिभुवनातही सापडणार नाही.  कारण मी या नारायणाचा परमभक्त आहे.  म्हणूनच मला सर्व जीवांविषयी सारखाच कळवळा आहे.  तसाच तो कंसाविषयीसुद्धा अगदी सहजपणे होता.  त्याची अधोगती थांबवून त्याचा सर्वनाश टाळावा असे मला अगदी प्रामाणिकपणे वाटत होते आणि तसे प्रयत्नही कंसाशी बोलून माझ्याकडून तळमळीने घडत होते.  कृष्णाच्या हातून होणारा कंसाचा वध तर अटळच होता, पण तो मृत्यू जर त्याला सन्मानपूर्वक प्राप्त झाला असता तर त्यात त्याचाही गौरवच झाला असता.  कृष्णाला प्रेमाने बोलवून घेऊन त्याच्याकडे आपल्या चुकांची कबुली देण्याची शक्यता कंसाच्या बाबतीत तशी सुतरामही नव्हती, कारण मुळात कंसाला पश्चात्ताप होण्याची शक्यताच अजिबात दिसत नव्हती.  तरीही तसा प्रामाणिक प्रयत्न केल्याशिवाय स्वस्थ बसणे हे माझ्या अंतःकरणालाही मानवले नसते.

माझ्या प्रयत्नांना फळ येणे, न येणे हे तर माझ्या हातात नव्हतेच.  कारण ते सर्व या नारायणाच्या नियतीनुसार घडणारे होते.  परंतु फळाची अपेक्षा न ठेवता माझ्याकडून कंसाला सत्य व त्याच्या हिताचे सांगणे घडले यातच माझी खरी यशस्विता आहे.  कारण नारायणाच्या प्रेमाचाच असलेला हा गुणधर्म माझ्याकडून प्रगट झाला आणि त्याचे सर्व श्रेय या नारायणाच्या माहात्म्याला व सगुण प्रेमाला आहे.  त्याच्या कृपेमुळेच मी त्याच्या या सृष्टीरूपी खेळात निमित्ताचा धनी व आनंदाचा स्वामी होऊन राहिलेलो आहे.  निमित्ताचा धनी थोडा वेळ काही कारणापुरताच असेन, परंतु आनंदाचा स्वामी मात्र मी सदा सर्वकाळचा आहे.  हीच या नारायणाची माझ्यावर असलेली अलोट कृपा आहे.''

नारदाचे बोलणे ऐकत असताना लक्ष्मीच्या मनाला होणारे समाधान तिच्या मुखावरही दिसतच होते.  त्याचबरोबर नारदाचे विशेषत्व व श्रेष्ठत्त्व तिला आकलन होत होते.  नारदाच्या भक्तिभावाची थोरवी लक्ष्मीच्या लक्षात आली आणि तिचे अंतःकरण भरूनच आले.  आपले दोन्ही हात जोडून तिने नारदाला प्रेमादरपूर्वक नमस्कार केला आणि बोलू लागली,

''हे भक्तश्रेष्ठ नारदा, खरोखरीच तुझी धन्य आहे.  सगुण प्रेमभक्तिभाव तुझ्याच रूपाने परिपूर्णतेने साकार झालेला आहे याची मला पूर्ण खात्री झालेली आहे.  या नारायणापासून जराही विभक्त नाही तोच खरा भक्त, ही सत्यभक्तीची व्याख्या केवळ तुझ्याच रूपाने प्रगटलेली मला दिसत आहे.  त्यामुळेच या नारायणाशी सदैव अविभक्त असलेला असा तूच या नारायणाचे खरे माहात्म्य अनुभवतोस आणि त्याच्या सगुणलीला यथार्थ जाणतोस.  एवढेच नव्हे, तर त्या लीलांमध्ये नारायणाच्या प्रेमाने अगदी मनापासून सहभागी होऊन त्याचा आनंद पूर्णपणे अनुभवतोस आणि या नारायणालाही आनंदित करतोस.  नारायणाला झालेला तो आनंद पाहण्यात आणि तो आनंद तुझ्या मुखातून ऐकण्यात मला होणारा आनंद हा

अवर्णनीयच आहे. पण तो आनंद जर माझ्या अनुभवाचा व्हायचा असेल, तर माझ्या या नारायणावर असलेल्या प्रेमाचे रूपांतर भक्तिभावात होणे अत्यंत आवश्यक आहे हे मी निश्चितपणे जाणून आहे. त्यासाठी या नारायणाचे माहात्म्य माझ्या ठिकाणी अधिकाधिक ठसणे आवश्यक आहे. त्यावर नारायणाच्या सगुणचरित्राचे श्रवण हाच एकमेव उपाय आहे हेही मला ठाऊक आहे. कारण त्याच्या श्रवणानेच सगुण प्रेमाची गोडीही वाढते आणि नारायणाचे माहात्म्यही अधिकाधिक आकलन होऊ लागते. एवढेच नव्हे, तर नारायणाच्या माहात्म्याच्या सत्यत्वाचा निश्चय होऊन, ते माहात्म्य आपल्याही अनुभवाचे व्हावे असा ध्यासही वाढू लागतो हे अगदी खरे आहे, असे मी स्वानुभवाने सांगत आहे.

हे नारदा, तेव्हा तू कृष्णावतारातील पुढील चरित्र कथेचे वर्णन त्वरित करावेस हेच योग्य होईल. कृष्णरूपी काळाच्या हातून त्या दुष्ट कंसाचा अंतकाळ कसा झाला हे श्रवण करण्याची माझी तृषा नेहमीप्रमाणेच वाढून राहिलेली आहेच. त्या श्रवणतृषेचे शमन तुझ्याकडून लवकरात लवकर व्हावे अशी विनंती मी तुलाच करीत आहे.''

*****



# गोवर्धन पूजा

**ल**क्ष्मीच्या बोलण्याने नारदाला अत्यंत संतोष झाला आणि किंचित हसून, पण गंभीर वाणीने तो लक्ष्मीशी बोलू लागला.

''हे लक्ष्मी, कंसाचा अंत होण्याची नांदी जरी झाली होती, तरी कंसाचा प्रत्यक्ष मृत्यू होण्याची वेळ अजून आली नव्हती. पण त्या मधील काळात गोकुळात असे काही प्रसंग घडले, की त्यामुळे कृष्णाच्या ठायीची ईश्वरी दिव्यशक्ती प्रकर्षाने प्रगट झाली. त्यातील एक मोठा प्रसंग हा गोकुळावर झालेल्या सततच्या मुसळधार जलवृष्टीमुळे निर्माण झाला. 'इंद्राच्या प्रकोपामुळेच अशी धुवांधार वृष्टी होत आहे' अशी गोकुळवासीयांची समजूत करून देणारी ही जलवृष्टी जवळ जवळ सात दिवस जराही न थांबता होतच होती. लक्ष्मी, तुझ्या मनात प्रश्न निर्माण होऊन तू मला विचारण्याच्या आतच मी तुला सांगतो, की 'इंद्राचा प्रकोप झाला आहे' अशी गोकुळवासीयांची समजूत होण्यासाठी कृष्ण हाच कारणीभूत झालेला होता.

त्याचे असे झाले, की इंद्र ही पावसाची देवता आहे आणि त्याच्याच कृपेमुळे गोकुळावर भरपूर जलवृष्टी होते अशी त्या गोकुळवासीयांची श्रद्धा होती. या श्रद्धेपोटी दरवर्षी पावसाळ्याचा ऋतू सुरू होण्याच्या आधी सर्व गोकुळवासी नंदाच्या अधिपत्याखाली इंद्र देवतेची पूजाअर्चा करीत आणि भरपूर जल प्राप्त व्हावे म्हणून इंद्राकडे प्रार्थना करीत. या जलवृष्टीमुळेच शेतीमधून उत्तम पीक येऊन वर्षभर धान्याची समृद्धी होत असे. गाईगुरांसाठी विपुल व सकस गवत मिळून गोकुळात दूधदुभत्याची अगदी रेलचेल होत असे. अशा तऱ्हेने सुखस्वास्थ्यासाठी, होणाऱ्या जलवृष्टीवर पूर्णपणे अवलंबून असणाऱ्या गोकुळवासीयांना त्यांच्या कल्पनेतील इंद्र या देवतेविषयीचे अत्यंत महत्त्व वाटत होते यात नवल ते काय? किंबहुना त्यांच्या ठिकाणी इंद्राचे केवढे तरी माहात्म्यच ठसून राहिलेले होते. कृष्णाच्या जेव्हा हे लक्षात आले तेव्हा त्याला त्या गोकुळवासीयांची ती अंधश्रद्धा पाहून वाईट वाटले आणि त्याने त्यांची ती अंधश्रद्धा दूर करण्याचा निश्चयच केला.

दरवर्षीप्रमाणे जेव्हा गोकुळातील वृद्ध व मान्यवर मंडळी नंदाच्या राजवाड्यावर जमून इंद्र देवतेच्या पूजेची चर्चा करीत होती, तेव्हा कृष्ण स्वतः तेथे उपस्थित राहिला. सर्वांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकून झाल्यावर नंदाची परवानगी घेऊन कृष्णाने बोलण्यास सुरुवात केली.

''हे तात, मला काही गोष्टी मोकळेपणाने व स्पष्टपणाने विचारायच्या आहेत आणि बोलायच्याही आहेत. तरी कोणीही त्याचा राग मानू नये. सर्वांप्रमाणेच गोकुळाचे हित हाच एकमेव विचार माझ्या मनात आहे. सर्वप्रथम इंद्र या देवतेमुळेच गोकुळात पाऊस पडतो हा जो समज वर्षानुवर्षे सर्वांच्या मनात अगदी दृढतेने ठसून राहिलेला आहे, तो मुळातच अत्यंत चुकीचा आहे. या अंधश्रद्धेचा सर्वांच्याच मनावर एवढा पगडा होऊन बसलेला आहे, की कोणाचीही बुद्धी व

विचारशक्ती ही कामच करीनाशी झालेली आहे. अंधश्रद्धा ही माणसाला एवढी दुर्बल करते, की तो तिच्या आहारी कायमचा जाऊन बसतो. मग त्यातून सुटका होणे अत्यंत कठीण होऊन राहते. पण आपण जर थोडासा तरी विचार केला, तर आपल्या लक्षात येईल की पाऊस पडण्याचा आणि तुमच्या त्या इंद्राचा काहीच संबंध नाही.

खरे तर, जलाची वृष्टी या मेघातून होते आणि या मेघांना अडवण्याचे काम गोवर्धन पर्वताकडून होत असते. या गोवर्धनाने जर त्या मेघांना अडवले नाही, तर ते मेघ वाऱ्याच्यासंगे गोकुळाबाहेर निघून जातील. मग पावसाची वृष्टी गोकुळावर होण्याची शक्यता अजिबात नाही. तेव्हा आपल्यासाठी केवळ या गोवर्धनाचेच उपकार आहेत. त्याच्यामुळेच गोकुळावर पर्जन्यवृष्टी होते हे आपण कधीही विसरता कामा नये. गोवर्धनाच्या उपकाराचे स्मरण ठेवून आपण दरवर्षी त्याचीच पूजा करणे आवश्यक आहे. ज्या इंद्राला आपण कधी पाहिलेलेही नाही, त्याची पूजा करणे ही तर केवळ अंधश्रद्धाच नव्हे काय? आपण केलेली पूजा त्याच्यापर्यंत जाऊन पोहोचते की नाही याचाही आपण कधी विचार करीत नाही. याला काय म्हणावे बरे? परंतु हा गोवर्धन पर्वत आपल्याला दिसत आहे. तो तर नेहमीच आपल्या दृष्टीसमोर असतो ना? मग त्याचीच पूजा करणे योग्य नव्हे काय? त्याचसाठी या वर्षी काल्पनिक इंद्र देवतेची पूजा वगैरे काहीही न करता, गोवर्धन पर्वताचीच पूजा करण्याचा निश्चय आपण करूया आणि तशी तयारी करावयास सुरुवात करूया.''

कृष्णाचे असे हे अनपेक्षित बोलणे ऐकून आधी सर्वजण बुचकळ्यातच पडले. कृष्णाच्या बोलण्याचा त्यांना नीट अर्थबोधच होईना. परंतु कुठल्याही परिस्थितीत 'इंद्राची पूजा करायची नाही' हा विचार मात्र त्यांच्या मनाला मान्यच होईना. कारण वर्षानुवर्षे चालत आलेली रूढी व परंपरा सोडण्याचा विचारही त्यांच्या मनाला शिवूच शकत नव्हता. त्यामुळे गोकुळातील वृद्ध व अनुभवी व्यक्तींनी कृष्णाच्या सूचनेचा मुळीच स्वीकार केला नाही. परंतु काही जाणकार मंडळींना मात्र कृष्णाच्या बोलण्यात काही तरी तथ्य आहे असे जाणवले. परंतु रूढी व परंपरेला बाजूला करण्याचे धैर्य त्यांनाही होतच नव्हते. त्यामुळे त्यांनी 'इंद्राची पूजा चालूच ठेवावी आणि त्याचबरोबर गोवर्धनाचीही पूजा करावी' अशी सूचना केली. परंतु कृष्णाने या सूचनेला कडाडून विरोध केला. 'असे अर्धवट काहीतरी अजिबात करायचे नाही' असे त्याने स्पष्टपणे सांगितले. काही तरुण मंडळींना मात्र कृष्णाची सूचना त्यातील नावीन्यामुळे आवडली. काहीतरी बदल होत असेल तर त्याचे स्वागत करण्यासाठी त्यांचा उत्साहच होता. परंतु कृष्णाला मात्र केवळ बदलासाठी बदल हा नकोच होता. 'योग्य भूमिका योग्य विचाराने घेऊनच योग्य तो बदल करावा' अशी त्याची ठाम भूमिका होती. शेवटी निर्णय घेण्याची वेळ नंदावरच आली. त्याने शांतपणे सर्व गोष्टींचा विचार केला. एकीकडे त्याला कृष्णाच्या बुद्धिमत्तेचे व त्याच्या विचारसरणीचे अत्यंत कौतुक वाटत होते. तर दुसरीकडे त्याला सर्व गोकुळवासीयांची मनेही राखायची होतीच. तरी सर्वांचा सारासार विचार करून त्याने बोलावयास प्रारंभ केला.

''हे गोकुळवासीयांनो, पर्जन्यवृष्टी होण्यामागची जी कारणमीमांसा या कृष्णाने सांगितली आहे, ती अगदी योग्यच आहे. आपण या गोवर्धन पर्वताचे असलेले महत्त्व व त्याचे आपल्यावरील उपकार तर पूर्णपणे विसरूनच गेलो होतो.

किंबहुना आपल्या ते लक्षातही आलेले नव्हते. या कृष्णाने ते आपल्या लक्षात आणून दिले याबद्दल त्याचे तर आपण अत्यंत कौतुकच करावयास हवे. एवढे दिवस आपण रूढींना धरून व परंपरेनुसार इंद्राची पूजा करीत आलो आणि त्याच बरोबर त्यातून निर्माण झालेल्या अंधश्रद्धेला आपण जोपासीत आलो. त्यामुळे आपली विचारशक्तीही कुंठीत होऊन राहिलेली होती. परंतु आता या कृष्णाच्या बोलण्याने तरी आपले डोळे उघडले जाऊ देत आणि योग्य अयोग्य याची नीट समज आपल्याला होऊ दे. एवढे दिवस आपल्याला हे माहीतच नव्हते. त्यात आपली चूक नव्हती. पण आता कळल्यावर तसा योग्य बदल आपण केला नाही तर ती मात्र आपली मोठीच चूक ठरेल.

योग्य वेळी योग्य कारणास्तव योग्य बदल करता येणे हे प्रगतीचेच लक्षण आहे. प्रगतीसाठी योग्य बदल हा आवश्यकच आहे. तसा बदल करण्याची संधी आपल्याला लाभली आहे. तिचा लाभ घेऊनच आपण आपली प्रगती साधली पाहिजे. केवळ बाह्यांगाचा विकास करणे ही प्रगतीच नव्हे, तर मनाचा विकास होणे हीच खरी प्रगती आहे. तेव्हा या वर्षी कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे, आपण इंद्र या काल्पनिक देवतेची पूजा न करता प्रत्यक्ष गोवर्धन पर्वताची पूजा करूया. तसे करणेच अत्यंत योग्य आहे अशी माझी पूर्ण खात्री आहे. यासाठी आपण सर्वांनीच त्या तयारीला लागणे योग्य ठरेल. पण कृष्णा, या गोवर्धनाची पूजा कशी व कोठे करायची हे मात्र तुलाच सांगायला हवे. म्हणजे मग तसे सर्व ठरवता येईल. तेव्हा या बाबतीत तुझे काय म्हणणे आहे ते सांग बरे.''

नंदाचे बोलणे ऐकून कृष्णाला अत्यंत समाधान वाटले. परंतु इतर सर्वांनाच ते बोलणे आवडले असे मात्र नाही. रिती व परंपरेच्या आधाराने जीवन जगणाऱ्यांच्या मनात तर एक प्रकारची भीती व साशंकताच निर्माण झाली. इंद्र देवतेला डावलून गोवर्धनाची पूजा केल्यास इंद्र देवतेचा अवमान होईल आणि त्याची परिणती इंद्राचा कोप होण्यातच होणार याची त्यांना पुरेपूर खात्रीच वाटत होती. काहीजणांना त्यांचा सल्ला न मानता नंदाने कृष्णाचे म्हणणे ऐकले याची नाराजी वाटली व थोडासा रागही आला. कृष्णाचे बोलणे हे त्यांना केवळ शहाणपणाचे वाटत होते. नंद कृष्णाच्या बोलण्याला 'आपल्या मुलाचे बोलणे' म्हणून वाजवीपेक्षा जास्त महत्त्व देत आहे अशीच त्यांची पक्की खात्री झाली होती. त्यामुळे त्यांना तो त्यांचा अपमानच वाटत होता. परंतु शेवटी 'नंद राजा आहे' याच भावनेने नाइलाजास्तव ते गप्पच बसून राहिले. काहीजणांना मात्र कृष्णाच्या बोलण्यातील तथ्य जाणवले होते आणि त्यामुळे नंदाचा निर्णयही त्यांना योग्यच वाटला. 'निदान या वर्षी तरी कृष्ण सांगतो त्याप्रमाणे करून बघण्यास हरकत नाही' असे त्यांना वाटत होते आणि त्यांनी तसे त्यांचे मत व्यक्तही केले. अनेक जणांची मते व अभिप्राय त्यांच्या शब्दाने किंवा त्यांच्या चेहऱ्यावरील भावाने प्रगट होत होते. कृष्णाने त्या सर्वांकडे थोडावेळ पाहिले आणि आपल्या शांत व गंभीर वाणीने बोलण्यास सुरुवात केली.

''हे तात, आपण व गोकुळवासीयांनी माझे म्हणणे ऐकून घेतले आणि त्यावर विचार करून त्याला मान्यता दिली याचे मला खरेच अत्यंत समाधान होत आहे. एवढे दिवस आपण अंधश्रद्धेने वस्तुस्थितीकडे डोळेझाक करीत आलो. परंतु आता खरी वस्तुस्थिती पाहण्याचे, समजण्याचे आणि त्याला सामोरे जाण्याचे धैर्यबळ आपण आता घेत आहोत हे खरोखरीच

अत्यंत कौतुकास्पद आहे.  कुठलाही बदल होत असताना मनाची थोडीशी चलबिचल व द्विधास्थिती होतच असते.  परंतु अशाच वेळी मन स्थिर व शांत ठेवून कृतीचे पाऊल पुढे टाकणे आवश्यक असते.  तेव्हा आता आपण गोवर्धन पर्वताची पूजा करण्याच्या तयारीला लागूया.  सकृत्‌दर्शनी त्यात अडचण वाटत असली, तरी त्यामध्ये तशी कोणतीही अडचण मुळीच नाही.  नाहीतरी, आपण एवढे वर्ष इंद्र देवतेची जेव्हा पूजा करीत होतो, तेव्हा त्या इंद्राची काल्पनिक मूर्तीच बनवत होतो आणि पूजाअर्चा झाल्यावर त्याचे यमुना नदीत विसर्जन करीत होतो.  या वेळेस गोवर्धन पर्वत हा तर आपल्या समोर प्रत्यक्षच आहे.  तेव्हा त्याची यथासांग पूजा प्रथम आपण त्याच्या पायथ्याशी व नंतर त्याच्या माथ्यावर जाऊन करूया. म्हणजे सर्व पर्वतालाच ती पूजा पोहोचली असे होईल.  बाकी आपला पूजेचा बाह्य विधी नेहमीचाच असेल.  त्यामध्ये बदल करण्याची काहीच आवश्यकता नाही.  या निमित्ताने आपण सर्व गोकुळवासी एकत्र जमूया.  निरनिराळ्या खेळांचे व स्पर्धांचे आयोजन करूया.  सर्व मिळून सहभोजनाचाही लाभ घेऊया.  गोकुळवासीयांसाठी एक आनंदाचा उत्सवच साजरा करूया.''

कृष्णाच्या बोलण्याने सर्वांनाच समाधान झाले आणि सर्वांच्या ठिकाणी एक उत्साहाचेच वातावरण निर्माण झाले. सर्वच जण जोमाने तयारीला लागले.  अर्थातच तरुण मुलांच्या ठिकाणी या उत्साहाचे प्रमाण अधिक होते.  नियोजित दिवशी सर्व गोकुळवासी नटून थटून प्रथम नंदाच्या राजवाड्यात जमले आणि मग तेथून नंद यशोदेला सर्वात अग्रभागी ठेवून वाजत गाजत, नाचत गात मोठ्या मिरवणुकीने गोवर्धन पर्वताकडे निघाले.  सर्वांचे संयोजन कृष्ण मोठ्या कौशल्याने करीत होता आणि त्याला सहाय्य मोठा बंधू बलराम, अनय व राधा करीत होते.  एका बाजूला अनय व दुसऱ्या बाजूला राधा यांचा हात हातात घेतलेला आणि त्या दोघांमध्ये असलेला कृष्ण अधिकच शोभून दिसत होता.  अनय व राधा यांच्या जोडीकडे बघून कृष्णाला अतिशय आनंद होत होता.

कृष्णाकडे पाहतच राहिलेल्या राधेचे तर सर्व भावच उचंबळून आले होते आणि तिच्या आनंदाला पारावारच राहिला नव्हता.  कधी नव्हे तो अनयही अतिशय उत्साहात होता.  कृष्णाचे त्याला अतिशय कौतुक वाटत होते आणि कृष्णाला सर्व संयोजन करण्यामध्ये सहाय्यभूत होतानाही अनयाचा सहभाग विशेषत्वाने दिसत होता.  परंतु सर्वात उत्साहाचा कळसच झाला होता तो पेंद्या!  आज खाण्यापिण्याची व खेळण्याची चंगळच होणार आहे या खात्रीपोटी तो अगदी खुशीत होता. शारीरिक दुर्बलतेमुळे त्याला इतर वृद्ध मंडळींबरोबर विशेषत्वाने सजवलेल्या बैलगाडीमध्ये बसण्याची संधी मिळाली होती. तेथे बसूनच तो अनेकांना मोठमोठ्याने हाका मारून साद घालीत होता आणि आपला हात वारंवार उंचावून त्याचा आनंद व्यक्त करीत होता.  गोकुळातल्या बाळगोपाळांनी आज आपल्या गाई वासरांना व इतर गुरांनाही खास सुशोभित केले होते. अशी ही सर्व गोकुळवासीयांची 'शोभायात्रा' हसत खेळत गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशी येऊन पोहोचली.

कृष्णाने प्रथम पायथ्याजवळचा एक मोठा लांबट वाटोळ्या आकाराचा गुळगुळीत पाषाण शोधून काढला आणि पाण्याने तो चांगला स्वच्छ धुतला.  त्या विशेष आकार असलेल्या पाषाणाच्या ठायीच मग गोवर्धनाच्या जणु चरणांची संकल्पना केली.  त्यानंतर कृष्णाच्या सूचनेनुसार नंद व यशोदा यांच्या हस्ते त्या पाषाणाची यथासांग व सर्व विधीने युक्त

अशी पूजा केली. मग गोकुळातील वयोवृद्ध व्यक्तिंनीही तेथे षोडषोपचारे पूजा केल्यावर नैवेद्य अर्पण केला. त्या पाठोपाठ सर्वच गोकुळवासीयांनी फुले वाहून आपली भावना व्यक्त करून तिची पूर्ती केली. तेथून सर्वजण गाईगुरांना पायथ्याशीच ठेवून पर्वतातील पायवाटेने हळु हळू चालत गोवर्धनाच्या माथ्यावर येऊन पोहोचले. तेथेही एक सुयोग्य आकाराचा पाषाण शोधीत असताना अचानक एका पाषाणातच थोडीशी कोरलेली मूर्ती कृष्णाच्या दृष्टोत्पत्तीस आली. त्याने ती सर्वांना दाखवली आणि तीच 'गोवर्धन' देवता असल्याचे सांगितले. सर्वांनाच ती मूर्ती पाहून आनंद झाला आणि सर्वांच्याच ठिकाणी एक मांगल्याची व पावित्र्याची भावना जागृत झाली. ताबडतोब त्या मूर्तीला पाण्याने स्वच्छ करून एका जागी स्थिरपणे बसवण्यात आले. नंद व यशोदा यांनी त्या मूर्तीची विधीयुक्त षोडषोपचारे पूजा केल्यानंतर इतर सर्वांनीही आपला भाव फुले व फळे अर्पण करून प्रगट केला. त्यानंतर सर्वांनी मिळून सामुदायिक प्रार्थना म्हणून गोवर्धनाविषयीची आपली कृतज्ञता व्यक्त केली. कृष्णाने त्या ठिकाणी अर्पण झालेली फळे एकत्र केली आणि त्याचा प्रसाद करून तो सर्वांना वाटून दिला. त्याच्या सेवनाने 'धन्य' झाल्याचा आनंद सर्वांच्याच मुखावर स्पष्टपणे दिसत होता.

त्यानंतर कृष्णाने गोकुळवासीयांना नाना तऱ्हेचे खेळ खेळण्यास लावले. स्त्रियांचे खेळ, पुरुषांचे खेळ, लहानांचे खेळ, मोठ्यांचे खेळ अशा अनेक खेळांची योजना कृष्णाने मोठ्या कुशलतेने केली आणि सर्वांना म्हणजे अगदी सर्वांना त्यात सहभाग घेण्याची संधी दिली. संकोचाने वा लाजेने दूर राहणाऱ्यांनाही कृष्णाने प्रेमाच्या आग्रहाने खेळण्यास भागच पाडले. पेंद्याला बलरामाच्या पाठुंगळीवरती बसवून त्यालाही विविध खेळांमध्ये सामावून घेतले. बलरामाची धष्टपुष्टता आणि पेंद्याचा काटकुळेपणा असा या जोडीतील विरोधाभास सर्वांच्याच चेष्टेचा व कौतुकाचाही विषय झालेला होता. बलरामाच्या पाठीवर बसलेला पेंद्या जोरजोराने ओरडून बलरामाला प्रोत्साहन देत असे आणि बलरामाला जिंकण्यासाठी भाग पाडत असे. अगदी नंद व यशोदा यांनाही कृष्णाने सोडले नाही आणि त्यांना खेळामध्ये सहभाग घ्यायला लावलेच. कृष्ण स्वतः उत्साहाने सर्वत्र संचार करून सर्व खेळांचे व स्पर्धांचे संयोजनही करीत होता आणि त्यात सहभागही घेत होता. सर्वांचाच उत्साह अगदी ओसंडून जात होता.

सर्व खेळांच्या शेवटी कृष्णाने पतीपत्नींच्या जोड्या जमवल्या आणि त्यांच्यासाठी एका खास स्पर्धेची योजना केली. अंतिम फेरीमध्ये नंद-यशोदा आणि अनय-राधा या दोन जोड्या आल्या होत्या. त्यांच्यामध्ये सुद्धा शेवटी समसमान गुण झाले. आता त्यांच्यात विजेता कोणाला ठरवावे असा एक गमतीचा पेच निर्माण झाला. शेवटी संयोजक कृष्णाने नंद-यशोदेच्या बाजूने आपला निर्णय जाणून बुजूनच दिला. कृष्णाच्या या उघड उघड पक्षपाती निर्णयाचा सर्वांनाच सुखद धक्का बसला आणि टाळ्यांचा कडकडाट करून सर्वांनी आपली संमती व आनंद व्यक्त केला. त्यावेळी कृष्ण मुद्दामच अनय व राधा यांच्याकडे बघून हसत होता. कृष्णाचा हा मिश्किल भाव व खट्याळपणा अनय व राधा यांनाही अत्यंत भावला. त्यांनीही कृष्णाकडे बघून कौतुकाचे हास्य केले आणि नंद व यशोदा यांचे अभिनंदन करून आपलाही आनंद व्यक्त केला.

असा बराच वेळ उत्साहाने खेळण्यात गेल्यावर श्रांत झालेल्या सर्वांनीच थोडा वेळ विश्रांती घेतली. सर्वात नवलाईची गोष्ट म्हणजे गोवर्धन पर्वताच्या शिखरावर एवढ्या उंचीवरच्या ठिकाणीही निर्मळ व गोड पाण्याचे झरे होते. त्यामधील जलाने सर्वच जण ताजेतवाने झाले. मग स्त्रियांनी करून आणलेले सर्व पदार्थ एकत्र करण्यात आले. पानांवर वाढलेले पदार्थ आपल्या हातात धरून सर्वजण नानाविध रसांनी युक्त अशा त्या पक्वान्नांचा रसास्वाद मनमुरादपणे घेत होते. राधा व अनय आणि कृष्ण व बलराम हे स्वतः सर्वांमध्ये फिरून विविध पदार्थांचे वाढप अत्यंत आग्रहाने करीत होते. पेंद्याला तर कोणाच्याही आग्रहाची जरुरीच नव्हती. सर्वांची जेवणे झाल्यावर नंद व यशोदा यांनी अनय, राधा, कृष्ण व बलराम यांना जेवावयास बसवले आणि स्वतःच्या हातांनी त्यांना वाढले. पेंद्या अर्थात पुन्हा त्यांच्याही पंक्तीला बसला होताच. त्याच्याकडे चेष्टेने बघणाऱ्यांना तो सांगत होता की 'कृष्णाने आग्रह केल्यामुळेच केवळ मी त्यांच्यासह जेवावयास बसलो आहे आणि कृष्णासारख्या माझ्या खास मित्राला प्रत्येक प्रसंगात साथ देणे हे तर माझे कर्तव्यच आहे.' पेंद्याच्या या विनोदी बोलण्याला सर्वच जण हसून दाद देत होते.

अशा तऱ्हेने सहभोजनाचा कार्यक्रम झाल्यावर सर्वांनीच आपापल्या परीने विश्रांती घेतली. कोणी झाडाखाली सावलीत पहुडले, तर कोणी झाडाच्या बुंध्यांना वा मोठ्या दगडांना टेकून लवंडले. कोणी आपापसात गप्पा मारीत होते, तर कोणी हास्यविनोद करीत बसले होते. थोड्या वेळाने सूर्याची किरणे लांब होऊ लागली आणि प्रकाश कमी होऊ लागला. हवेतील उष्णताही कमी होऊन गारवा वाढू लागला. सुखवणारे वारेही वाहू लागले. सुस्तावलेली व आळसावलेली मंडळी पुन्हा जलाचे हबके हातापायांवर व चेहऱ्यावर मारून घेत ताजीतवानी झाली. तेथून निघण्याचा विचार कोणाच्याच मनात येत नव्हता. नंदाने त्याप्रमाणे सर्वांना विचारले असता सर्वांनीच घरी परत जाण्याविषयी आपली नाराजी व्यक्त केली. मग पुन्हा सर्वजण एकत्र जमले आणि मग कृष्णाने गाणी गाण्याचा कार्यक्रम सुरू केला. त्याने सर्वांना म्हणजे सर्वांना गाणी म्हणावयास लावले. त्यातून अगदी म्हाळसा काकूचीही सुटका होऊ शकली नाही. सर्वजणांची ऐकता ऐकता हसून अगदी मुरकुंडी वळली होती. पेंद्याच्या बोबड्या बोलातील व बेसूर गाण्यानेही सर्वांची हसता हसता पुरेवाट झाली. अनय व राधा यांच्या द्वंद्व गीताने तर बहारच आली. परंतु राधा व कृष्ण यांच्या एकत्र गायनाने तर सर्वच जण बराच काळ मंत्रमुग्ध होऊन राहिले होते.

त्या नंतर कृष्णाने मग एकेकांच्या नकला करावयास सुरुवात केली. नंद, यशोदा यांच्यापासून ते थेट अगदी अनय, राधा व म्हाळसेपर्यंत कृष्णाने कुणाला म्हणजे कुणालाही सोडले नाही. बलरामाची गंभीरता व पेंद्याच्या लकबी कृष्णाने अगदी हुबेहूब साकार केल्या. म्हाळसेचा ठसका दाखवून कृष्णाने सर्वांचीच दाद मिळवली. म्हाळसा सुरुवातीला थोडीशी नाराज झाली खरी, परंतु शेवटी तिलाही तिचे हसू आवरता आले नाही. त्यातूनही सर्वांच्या पसंतीची टाळी कृष्णाने मिळवली ती त्याने सादर केलेल्या अनय व राधा यांच्या एकत्रित नकलेला! एकाच वेळी एकदा अनय व एकदा राधा यांचे बोलणे त्यांच्या त्यांच्या बोलण्याच्या लकबीप्रमाणे आणि त्यांच्या त्यांच्या हावभावांनुसार करून, अनय व राधा हे एकमेकांशी कसे बोलतात व भांडतात हे कृष्णाने दाखवले असता, लोकांनी टाळ्यांचा कडकडाट करून दिलेला प्रतिसाद कितीतरी वेळ थांबलाच नाही.

त्यातून निर्माण झालेल्या हास्यकल्लोळात स्वतः सामील होत राधा उठून पुढे आली आणि तिने खुद्द कृष्णाचीच नक्कल करावयास सुरुवात केली. कृष्ण बोलतो कसा, हसतो कसा, रुसतो कसा, कधी खरा तर कधी खोटाच रागावतो कसा, स्वतःचा मुद्दा दुसऱ्याला पटवून देताना हातवारे कसे करतो हे करून दाखवताना राधा एवढी तन्मय झाली होती की जणू ती कृष्णमयच झालेली दिसत होती. कृष्णरूपाची तिने दाखवलेली अनेक अंगे आणि कृष्णस्वभावाच्या तिने दाखवलेल्या छटा एवढ्या बरोबर होत्या, की राधेच्या रूपाने जणू कृष्णच वावरतो आहे असेच जाणवत होते. तिच्या त्या आविष्काराचे कौतुक सर्वांनाच वाटले यात काहीच नवल नाही, परंतु त्याचा कृष्णाला झालेला आनंद काही आगळा वेगळाच होता. राधेच्या रूपाने त्याला तर जणू स्वतःचेच प्रतिबिंब आपण आरशात पहात आहोत असे जाणवले. त्याचा आनंद अनुभवताना त्याच्या ठिकाणी असलेले राधेविषयीचे प्रेम त्याच्या मुखावर विशेषत्वाने प्रगटलेले दिसत होते. राधेकडे प्रेमभऱ्या नेत्रांनी कृष्ण अगदी एकटक पहात होता.

कृष्णाचे व्यक्तिमत्त्व अनेक अंगांनी दाखवताना त्यात रंगलेली राधा एकदम कृष्णाजवळ आली आणि कृष्णाची बासरी मागून घेऊन एका शिळेवर बसली. राधेने बासरी हातात धरून आपल्या ओठांवर ठेवली आणि त्यातून धून वाजवू लागली मात्र, सर्वजण मोठमोठ्याने हसू लागले. कारण राधेच्या बासरी वाजवण्यात ना सुराचा पत्ता होता, ना तेथे तालाला स्थान होते. तिचे ते विचित्र बासरी वादन हा सर्वांच्या चेष्टेचा विषय झाला. कृष्ण मात्र राधेकडे पाहून मंद स्मित करीत होता. सर्वांचे हसणे ऐकताना राधा अर्थातच अतिशय ओशाळली. तिला अगदी वरमल्यासारखे झाले. तिच्या डोळ्यातही पाणी तरारून आले. कृष्णाकडे ती केविलवाण्या नजरेने पहात होती. तिच्या लक्षात आले होते, की कृष्णाच्या बाह्यरूपाची नक्कल एकवेळ अगदी हुबेहूब करता येईल, परंतु ज्यामध्ये कृष्णाचे अंतःकरणच प्रगट होते त्या त्याच्या बासरी वादनाची नक्कल करता येणे कधीच शक्य नाही. शेवटी अस्सल ते अस्सलच. त्याची सर किंवा बरोबरी नकली गोष्टींना कधीच करता येणार नाही. अस्सल समोर आले की नक्कल ही कमी व उघडीच पडणार हे तिच्या लक्षात आले होते. त्यामुळे तिला स्वतःचीच लाज वाटू लागली होती. अशा परिस्थितीत काय करावे या विचाराने राधा दिङमूढच झाली होती.

राधेची ही अवस्था कृष्णाच्या लगेचच लक्षात आली होती. आपल्या जागेवरून तो ताबडतोब उठला आणि राधेच्या जवळ येऊन उभा राहिला. राधाही पटकन उठून उभी राहिली आणि कृष्णाकडे असहाय्यतेने पहात राहिली. कृष्णाने हसून राधेकडे पाहिले आणि तिच्या हातातली आपली बासरी आपल्या हातात घेतली. राधा ज्या शिळेवर बसली होती त्या शिळेवर कृष्ण आता स्वतः बसला. आपल्या एका पायावर दुसरा पाय ठेवून त्याने आपली प्रिय बासरी आधी आपल्या हृदयाशी धरून कुरवाळली आणि नंतर अलगदपणे आपल्या अधरावर ठेवली. कृष्णाने आपले नेत्र मिटून घेतले आणि क्षणभर तसाच ध्यानस्थ बसून राहिला. सर्वकडे नीरव शांतता पसरलेली होती. सर्वांचीच नजर कृष्णावर खिळून राहिली होती. तो थोडासाच काळही बराच लांबल्यासारखा वाटत असतानाच अचानक कृष्णाच्या बासरीतून अत्यंत हळुवार असे सूर प्रगट होऊ लागले आणि सर्वांची अंगे मोहरून आली. एका मागून एक स्वरांच्या मधुर लहरी त्या बासरीतून, म्हणजे खरे तर कृष्णाच्या

अंतःकरणातूनच बाहेर येत होत्या आणि सर्वांच्याच कानाला सुखवून मनाला तृप्त करीत होत्या. मनाला एक प्रकारची धुंदीच येत होती.

कृष्णाच्या अंतःकरणातून प्रगटणाऱ्या मंजुळ सुरांनी राधा तर सर्वांगाने न्हाऊन निघाली आणि तिची ती राहिलीच नाही. एवढा वेळ कृष्णाची नक्कल करून केवळ बाह्यांगाने कृष्णरूप झालेली दिसणारी राधा आता मात्र खरेच कृष्णमय झाली होती. राधेचे मन कृष्णप्रेमाने भरून उचंबळून येऊ लागले. तिची ही मनाची अवस्था आणि तिच्या मनातील कृष्णाविषयीचे प्रेमभाव तिच्या शरीराद्वारे सहजपणे व्यक्त होऊ लागले. मिटलेल्या नेत्रांतून प्रेमाश्रू पाझरत आहेत अशा अवस्थेतील राधा तिच्या नकळतच उठून उभी राहिली आणि बासरीच्या नादावर तिची पावले हळुहळू नाचू लागली. तिच्या पायातील पैंजणांचा झणत्कार ताल धरू लागला आणि त्याला तिच्याच करताली वादनाचीही साथ मिळू लागली. कृष्णाचे सुस्वर बासरीवादन आणि राधेचे तालनृत्य यांच्या संगमाने सर्व वातावरणच धुंद झाले. सर्व आसमंतच त्या दैवी संगीताच्या आविष्काराने भारून गेला आणि त्याचा परिणाम सर्वांवरच होऊ लागला. एकेक जण हळुहळू आपल्या जागेवरून त्यांच्या नकळतच केव्हा उठू लागला आणि डोलू लागला हे त्यांचे त्यांनाही कळले नाही. एकामागून एक भारावून जाऊन प्रभावित झालेले त्या नृत्यात सामील होऊ लागले. स्त्री-पुरुष, बाल-वृद्ध असा बाह्य फरक संपुष्टात आला आणि सर्वजण कृष्णाभोवती फेर धरून नाचू लागले. कळत नकळत जोड्या जमू लागल्या. करताल धरला जाऊ लागला आणि सर्वांमध्ये बसलेल्या कृष्णाकडे अनिमिष नेत्रांनी व प्रेमभऱ्या नजरेने पहात नाचणाऱ्या त्या सर्वांचेच देहभान तेवढा वेळ हरवून बसले.

एव्हाना सूर्यही पूर्णपणे अस्ताला गेला होता. पण तरीही अंधाराचे साम्राज्य मात्र पसरू शकले नव्हते. कारण ईश्वरी प्रेमाचा महिमा प्रगटविणारा चंद्रमा गगनात अधिष्ठित झाला होता. स्वयंतेजाने लुकलुकणाऱ्या असंख्य चांदण्यांसह चंद्राच्या शीतल व आल्हाददायी प्रकाशाने सर्व गगनच व्यापून राहिले होते. त्यातून बरसणाऱ्या चांदण्याच्या प्रकाशात सर्व सृष्टीच न्हाऊन निघाली होती. परंतु गोवर्धन पर्वताच्या शिखरावर कृष्णरूपी चंद्र आणि त्याच्या सभोवार फिरणारे अनेक गोपगोपीरूपी तारे व तारका यांच्या प्रेमचांदण्याच्या प्रकाशापुढे आकाशातील चंद्र व तारकांचा प्रकाश फिकाच पडत होता. गोवर्धन पर्वतावर असलेल्या अनेक सुगंधी वनस्पती व फुलझाडे यांचा दिव्य व मोहक सुवास, वाहणाऱ्या वाऱ्यासमवेत सर्व वातावरणालाच सुगंधित करून ठेवीत होता.

देह व मन या दोन्हीचे भान हरवून बसलेल्या राधेच्या मनाला एकाएकी काहीतरी कमतरता जाणवू लागली. ज्या कृष्णामुळे तिचे सर्व भान हरवले होते तो कृष्ण तिला प्रत्यक्ष हवासा वाटू लागला. तिच्या मनाला एक प्रकारची बेचैनी जाणवू लागली. म्हणून राधेने आपले नेत्र उघडले मात्र, सर्वांच्या मध्ये बसून एकतानतेने बासरी वाजवणाऱ्या कृष्ण मूर्तीचे तिला दर्शन झाले. कृष्णाचे माहात्म्य जाणून असणाऱ्या राधेला ठाऊक होते की 'सर्व सृष्टीला मंत्रमुग्ध करून ठेवणाऱ्या या दैवी सुरांचे मूळ स्थान कृष्णाच्या अंतःकरणात आहे. कृष्णाच्या अंतःकरणातून स्फुरलेले सूरच बासरीच्याद्वारे प्रगट होत आहेत. कृष्णाच्या अंतःकरणातील नित्य स्फुरणाऱ्या नादाचेच निनाद बासरीतून साकार होत आहेत.' अशा त्या कृष्णाला

पहाता पहाता राधा सावध झाली. तिने आजूबाजूला पाहिले तो तिच्या लक्षात आले, की कृष्ण त्याच्या नादात पूर्णपणे रमलेला आहे आणि बाकी सर्व जण त्या तालसुरांमध्ये रंगलेले आहेत. कृष्णाकडे एकलक्षतेने पहात पहात राधा इतर कोणाच्याही लक्षात येणार नाही अशा सावधपणे कृष्णाभोवतीचे सर्व फेरे हळुहळू पार करीत कृष्णाच्या जवळ येऊन पोहोचली. स्वतःच्या स्वरूपात रममाण होऊन मुरलीवादन करणाऱ्या कृष्णाला एकटक पाहताना नकळतपणे राधेने आपले दोन्ही हात जोडले आणि कृष्णाचे दर्शन घेतले. कृष्णाच्या चरणांना राधेने वाकून स्पर्श केला मात्र, कृष्ण देहभानावर आला.

कृष्णाच्या त्या अंतर्मुख अवस्थेतून केवळ राधेचा भक्तिभावाचा स्पर्शच त्याला देहभानावर आणू शकला. प्रेमभक्तिभावाने युक्त अशी राधा कृष्णाने पाहिली मात्र, त्याला अतिशय आनंद झाला. त्याच्या अंतःकरणात तो अनुभवीत असलेला आनंद कृष्णाला जणू राधेच्या रूपानेच दिसला आणि भक्तिभावाचा नित्य भुकेला असा तो कृष्ण राधेच्या भक्तिभावाने तृप्त झाला. बासरीवादनाची परिणती राधा कृष्णाच्या जवळ येण्यात झाली. कृष्णाभोवतालच्याही सर्व गोष्टी युक्तीने बाजूला करून राधा कृष्णाच्या चरणी आलेली कृष्णाने पाहिली मात्र, बासरीवादनाचे सार्थक झाले आणि त्याचा हेतू साध्य झाला असेच कृष्णाला वाटले. बासरी वादनाचे फळ त्याला जणू राधेच्या रूपाने मिळाले आणि कृष्ण समाधान पावला. कृष्णाचे बासरीवादन सहजपणे थांबले. कृष्णाने राधेला प्रेमाने आपल्या जवळ घेतले आणि तो राधेच्या खांद्यावर हात ठेवून तिच्याकडे एकटक पहात तेथेच व तसाच उभा राहिला.

कृष्णाने मुरलीवादन थांबवले तरी ते सर्वांच्या लक्षात यायला वेळ लागला. कारण मुरलीच्या नादाचा निनाद बराच वेळ सर्वांच्या अंतरात घुमतच राहिला होता. परंतु नादाबरोबर निनादही हळुहळू विरत गेला आणि सर्वजण एकदम भानावर आले. थोडा वेळ काय झाले हे कोणाच्याही लक्षात आले नाही. परंतु जेव्हा त्यांच्या लक्षात आले तेव्हा एकमेकांकडे प्रेमभराने पहात असलेले आणि एकमेकांत हरवून राहिलेले राधा व कृष्ण त्यांच्या नजरेस आले. काय करावे हे कोणालाही एकदम सुचेना. परंतु काहीजणांनी जेव्हा करतालीनादाने आपली प्रतिक्रिया व्यक्त केली तेव्हा बहुतेक जण त्यात सामील झाले. परंतु म्हाळसा व अनय यांच्या ठिकाणची नाराजी मात्र साहजिकच लपून राहू शकली नाही. रागाने लालबुंद झालेली आणि काही इतर स्त्रियांच्या नजरेची लक्ष्य बनलेली म्हाळसा तिकडून तरातरा निघाली आणि एकटीच पर्वत शिखरावरून उतरून गोकुळाच्या दिशेने चालू लागली. अनयाने त्याला आलेला संताप मोठ्या प्रयासाने गिळला आणि संयम दाखवला खरा, परंतु ज्या नजरेने राधेकडे पहात तो पुढे आला आणि ज्या पद्धतीने त्याने राधेचा हात धरून तिला कृष्णापासून दूर ओढले, त्यातून अनयाचा झालेला संताप व्यक्त हा झालाच. हे सर्व शांतपणे पाहणाऱ्या नंद व यशोदेची मात्र मोठी पंचाईतच झाली. त्यातल्या त्यात नंदाने पुढे होऊन अनयाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु तेथे क्षणभरही न थांबता आणि कोणाकडेही न बघता अनयाने राधेला जवळ जवळ ओढतच आपल्याबरोबर चालविले आणि आपल्या घराकडे वेगाने निघाला.

अशा परिस्थितीत काय करावे हे नंदालाही थोडा वेळ सुचेचना. परंतु आपल्या मनाची शांती ढळू न देता नंद कृष्णाच्या जवळ आला आणि त्याचा हात आपल्या हातात घेऊन यशोदा व बलराम यांच्यासह तोही गोकुळातील आपल्या राजवाड्याकडे चालू लागला. वाटेमध्ये कोणीच कोणाशी बोलत नव्हते, परंतु त्यांचे न बोलणे हेच केवढेतरी बोलत होते. नंदाच्या मुखावरील नाराजी, यशोदेला वाटत असलेली काळजी आणि बलरामाला आलेली गंभीरता ही त्यांना एकमेकांना न बोलताही निश्चितच जाणवत होती. कृष्ण मात्र शांत मनाने व स्वस्थ चित्ताने त्या सर्वांबरोबर चालत राहिला. कुठल्याही प्रसंगात न अडकता, घडलेल्या प्रसंगातील अनुभवलेल्या आनंदात रममाण होऊन राहण्याच्या त्याच्या स्वभावानुसार कृष्णाचे मुख मात्र अत्यंत प्रसन्न दिसत होते. पण त्याच्याकडे आता कुणाचेच लक्ष नव्हते.

मग गोकुळातील बाकीचीही इतर सर्व मंडळी पर्वताच्या माथ्यावरून हळुहळू खाली उतरू लागली. पायथ्याशी आल्यावर आपल्या गाईगुरांना बरोबर घेऊन प्रत्येकजण आपापल्या घराची वाट चालू लागला. घडलेल्या प्रसंगाविषयीची त्यांची आपापसात कुजबुज अर्थातच चालूच होती. राधा व कृष्ण यांचे सर्वांच्या देखत असे एकत्र उभे राहणे काहींना खटकले होते, तर काहींना त्यात तेवढेसे काही गैर वाटले नाही. 'कृष्णाच्या मुरलीच्या नादाने राधा प्रभावित झाल्यामुळे तिच्याकडून असे वागणे अभावितपणे घडले असावे आणि कृष्णही त्याच्याच नादात असल्यामुळे त्याच्याही ते तेवढेसे लक्षात आले नसावे' अशीही कित्येकांनी आपल्या मनाची समजूत करून घेतली आणि दुसऱ्यांचीही तशीच समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु बरेच जण मात्र संपूर्ण दिवसभराचा झालेला कार्यक्रमच आठवत होते. झालेले खेळ, स्पर्धा, सहभोजनाचा घेतलेला मनमुराद रसास्वाद, संध्याकाळचे गायन नृत्याचे कार्यक्रम आणि त्या सर्वांचा झालेला कळस म्हणजे कृष्णाचे सुमधुर व सुस्वर असे मुरलीवादन आणि त्या नादावर सर्वांनीच उत्स्फूर्तपणे धरलेला फेर, या सर्वांच्या सुखद व गोड स्मृती अनेकांच्या मनात अजूनही रेंगाळत होत्या. थकलेल्या देहाने पण उत्साहित व टवटवीत मनाने सर्वजण आपापल्या घरांकडे परतले, ते मात्र दरवर्षी गोवर्धन पूजनाचा असाच उत्सव साजरा करावयाचा अशा निश्चयानेच!''

नारदाच्या मुखातून कृष्णलीलांचे श्रवण करताना लक्ष्मी अगदी तल्लीन होऊन राहिली होती. त्या कृष्णलीलांमधून प्रगटणारे कृष्णप्रेमच तिच्या मनात घर करून राहिले होते. एकीएक तो प्रेमभावच लक्ष्मीच्या मनात खेळत होता. त्यामुळे बोलता बोलता नारद जेव्हा थोडासा थांबल्यासारखा झाला, तेव्हा न राहवून लक्ष्मी उत्स्फूर्तपणे नारदाला म्हणाली,

''हे नारदा, तुझी खरेच कमाल आहे. आधी तू राधा व कृष्ण यांच्या प्रेमभक्तीच्या संबंधाचे वर्णन करण्यात एवढा रंगून राहिला होतास, की तुला दुसरा काही विषय सुचतच नव्हता. मग तो विषय महत्प्रयासाने बाजूला करून 'इंद्र देवतेच्या ऐवजी गोवर्धन पर्वताचेच पावसाच्या दृष्टीने असलेले महत्त्व आणि त्यासाठी गोवर्धनाचीच पूजा करण्याचा कृष्णाचा मानस व निश्चय, त्यानंतर कृष्णानेच स्वतः पुढाकार घेऊन साजरा केलेला गोवर्धन पूजेचा सोहळा व उत्सव' या सर्वांचे समग्र व सुरस वर्णन तू एवढा समरस होऊन करीत होतास, परंतु शेवटी त्याच्यातही राधा व कृष्ण यांचा विषय आलाच की! मला तर पक्की खात्री आहे की राधा व कृष्ण यांच्या प्रेमभक्तिभावाचा विषय तुझ्या मनातून काही गेलेलाच नव्हता. कारण तुझ्या

ठिकाणी तो भाव निश्चितपणे अगदी खोलवर आहे. त्यामुळेच वेगळ्या वेगळ्या प्रसंगाचे वर्णन जरी तू केलेस, तरी त्यातील प्रत्येक प्रसंगातून राधा व कृष्ण यांच्या विषयीचा भाव तुझ्या ठिकाणी वारंवार उचंबळून वर येतो आणि त्यांच्या वर्णनात तू पुन्हा रंगून राहतोस. एवढा राधा व कृष्ण यांचा प्रभाव तुझ्यावरती झालेला आहे. खरे की नाही?

बरे, राधा व कृष्ण यांचे संबंध तरी सरळ व सोपे आहेत का? तर तसेही नाही. त्यांच्या जीवनातही सारखी सारखी अवघड वळणे ही येतच आहेत आणि प्रत्येक वळणावर त्यांच्या प्रेमाची तर कसोटीच लागत आहे. त्यावर त्यांनी मात केली असणारच हे जरी खरे असले तरी तो पर्यंतचा काळ हा राधा व कृष्ण यांना आणि विशेषतः राधेला हा निश्चितच अत्यंत कठीण गेला असणार आणि मला तर तिचीच काळजी जास्त वाटत आहे. कारण या सर्वातून निभावून न्यायला जरी कृष्ण समर्थ असला, तरी शेवटी त्यातून प्रत्यक्ष निभावून जायचे होते राधेलाच. अर्थात राधासुद्धा निश्चितच जराही कमी पडली नसणार याची मला खात्री आहे. परंतु ते सर्व तुझ्या मुखातून श्रवण करण्याची मला केवळ अधीरताच नव्हे, तर मनाला एक प्रकारची हुरहुरही वाटत आहे. गोवर्धन पर्वताची पूजा झाल्यानंतर त्याची परिणती पुढे काय व कशात झाली हे ऐकण्याची सुद्धा उत्सुकता माझ्या ठिकाणी आहेच. परंतु त्याला स्थान थोडेसे दुय्यमच आहे. तेव्हा हे नारदा, तूच आता या माझ्या मनाचे पूर्ण समाधान करू शकशील असा माझा विश्वास आहे. तेव्हा तू आता अजिबात इकडे तिकडे वर्णनात वेळ न घालवता पुढील कथाभाग वर्णन करण्यास सुरुवात कर बघू. मला तर आता अगदी राहवत नाही.''

लक्ष्मीच्या बोलण्यावर स्मितहास्य करून नारद बोलू लागला. ''अगं लक्ष्मी, मी कुठे वेळ घालवतोय? प्रश्न विचारून तूच तर वेळ घेत आहेस. अर्थात तुझ्या प्रश्नांमुळे माझ्या वर्णनाला अधिक गती मिळते आणि विषय प्रतिपादनालाही अधिक सखोलता प्राप्त होते हेही खरेच आहे. तुझे हे म्हणणे मात्र अगदी खरे आहे, की कृष्णचरित्रातील कुठलाही प्रसंग वर्णन करताना राधा व कृष्ण यांच्या विषयीचा भावच माझ्या ठिकाणी उचंबळून येत आहे. त्याचे कारण अगदी स्पष्ट आहे, की तो भक्तिभाव हा माझा अनुभवच आहे. माझ्या अंतःकरणाचा तो स्थायीभावच होऊन राहिलेला आहे. त्यामुळे राधा व कृष्ण यांच्या संबंधातील प्रेमभावाचा थोडासा जरी स्पर्श माझ्या मनाला सहजपणे झाला तरी माझ्या अंतरातील दाटलेला भक्तिभावच उचंबळून येतो. हे लक्ष्मी, आणखीन एक गोष्ट लक्षात ठेव, की कृष्णाच्या गोकुळातील चरित्रात राधा व कृष्ण यांचे प्रेमभक्तिभावाचे संबंध हेच मुख्य आहेत. त्यामुळे गोकुळातील कृष्णचरित्र वर्णनात त्यांचे प्रेमसंबंध हेच वर्णनाचे मुख्य सूत्र असणार. त्या सूत्राभोवतीच इतर कथाप्रसंग गुंफले जाणार हे तर अगदी साहजिकच आहे.

हे लक्ष्मी, एक मुख्य गोष्ट तू नीटपणे व कायमची लक्षात ठेव, ती म्हणजे राधा व कृष्ण यांच्यातील हा प्रसंग त्यांच्यातील इतर प्रसंगांप्रमाणेच उत्स्फूर्तपणे घडलेला होता. त्यामध्ये पूर्वनियोजन असे अजिबात नव्हते. राधा ही कृष्णाविषयीच्या भक्तिभावाने अधिकाधिक युक्त होत चालली होती. त्यामुळे जेव्हा जेव्हा तिला कृष्णाचे माहात्म्य विशेषत्वाने प्रगटलेले जाणवत असे, तेव्हा तेव्हा तिच्या ठिकाणी निर्माण झालेले कृष्णप्रेम उचंबळून येत असे आणि ते प्रेम प्रकर्षाने व्यक्त होत असे. गोवर्धन पर्वतावरील प्रसंगात नेमके तेच घडले. कृष्णाच्या मुरली वादनातून प्रगटणारे त्याचे

अंतःकरण व माहात्म्य राधेला विशेषत्वाने जाणवले आणि मग मात्र तिची ती राहिली नाही. कृष्णप्रेमाने आधीच युक्त असलेल्या राधेच्या मनात कृष्णाची जवळीकता साधण्याची आत्यंतिक ओढ निर्माण झाली आणि मग तिला स्वस्थ बसणे शक्यच झाले नाही. कृष्णाच्या जवळ तात्काळ जाऊन पोहोचलेल्या तिच्या मनाने मग तिच्या देहालाही कृष्णाजवळ केव्हा नेऊन ठेवले हे तिचे तिलाच कळले नाही.

आता स्वतः स्वतःमध्ये पूर्णपणे रमलेल्या कृष्णाला बाह्यांगाने जर कशाची जरुरी असली तर ती फक्त भक्तिभावाचीच होती. त्यामुळे राधेच्या भक्तिभावाचा स्पर्श झाल्यावर तो लगेचच देहभानावर आला आणि राधेच्या भक्तिभावाचा त्याने लागलीच स्वीकारही केला. कृष्णाने चरणाशी आलेल्या राधेला उचलून आपल्याजवळ घेतले आणि राधा व कृष्ण या उभयतांनी अंतर्बाह्य ऐक्याचा अनुभव घेतला. थोड्यावेळाने बाह्यांगाची जवळीकता दूर झाली. परंतु त्यांचे अंतरात साधलेले ऐक्य मात्र तसेच कायम राहिले. त्यांच्या बाह्य कृतीवर कोणी टीका केली वा निंदा केली, कोणी एखादे वेळेस कौतुकही केले असेल, पण तरीही राधा व कृष्ण यांचे अंतरात झालेले ऐक्य अबाधित राहिले.

यातून निर्माण झालेल्या सर्व बाह्य परिणामातून निभावून जाण्यास कृष्ण जसा त्याच्या स्वानुभवाच्या अवस्थेमुळे सहज समर्थ होता, अगदी तशीच राधाही तिच्या भक्तिभावाच्या अवस्थेने सर्व निभावून नेण्यास तेवढीच सबळ होती. अर्थातच घडलेल्या प्रसंगामुळे राधेला टीकेला व निंदेला जास्त तोंड द्यावे लागले आणि ते तर अपेक्षितच होते. कारण मुळात आधी ती एक स्त्री होती आणि त्यातूनही एक विवाहित स्त्री होती. त्यामुळे सामाजिक बंधने राधेवर जास्त होती. पण मनात कृष्णप्रेमाने व माहात्म्याने युक्त असलेली राधा सर्व बाह्य बंधनापासून मनातून मुक्त होती. त्यामुळे तिच्या ठिकाणी कोणत्याही तऱ्हेची कमीपणाची वा अपराधीपणाची भावना अजिबात नव्हती. परंतु त्याचबरोबर तिला कृष्णाच्या नित्य सहवासातून व त्याच्याशी अनेकवेळा झालेल्या संवादातून विवेक मात्र निश्चितपणे प्राप्त झालेला होता. त्या विवेकाच्या आधाराने तिने अनय व म्हाळसेसह सर्वांना व सर्वाला युक्तीने तोंड दिले. कधी बोलून वा न बोलून, तर कधी थोडेसे रडून वा हसण्यावारी नेऊन, तर कधी आपली चूक झाली आहे असे कबूल करून वा पुन्हा अशी चूक आपल्याकडून घडणार नाही याची योग्य ती काळजी घेण्याचे आश्वासन देऊन, राधा तिच्या भावाने मात्र निश्चल व खंबीर राहिली. त्यामध्ये जराही कंप निर्माण होऊच शकला नाही. त्यामुळे बाह्यांगाने वेगळ्या वेगळ्या स्वभावांच्या व्यक्तींशी तशा तशा वेगळेपणाने राधा अगदी मोकळेपणाने वागत राहिली आणि त्या सर्वाची गंमत वाटून तिचा आनंद मात्र ती अनुभवीत राहिली.

हे लक्ष्मी, सर्वात महत्त्वाची गोष्ट ही होती, की राधा व कृष्ण यांच्या संबंधात एवढी सहजता आलेली होती की कुठल्याही बाह्य गोष्टींचा व प्रसंगाचा परिणाम त्यांच्या संबंधावर होतच नसे. कशामुळे तरी कोणत्या तरी प्रकारचा ताण त्यांच्या संबंधावर आला आहे असे कधी घडतच नसे. त्यामुळे कुठल्याही प्रसंगात आपल्या प्रेमाची काही कसोटी वगैरे लागत आहे असे मुद्दामहून वेगळेपणाने कधी त्यांना जाणवलेच नाही. जीवनात जेव्हा जेव्हा वळणे आली, तेव्हा तेव्हा त्यांनी ती वळणे सहजपणे घेतली आणि ते पुढे जात राहिले. त्यात अवघड असे काही त्यांना कधी जाणवलेच नाही. असो.



राधेप्रमाणे कृष्णाच्याही घरी घडलेल्या प्रसंगाचा थोडासा बोलबाला झालाच. नंद, यशोदा व बलरामाने सुद्धा आपापली मते व नाराजीही व्यक्त केली. परंतु कृष्णाने जेव्हा विचारले की, 'मी बासरी वाजवीत असताना राधा त्या नादात माझ्या जवळ आली कारण तिला माझे कौतुक वाटले आणि तिने ते तिच्या परीने व्यक्त केले. मी माझ्या परीने तिने केलेल्या कौतुकाला दाद दिली, यात निश्चित माझे व राधेचे काय चुकले?' तेव्हा या कृष्णाच्या प्रश्नाचेही निश्चित उत्तर कोणाला देता आले नाही. परंतु 'काळजी घ्यावी, कोणाची मने दुखवू नयेत, कोणाच्या मनात गैरसमज निर्माण होतील असे आपले वागणे नसावे' असे जुजबी सल्ले सर्वांनीच कृष्णाला दिले आणि कृष्णानेही लगेचच ते सर्व मान्य केले. कारण कृष्णाकडून त्या सर्व गोष्टी सहजपणे घडतच होत्या याची खात्री त्याला पक्केपणाने होती.

*****

## मुसळधार वृष्टीचे संकट

**हे** लक्ष्मी, पुढे काळाच्या ओघात प्रसंगच असा घडून आला, की राधा व कृष्ण यांच्या संबंधाची चर्चा ही मागेच पडली. त्याचे असे झाले, की गोकुळामध्ये अचानक पावसाला सुरुवात झाली. खरे तर ते नेहमीचे पावसाचे दिवस नव्हतेच. त्यामुळे सुरुवातीला सर्वांनाच त्या अवेळी आलेल्या पावसाचे नवलच वाटले. परंतु ती नवलाई फार काळ टिकली नाही. पाऊस थांबण्याचे काहीच चिन्ह तर दिसेनाच, उलट त्याचा जोर हळुहळू वाढतच राहिला. एक दिवस झाला, दोन दिवस झाले, पण पावसाचा जोर जराही कमी न होता एवढा वाढला की सर्वांच्याच ठिकाणी काळजी निर्माण झाली. यमुना नदीला पूर येऊन तो एवढा वाढला, की तिचे पाणी हळुहळू गोकुळाच्या दिशेने येऊ लागले. रस्त्या रस्त्यावरती पाणी वाहू लागले, तर काही ठिकाणी पाणी साचूही लागले. आता मात्र काळजीचे रूपांतर भीतीत होऊ लागले. गोकुळातील वयोवृद्ध मंडळी 'असा पाऊस उभ्या हयातीत पाहिला नाही' असे तर म्हणू लागलीच, परंतु त्याच बरोबर हा 'इंद्र देवतेचाच कोप झालेला आहे' अशी खात्रीच त्यांना वाटू लागली. इंद्र देवतेला शांत केल्याशिवाय गोकुळवासीयांची या संकटातून सुटका होणे शक्यच नाही, त्यासाठी काहीतरी त्वरित उपाय योजना करणे आवश्यक आहे अशा ठाम निश्चयाने गोकुळातील काही वृद्ध व अनुभवी मंडळी त्या मुसळधार पावसातही कशी बशी वाट काढीत नंदाच्या राजवाड्यावर जाऊन पोहोचली.

नंदसुद्धा अतिशय काळजीत पडलेला होता. त्यालाही चिंता लागून राहिलेली होती. त्याच्यावर सर्व गोकुळवासीयांचीच जबाबदारी होती. परंतु निश्चित काय उपाय योजना करावी हे त्यालाही सुचत नव्हते. त्यातूनच सर्व गोकुळवासीयांचा रोष त्याच्यावरच झालेला होता. खरे तर त्यांचा मुख्य रोख कृष्णावरच होता. 'या कृष्णाच्या नादी लागून आपण इंद्राचा कोप आपल्यावरती ओढवून घेतला. नंदाने सुद्धा कृष्णाच्या शहाणपणाला अवाजवी किंमत दिली आणि आता त्यामुळे सर्व गोकुळालाच संकटात पाडले आहे' अशा सर्वांच्या टीकेला तोंड देणे नंदालाही कठीण होऊ लागले. शेवटी ज्याच्यामुळे संकट आले आहे, त्या कृष्णालाच त्याचा जाब विचारावा आणि काय उपाय करावा तेही त्यालाच विचारावे या हेतूने नंदाने कृष्णाला तेथे बोलावून घेतले. कृष्णाचे आगमन झाल्यावर सर्वांच्या नजरेतील भाव कृष्णाने लगेचच ओळखले. आलेल्या संकटाच्या विचाराने तोही काळजीतच होता. त्यामुळे कृष्णाला कोणी काही विचारण्याच्या आधीच त्याने बोलावयास सुरुवात केली.

''हे गोकुळवासीयांनो, गोकुळावर येत असलेल्या संकटाची मला पूर्ण जाणीव आहे. त्याची काळजी मलाही तुमच्या एवढीच आहे. परंतु इंद्रदेवतेचा कोप झाल्यामुळे हा मुसळधार पाऊस पडत आहे ही जी तुमची शंका आहे, ती मात्र अत्यंत चुकीची आहे. ती तुमच्या दुबळ्या मनोवृत्तीचीच द्योतक आहे. आता अवेळी पावसाला सुरुवात झालेली आहे आणि तो थांबण्याची चिन्हे अजूनही दिसत नाहीत हे खरेच आहे. पण ही केवळ एक नैसर्गिक घटना आहे. निसर्गात काही कारणांमुळे असंतुलन निर्माण झालेले असल्यामुळेच हा असा अवेळी पाऊस पडत असणार हे जाणून घ्या आणि नीट

लक्षातही ठेवा. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे हा प्रसंग का निर्माण झाला याची चर्चा वा वाद करीत बसण्याची ही वेळच नाही हे आधी लक्षात घ्या. येणाऱ्या संकटाचे गांभीर्य जाणून घेऊन त्यावर आधी त्वरित उपाय योजना करणे आवश्यक आहे. तेव्हा आधी आपण त्या मार्गाला लागूया.

ज्या गोवर्धनाची पूजा केल्यामुळे आपल्यावर हे संकट ओढवलेले आहे अशी जी तुमची चुकीची समजूत झालेली आहे, तो गोवर्धनच आता आपल्याला आधार देणारा ठरणार आहे. त्याच्याच आश्रयाला आता आपल्याला जायचे आहे. गाईगुरे राखण्याच्या व खेळण्याच्या निमित्ताने माझे अनेकदा या गोवर्धन पर्वतावर जाणे घडलेले आहे. त्यावेळेपासून माझ्या लक्षात आलेले आहे की या गोवर्धन पर्वताच्या पोटात अनेक मोठ्या मोठ्या गुहा दडलेल्या आहेत. त्यांच्या प्रवेशद्वारांवर मोठ्या आकाराचे दगड व शिळा बसवलेल्या आहेत म्हणून आपल्या दृष्टीला त्या पटकन येत नाहीत. पण तशा गुहा तेथे आहेत याची मला पक्की खात्री आहे. माझ्या माहितीप्रमाणे तशा गुहा शोधून काढणे हे एवढे कठीण जाणार नाही.

तेव्हा आता जास्त विचार करीत बसून वेळ वाया न घालवता आपण त्वरित कार्यवाही करावयास सुरुवात करूया. मी व माझे सवंगडी पुढे जातो आणि गोवर्धन पर्वतावरील त्या गुहांचा शोध घेतो. तुम्ही सर्वांनी आमच्या मागून जेवढ्या लवकरात लवकर येता येईल तेवढ्या वेगाने, पण काळजीपूर्वक गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशी येण्याचे करावे. तेथे आम्ही तुमची वाट पहात आहोत. वृद्ध मंडळी, स्त्रिया व लहान मुले यांना गावातील सर्व तरुण मंडळींनी स्वतः मदत करून त्यांची योग्य ती काळजी घ्यावी आणि त्यांना गोवर्धन पर्वताजवळ घेऊन यावे. बरोबर कोणतेही सामान घेण्याची आवश्यकता नाही. त्याचबरोबर सर्व गाईगुरांना आणण्यासही विसरू नका. त्या मुक्या प्राण्यांना आपल्याशिवाय दुसऱ्या कोणाचाही आधार नाही. त्यांना येथे एकटे ठेवून मृत्यूच्या हवाली करणे हे तर अमानुषच ठरेल. कोणीही धांदल वा गडबड करून स्वतःच आपल्या जिवाचा धोका वाढवू नका. कोणत्याही प्रकारची घबराट निर्माण होऊ देऊ नका. परमेश्वर आपल्या पाठीशी आहे याची खात्री बाळगा. आलेल्या संकटातून तोच आपल्याला रक्षण देईल अशी पूर्ण श्रद्धा ठेवा. आता जराही वेळ न दवडता येथून निघा. मीही ताबडतोब निघून पुढील कार्याला लागत आहे.''

कृष्णाचे बोलणे ऐकून सर्वांच्या मनातील निराशा दूर झाली आणि मनाच्या ठायी पुन्हा उत्साह निर्माण झाला. त्याच्या आत्मविश्वासपूर्वक बोलण्याने नंदासह सर्वच जण प्रभावित झाले. आलेल्या संकटातून काहीतरी मार्ग दिसत असल्याची खात्री त्यांना वाटू लागली. गोवर्धन पर्वतावर खऱ्याच अशा गुहा असतील काय, अशी वाटत असलेली शंका व्यक्त करायलाही आता कोणाला वेळ नव्हता. परमेश्वरावरती श्रद्धा ठेवून, पण त्यापेक्षाही जास्त कृष्णावर विश्वास ठेवून सर्वजण नंदाच्या वाड्यावरून त्वरित निघाले. कृष्णाच्या निश्चयात्मक बोलण्याचे, त्याच्या स्पष्ट विचारसरणीचे आणि त्याच्या त्वरित कार्यवाही करण्याच्या वृत्तीचे नंदाला अत्यंत कौतुक तर वाटलेच, परंतु कृष्णाबद्दल त्याला सार्थ अभिमानही वाटला.

इकडे कृष्ण आपल्या काही निवडक सवंगड्यांना बरोबर घेऊन त्वरित, पण मोठ्या प्रयत्नपूर्वक गोवर्धन पर्वताशी येऊन पोहोचला देखील. कारण वेळ अत्यंत कमीच होता. कृष्णाने आपल्या शोधक नजरेने पर्वताचे निरीक्षण करायला सुरुवात केली असता पायथ्याजवळच एक मोठी शिळा आढळली. आपल्या आंतरिक प्रेरणेला प्रमाण मानून कृष्णाने सर्व सवंगड्यांचे साहाय्य घेऊन ती शिळा मोठ्या कष्टाने हलवली आणि त्यांना तेथे एक द्वार आढळले. त्या द्वारातून सर्वांसह जरा आत जाऊन कृष्णाने पाहिले मात्र, तेथे त्यांना केवढी तरी प्रचंड गुहा आढळली. सर्वांना आधी आश्चर्याचा मोठा धक्का बसला आणि मग केवढा तरी आनंद झाला. कृष्ण सर्वांना घेऊन लागलीच त्या गुहेत शिरला. आतमध्ये इतस्ततः पाला पाचोळा, धूळ व गवतही पसरलेले दिसत होते. आतील दगडांच्या भिंतीवरून पाण्याचे झरेही वाहून खाली येत होते आणि जमिनीत मुरत होते. हीच जागा सर्व गोकुळवासीयांना अगदी त्यांच्या गाईगुरांसह राहण्यास योग्य आहे याची त्याला खात्री पटली. त्याने सर्वांना सूचना देऊन आतील जागा जेवढी जमेल तेवढी साफसूफ करून घेतली.

बाहेर पावसाचा जोर अजूनही कायम होता. गोकुळातून तेवढ्यातच पावसाशी मुकाबला करीत गोकुळातील मंडळी हळुहळू गोवर्धनाच्या जवळ कशीबशी येऊन पोहोचू लागली. हतबल झालेल्या सर्वांना कृष्णाने आपल्या हाताने सावरून घेतले आणि गुहेत आणले. सर्वात पहिली कोणती गोष्ट कृष्णाने केली असेल, तर ती म्हणजे त्याने गुहेतील पाला पाचोळा एकत्र जमवला आणि त्याच्या ठिकठिकाणी शेकोट्या पेटवल्या. त्यामुळे त्या गुहेत थोडासा प्रकाश पसरला आणि मुख्य म्हणजे मुसळधार पावसात भिजून ओलेचिंब झालेल्यांना ऊब मिळाली. ही सोय कृष्ण गाईगुरांनाही करून द्यायला विसरला नाही. त्यांची व्यवस्था कृष्णाने बाजूला एका कोपऱ्यात केली. मिळालेल्या उबेमुळे सर्वांच्याच शरीरात पुन्हा धुगधुगी निर्माण झाली. त्यांचे भयही हळुहळू नाहीसे झाले. परंतु आता पुढे काय होणार याची चिंता मात्र अजूनही साहजिकपणे कायम होती आणि ती त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसतही होती.

कृष्ण मात्र शांत राहूनही कार्यरत दिसत होता. सर्वांची नीट व्यवस्था लागेपर्यंत त्याला उसंत नव्हती. त्या गडबडीत व गोंधळात तो मोठ्या कौशल्याने व वेगाने वावरत होता. सर्वांशी मोकळेपणाने बोलत होता आणि सर्वांना हक्काने समजावूनही सांगत होता. राधा व अनय यांच्याशीसुद्धा तो तेवढ्याच मोकळेपणाने बोलून त्यांची हक्काने मदतही घेत होता. कारण कृष्णाचे मनच मुळात मोकळे होते. सर्वांना असे वाटत असे, की कृष्णाचा तो स्वभावच आहे. परंतु फक्त राधाच जाणून होती, की कृष्णाचे ते माहात्म्य आहे. त्यामुळे कृष्णाच्या मदतीला ती सहजपणाने पुढे सरसावली. अनयाच्या मनातील कृष्णाविषयीचा राग मात्र कायम होता. पण तरीही परिस्थितीचे गांभीर्य ओळखून अनयाने तो राग मनातून तेवढा वेळ तरी बाजूला सारला आणि कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे वागून तोही कृष्णाला मदत करू लागला. हळुहळू सर्वजण स्थिरावले. काहीजणांनी तेवढ्या धावपळीतही हाताला लागतील ते पदार्थ किंवा फळफळावळ बरोबर आणली होती. त्यातील खायचे पदार्थ तर पाण्यात भिजल्यामुळे खराबच झालेले होते. कृष्णाने ते सर्व पदार्थ गाईगुरांना खाण्यास घातले. परंतु सर्व फळे मात्र एकत्र केली आणि त्यांचे सर्वांना थोडे थोडे वाटप केले. पावसाचा जोर आणखीन किती काळ टिकला

असता याची काहीच शाश्वती नव्हती.  तेव्हा जास्तीत जास्त काळजी घेणे हे आवश्यकच होते आणि सर्वजण हे जाणूनही होते.  त्यामुळे सर्वांनीच या बाबतीत सहकार्य केले आणि माफक फलाहार घेतला.

सर्वांना व्यवस्थित फळे मिळाली की नाही हे स्वतः जातीने पाहणाऱ्या कृष्णाला राधेने पाहिले मात्र आणि मग तिलाही राहवले नाही.  आपल्या हातात घेतलेले एक फळ तिने कृष्णाच्या पुढे धरले आणि ते खाण्याची कृष्णाला विनंती केली.  कृष्णाची अत्यंत प्रेमाने दखल घेणाऱ्या राधेला पाहून कृष्णालाही आनंद झाला.  त्याने राधेने देऊ केलेल्या फळातील थोडा भाग आपल्या मुखाने सेवन केला आणि बाकीचा भाग राधेच्या मुखात सारला.  म्हटले तर प्रेमाचा एक क्षण, पण तेवढ्यातही राधा व कृष्ण यांनी केवढ्या तरी आनंदाचा अनुभव घेतला.  सर्वजण भूक लागलेली असल्यामुळे त्यांना मिळालेली फळे खाण्यात एवढे गर्क होते, की राधा व कृष्ण यांच्यात घडलेला हा प्रसंग जास्त कोणाच्याच लक्षात आला नाही आणि ज्यांच्या तो लक्षात आला त्यांनी त्याकडे जास्त लक्षच दिले नाही.

परंतु लक्ष्मी, तुझ्या ही गोष्ट सहजपणे लक्षात येईल याची मला खात्री वाटते, की राधा व कृष्ण यांचे प्रेम किती तरल व सूक्ष्म होते.  किंबहुना खऱ्या प्रेमाचेच हे लक्षण आहे की त्या प्रेमाचा अनुभव अगदी साध्या साध्या व छोट्या छोट्या कृतीतूनही घेता येता.  त्यासाठी काही फार मोठ्या गोष्टी कराव्या लागतात असे मुळीच नाही.  केव्हा केव्हा केवळ एखाद्या प्रेमळ दृष्टीक्षेपानेही, एखाद्या स्मितहास्यानेही किंवा एखाद्या हळुवार स्पर्शानेही प्रेमाचा अनुभव घेता येतो.  हेच तर खऱ्या प्रेमाचे माहात्म्य आहे.  पण असे प्रेम केवळ ईश्वरी अधिष्ठानामुळेच संभवते हेही खरे आहे.  असे ईश्वरी अधिष्ठान कृष्णाच्या ठिकाणी सहजपणे होते आणि त्याची जाणीव राधेच्या ठिकाणी पूर्णपणे झालेली होती.  म्हणूनच राधा व कृष्ण यांच्यामध्ये अशा प्रेमाचे संबंध शक्य झाले.  त्या प्रेमाचा अनुभव त्यांच्याकडून अगदी सहजपणे घेतला जात असे आणि त्याची जाणीव फक्त त्यांनाच होत असे.

थोडासा का होईना पण फलाहार झाल्यामुळे सर्वांची पोटे जशी शांत झाली तशी त्यांची मनेही शांत झाली आणि थकलेली त्यांची शरीरे विश्रांतीसाठी हळुहळू मिळेल त्या ठिकाणी लवंडू लागली.  त्यांचा डोळ्याला डोळा केव्हा लागला हे त्यांचे त्यांनाही कळले नाही.  कृष्णाने आग्रहपूर्वक नंद व यशोदा यांना विश्रांती घ्यावयास लावली.  पेंद्या तर कधीच डाराडूर झाला होता.  फक्त कृष्ण हा बलरामासह जागा राहून आणि सर्वकडे संचार करीत पहारा देत होता.  त्याचे काही सवंगडीही पाळी पाळीने जागे राहून कृष्णाला साथ देत होते.  अनयाने सुद्धा कृष्णाची बराच वेळ सोबत केली आणि राधा तर कृष्णाला सोडून रहायला तयारच नव्हती.  शेवटी कृष्णानेच राधेची समजूत घातली आणि तिला अनयासह थोडावेळ तरी विश्रांती घेण्यास भागच पाडले.

असा किती काळ गेला माहीत नाही.  कारण तेथे वेळेचे भानच उरले नसल्यामुळे वेळ कळायला काही मार्गच नव्हता.  परंतु सर्वांना काही काळानंतर जी हळुहळू जाग आली ती मात्र बासरीच्या मंजूळ व हळुवार सुरांनीच.  थकलेल्या शरीरातील चैतन्य पुन्हा जागे झाल्यासारखे झाले.  सर्वांनीच आपले डोळे उघडून पाहिले, तर त्यांना एका पायावर पाय ठेवून

आणि ओठात धरलेल्या मुरलीच्या नादात धुंद झालेल्या कृष्णमूर्तीचे दर्शन झाले. गोकुळवासीयांसाठी एवढी सुंदर सकाळ प्रथमच उगवली असेल. कृष्णाच्या दर्शनाने व मुरलीच्या मंगल सुरांनी सर्वांचीच मने पुन्हा उल्हसित झाली. त्या मनोहारी व रमणीय कृष्णरूपाला पाहून भारावलेली राधा सहजपणे आपल्या जागेवरून उठून कृष्णाजवळ आली आणि कृष्णाच्या चरणांना वंदन करून तेथेच बिलगून राहिली. थोड्यावेळाने कृष्णही देहभानावर आला आणि त्याचे मुरलीवादनही आपसूकच थांबले. आपले नेत्र उघडून त्याने सर्वांकडे पाहून सुस्मित केले असता सर्वांचेच चेहरे आनंदाने फुलून राहिले. त्या सर्वांना प्रेमाने न्याहाळीत कृष्ण बोलू लागला.

''हे गोकुळवासीयांनो, सर्व गोकुळावर निसर्गाचे संतुलन बिघडल्यामुळे मोठेच संकट आलेले होते. परंतु त्यातही आपल्याला या गोवर्धन पर्वताचा आश्रय मिळाला आणि आपल्याला या संकटातूनही रक्षण मिळाले ही आपल्यावर असलेली परमेश्वराची मोठी कृपाच होय. त्याचीच महती आपण लक्षात ठेवावयास हवी आणि त्याचीच आळवणी आपण नेहमीच करावयास हवी. केवळ संकटातच त्याची आठवण न करता त्याचे स्मरण आपण सदासर्वकाळच ठेवावयास हवे. अजूनही आपल्यावरचे संकट पूर्णपणे टळलेलेच नाही. बाहेरील पावसाचा जोर तसाच कायम आहे. तो केव्हा थांबेल याचा भरवसा नाही. परंतु आपल्याला सर्वांना मिळूनच या संकटाचा सामना करावयाचा आहे हे लक्षात ठेवा. आपण सर्वजण एकत्र तर आहोतच, पण आपण एकोप्यानेही राहू तर या संकटातून सहजपणे व यशस्वीपणे निभावून जाऊ याची पक्की खात्री बाळगा. हा एकोपा राखण्यासाठी व तो टिकण्यासाठी आपापसातील सर्व राग, लोभ, द्वेष, मत्सर हे आपल्याला विसरणे अत्यंत आवश्यक आहे. या सर्वांचे विस्मरण तेव्हाच होईल जेव्हा आपण सर्व त्या ईश्वराची लेकरे आहोत याचे स्मरण आपल्याला राहील. तसे स्मरण आपल्या ठिकाणी कायम रहावे म्हणून आता सर्वजण मिळून ईश्वराची स्तोत्रे व प्रार्थना म्हणूया आणि त्या ईश्वरालाच आळवूया.''

असे म्हणता म्हणताच कृष्णाने स्वतःच त्याला यशोदामातेने शिकवलेली व तो नेहमी घरी म्हणत असलेली ईश्वराची प्रार्थना आपल्या धीर गंभीर सुरात म्हणावयास सुरुवात केली. कृष्णाच्या आवाजाने मंत्रमुग्ध झालेले गोकुळवासी एकेक करून हळुहळू त्याच्या सुरात सूर मिळवून त्याला साथ देऊ लागले. सर्वांच्या एका सुरातील व गंभीर आवाजाने सर्व वातावरण भरून गेले होते आणि एका अत्यंत पवित्र व मंगलमय भावाने सर्वचजण भारून गेले होते. सर्वांच्याच मुखावर प्रसन्नतेचा भाव झळकत होता.

आहे त्या परिस्थितीत सर्वांनी आपली आन्हिके उरकली आणि त्यानंतर कृष्णाने आपले ध्यान गाईगुरांकडे वळवले. त्याने प्रत्येक जनावराकडे जाऊन त्यांच्या पाठीवर थोपटले आणि त्यांच्याही मस्तकावरून प्रेमाने हात फिरवला. कृष्णाच्या स्पर्शातील प्रेम व आपलेपणा त्या गुरांनाही जाणवला असावा, कारण त्यांनीही आपली मान कृष्णाकडे वळवली आणि ती कृष्णाला डोळे भरून पाहू लागली. त्यांच्यातील वात्सल्य भाव जागा झालेला पाहून कृष्णालाही आनंद झाला आणि एकेका गाईच्या आचळाखाली बसून कृष्ण स्वतः आपल्या हाताने दूध काढू लागला. कृष्णाचा हस्तस्पर्श झाला मात्र, गाईंचा

वात्सल्य भाव दुधाच्या रूपाने अनेक धारांनी प्रगट होऊ लागला. कृष्णाने ते दूध आधी त्यांच्या वासरांना दिले आणि नंतर पाने जमवून केलेल्या द्रोणातून ते दूध भरून ठेवले. एकेक द्रोण प्रत्येकाला देऊन सर्वांना दुधाचे प्राशन करविले.

दुग्ध सेवनाने सर्वांच्याच अंगात तरतरी आली खरी, परंतु पावसाचा जोरही कमी होण्याची काहीच चिन्हे दिसत नसल्यामुळे सर्वांच्या मनावरील ताण कायमच होता. मात्र तो एकमेकांना जाणवू न देण्याचा त्यांचा प्रयत्न असे. कृष्ण मात्र स्वतः सर्वांमध्ये फिरून व त्यांच्याशी बोलून सर्वांच्या मनातील ताण कमी करण्याचा आणि मनातील निराशा दूर करण्याचा प्रयत्न त्याच्या परीने करीत होता. उत्साहाचे वातावरण निर्माण करणे ही साधी गोष्ट नव्हती आणि ते वातावरण तसे टिकवून ठेवणे हे तर त्याहूनही कठीण होते. परंतु कृष्णाचे जास्तीत जास्त प्रयत्न अनेकांच्या मदतीने चालू होते आणि त्यात त्याला बरेचसे यशही येत होते. परंतु जरा सर्वांची मने सावरल्यासारखी वाटली रे वाटली, की पुन्हा असे काही तरी घडत असे की पुन्हा सर्वजण निराशेने ग्रस्त होत असत.

असाच एक कठीण प्रसंग अचानकपणे उद्‌भवला. सर्व गोकुळवासीयांनी ज्या गुहेचा आश्रय घेतला होता, त्यातील वरचा भाग एकाएकी कंप पावू लागला. त्यातही एका ठिकाणी वरील भागातील खडकातून त्याचे तुकडे होऊन खाली पडू लागले. वरून सर्व दरडच आता कोसळणार की काय अशी भीती सर्वांनाच वाटून त्यांच्या मनाचा थरकाप होऊ लागला. एवढेच काय, कृष्णही थोडा वेळ बावरल्यासारखा दिसू लागला. पण त्याने लगेचच स्वतःला सावरले. कृष्ण त्वरित त्या जागेपाशी धावत गेला. क्षणभरच त्याने त्या डळमळणाऱ्या खडकाकडे पाहिले आणि पुढील क्षणातच त्याने गुहेतच पडलेला एक मोठा झाडाचा लांबलचक ओंडका काहीजणांच्या मदतीने तेथे ओढत आणला. त्या ओंडक्याला प्रयत्नपूर्वक उभा केला आणि कोसळू पाहणाऱ्या त्या दगडाखाली त्या ओंडक्याला टेकू म्हणून ठेवला. कृष्णाच्या नेतृत्वाखाली सर्वांनी जोर लावून प्रयत्नपूर्वक त्या ओंडक्याला धरून ठेवले. थोड्यावेळाने तो वरचा हलणारा दगड हलायचा थांबला आणि सर्वांच्याच जिवात जीव आला खरा, परंतु कोणालाच अजून निश्चिंती वाटत नव्हती. कारण केव्हा काय घडेल याची शाश्वती नव्हती.

कृष्ण मध्ये आणि त्याच्या आजूबाजूला इतर गोपमंडळींनी मिळून त्या ओंडक्याच्या आधाराने वरील दरडीला धरून ठेवले होते. सर्वांचे हात दुखून बधिर होऊ लागले. त्यामुळे आळीपाळीने एकेकजण पुढे होऊन त्या ओंडक्याला धरीत असे आणि दुसऱ्याला बाजूला करून त्याला विश्रांती घेण्याची संधी देई. सर्वांनी आग्रह केल्यामुळे एकदा कृष्णानेही बाजूला होण्याचा प्रयत्न केला मात्र, तो ओंडका डगमगू लागला आणि कृष्णाने लगेचच त्या ओंडक्याला पुन्हा घट्ट धरून ठेवले तेव्हाच मग सर्वांना हायसे वाटले. कृणाच्या ठिकाणी काहीतरी खास वेगळी शक्ती आहे याची सर्वांनाच खात्री पटली आणि त्याचे त्यांना अत्यंत नवलही वाटले. परंतु राधेला मात्र नवल वाटले नाही. कारण कृष्णाच्या ईश्वरी सामर्थ्याची जाणीव तिच्या ठिकाणी सदैव जागृत असे. त्याचबरोबर कृष्णाच्या देहाला होणारे कष्टही तिला दिसत व जाणवत होते. कारण कृष्णावर तिचे निरतिशय प्रेम होते. त्यामुळे ती कृष्णाकडे केवळ कौतुकाने बघत बसली नाही. म्हणजे तिला तसे बसवलेच नाही. ती त्वरित धावत कृष्णाच्या जवळ गेली आणि कृष्णाच्या चरणांना धरून हळुवारपणे त्याचे चरण चुरू

लागली. राधेच्या भक्तिभावाच्या प्रेमळ स्पर्शाने कृष्णाचेही अंग मोहरून आले. त्याही स्थितीत त्याने राधेकडे बघून एक दृष्टिक्षेप टाकला. राधेला तर ती जणू दृष्टिझेपच जाणवली. कृष्णाच्या नजरेतून ओसंडणारे सर्व प्रेम राधेला पावले आणि तिला धन्य वाटले. सर्वांना बळ व आधार देणाऱ्या कृष्णाचे बळ जणू राधेच्या त्या प्रेमभक्तिभावामुळेच होते.

असा बराच काळ गेला, परंतु परिस्थितीत काही सुधारणा होण्याची चिन्हेच दिसेनात. कृष्ण व इतर गोप मिळून असे किती वेळ तो ओंडका धरून उभे राहणार याची काळजी व भीती सर्वांनाच वाटू लागली. सर्वजण अगदी हवालदिल झाले. अगतिक झाल्यामुळे सर्वांच्याच डोळ्यातून पाणी वाहू लागले. कित्येकांना तर रडूच कोसळले. परंतु कृष्णाचे चरण घट्ट धरून बसलेली राधा मात्र शांत होती. कृष्ण सर्वांना या संकटातून वाचवणार आहे याची तिला पक्की खात्री होती. मग 'अजूनही या संकटाचे निवारण कृष्णाकडून का होत नाही बरे?' या विचारानेही राधेचे मन थोडावेळ सुन्न झाले. पण थोड्याच वेळात शांत मनाने राधा पुन्हा विचार करू लागली आणि तिला तिचे कृष्णाशी आतापर्यंत अनेक वेळा झालेले बोलणे स्मरू लागले.

कृष्णाची अनेक वचने तिला आठवू लागली आणि तिच्या एकदम लक्षात आले की 'या सृष्टीचे संचालन करणारीही एक व्यापक शक्ती आहे. ती या सृष्टीलाही व्यापून पुन्हा तिच्या पलीकडे आहे. तिलाच परमेश्वरीशक्ती म्हणतात आणि तिच्या नियतीनेच या सृष्टीचा क्रम बांधलेला आहे. त्या परमेश्वरी शक्तीला अनन्य भावाने आळवले असता सर्व संकटे दूर होतात आणि पुन्हा काळाची सत्ता अनुकूल होते, अशीही नियती त्या परमेश्वराचीच आहे. कृष्ण वारंवार हेच सांगत असे की आपण सर्व निमित्तमात्रच आहोत. आपल्याही पलीकडे सर्व सत्ता परमेश्वराचीच आहे. संकटकाळी सर्वांनी मिळून त्या परमेश्वरालाच अनन्य भावे शरण जावे आणि एकीएक त्यालाच आळवावे, सर्वांचा रक्षणकर्ता तोच आहे' अशा तऱ्हेचे विचारांचे मंथन राधेच्या मनात सुरू होते आणि त्यातूनच तिच्या मनाची अवस्था निश्चयात्मक होऊ लागली. तिचे मन भावबळाने युक्त झाले आणि सर्वांवर कोसळलेल्या या महान संकटामुळे सर्वांच्या दुःखासाठी तिचे मन अत्यंत आर्तही झाले. राधेची ती आर्तता तेवढ्याच आर्त स्वरांनी तिच्या गहिवरलेल्या कंठातून गीतरूपाने साकार होऊ लागली आणि परमेश्वराला प्रार्थना करून ती आळवू लागली. तिच्या मिटलेल्या नेत्रांमध्ये अर्थातच कृष्णाचीच मूर्ती होती आणि स्वरांमध्ये कृष्णप्रेम दाटलेले होते.

''हे जगन्नियंत्या परमेश्वरा, तुझीच सत्ता सर्वत्र आहे हे आम्हाला ठाऊक आहे. तुझ्या सत्तेनेच या सृष्टीचा कारभार चालू आहे हेही आम्हाला माहीत आहे. परंतु आम्ही तुला बघू शकत नाही आणि तुझ्याशी बोलूही शकत नाही. खरे तर, आम्हाला तुझ्याविषयी काहीही माहिती नव्हती. परंतु या कृष्णाने आम्हाला तुझ्या अस्तित्वाची जाणीव करून दिली. तुझे रक्षण व तुझा आधार आम्हाला नेहमी या कृष्णाच्या रूपानेच मिळत आला. एवढेच काय, तुझे प्रेमही आम्हाला सदैव कृष्णाच्या रूपानेच मिळत आले. या कृष्णाने आम्ही गोकुळवासीयांसाठी नित्य अपार कष्ट घेतलेले आहेत. आम्हा सर्वांच्या रक्षणाचे जणू त्याने ब्रीदच घेतलेले आहे आणि सर्व परिस्थितीत ते ब्रीद तो राखीत असतो. परंतु 'कृष्णही मानवरूपाने आहे

आणि मानव म्हणून त्याच्याही मर्यादा आहेत' असे तोच आम्हाला सदैव सांगत असतो. आज आम्हांवर कोसळलेल्या या नैसर्गिक आपत्तीमध्ये कृष्णानेच आम्हाला आधार देऊन आमचे रक्षण केले आहे. म्हणूनच आम्ही अजूनही जिवंत आहोत हे अगदी खरे आहे. परंतु या संकटाची तीव्रता आता एवढी वाढलेली आहे की कृष्णाच्याही प्रयत्नाला मर्यादा जाणवू लागल्या आहेत.

हे परमेश्वरा, म्हणूनच या कृष्णाच्याच सांगण्यावर श्रद्धा ठेवून आम्ही तुला मनोभावे आळवीत आहोत. अनन्यभावाने तुझी प्रार्थना केली असता तू प्रसन्न होतोस आणि तुझ्या नियतीनुसार आलेली प्रतिकूलता दूर करून पुन्हा अनुकूलता प्राप्त करून देतोस. कारण सर्वकाही घडविण्याची सर्वश्रेष्ठ सत्ताही एकीएक तुझीच आहे. तरी आम्हाला या संकटातून वाचवण्यासाठी तुझे सर्व बळ आमच्या या कृष्णाला दे आणि कृपावंत होऊन आम्हाला त्वरित संकटमुक्त कर. आम्ही सदैव तुझे ऋणी राहू आणि या कृष्णाच्या चरणी राहून त्याच्या सांगण्याप्रमाणे तुझी अखंड भक्ती करीत राहू.''

राधेच्या मुखातून उत्स्फूर्तपणे प्रगटणारी प्रार्थना ऐकून सर्वांचाच भाव एकवटला. राधेच्या आर्त स्वरातील आळवणीने कृष्णाचेही अंतःकरण भरून आले आणि त्याच्याही नेत्रातून आनंदाश्रूंच्या संतत धारा वाहू लागल्या. राधेचा भाव कृष्णाच्या अंतःकरणापर्यंत पोहोचल्याचेच ते लक्षण होते. आणि कृष्णाच्या अंतःकरणापर्यंत जो भाव पोहोचला तो मग आणखीन वेगळेपणाने व्यापक परमेश्वराजवळ जाऊन पोहोचण्याचे जणू शिल्लकच राहिले नाही असेच झाले. एकाएकी चमत्कार झाल्याप्रमाणे पावसाचा जोर अचानक कमी झाला आणि क्षणार्धात पाऊस पडायचा थांबलाही. जोराने वाहणारा वारा एकदम स्तब्ध झाला आणि वादळही पूर्णपणे शांत झाले. ढगांचा गडगडाट, विजेचा चमचमाट आणि गोवर्धनाचा होणारा थरथराट, सर्वकाही एकदम विसावले. राधेची आळवणी फळल्याचे आणि परमेश्वरी कृपा झाल्याचेच ते शुभलक्षण होते.

सर्वांच्या तनामनात पुन्हा बळ व उत्साह यांचा संचार झाला. सर्वजण पुढे सरसावले आणि त्यांनी कृष्णाने नेटाने धरून ठेवलेला तो लाकडाचा मोठा अवजड ओंडका कृष्णाच्या हातातून घेऊन बाजूला केला. पण कृष्ण मात्र तसाच उभा राहिला आणि राधाही कृष्णाच्या चरणांना तशीच बिलगून राहिली. सर्वजणही प्रेमाने व कौतुकाने त्या उभयतांच्याकडे पहातच राहिले. कृष्णाने खाली वाकून राधेला उचलून वर घेतले आणि तिचे दोन्ही हात आपल्या हातात धरून तिच्याकडे एकटक नजरेने अतिशय प्रेमाने तो पहात राहिला. कृष्णाच्या अंतःकरणातील सर्व प्रेमच जणू त्याच्या नेत्रांतून दाटून वहात होते आणि त्या प्रेमाला भेटण्यासाठी राधेच्या ठायीचे सर्व प्रेमही तिच्या नेत्रांतून दाटून वहात होते. प्रेम प्रेमाला मिळत होते आणि प्रेमभक्तिच्या त्या संगमात ऐक्य पावलेले राधा व कृष्ण हे उभयतां पूर्णपणे न्हाऊन निघत होते.

परंतु वस्तुस्थितीची जाणीव असलेला नंद मात्र लागलीच पुढे आला. त्याने कृष्णाला अत्यंत प्रेमाने जवळ घेतले आणि त्याच्यावर कौतुकाचा वर्षाव केला. नंदाला नम्रतेने नमन करणाऱ्या कृष्णाला नंदाने आपल्या कुशीतच घेतले आणि त्याचे मस्तक आपल्या हाताने कितीतरी वेळ कुरवाळीत राहिला. इकडे यशोदेनेही राधेला प्रेमाने आपल्या जवळ घेतले आणि

कौतुकाने तिची पाठ थोपटीत ती राधेला म्हणाली, ''शाब्बास! पोरी शाब्बास! माझ्या कृष्णाची तुला असलेली एवढी काळजी बघून मला तर अतिशय आनंद झाला. अशीच नेहमी माझ्या कृष्णाची पाठराखण करीत राहा आणि त्याला सांभाळीत राहा. इतर कोणी काहीही म्हणोत, पण मला मात्र तुझ्या व कृष्णाच्या मैत्रीचे अत्यंत कौतुकच वाटते. ईश्वर करो आणि अशीच तुमची मैत्री कायम राहो हेच आशीर्वाद मी तुला देते'' असे म्हणून यशोदेने राधेला पुन्हा आपल्या मिठीत प्रेमाने घट्ट धरले. यशोदेच्या बोलण्याला सर्वांनीच टाळ्या वाजवून आपली संमती दिली आणि राधेच्या कौतुकात तेही सामील झाले. अर्थात राधेची सासू म्हाळसा मात्र राधेच्या कौतुकापासून दूरच राहिली आणि गंभीर चेहरा करून बाजूलाच बसून राहिली. अनय उसने अवसान आणून हसण्याचा प्रयत्न करीत होता खरा, परंतु त्या प्रयत्नात त्याला जराही यश येत नव्हते. कारण त्याची नाराजीही लपून राहू शकतच नव्हती. पण परिस्थितीचा विचार करून त्याने त्या वेळी तरी संयम राखला आणि तो प्रयत्नपूर्वक बाह्यांगाने का होईना पण स्वस्थ राहिला.

काही काळ गेल्यानंतर पाऊस थांबल्याची खात्री पटल्यावर सर्व प्रथम कृष्ण स्वतः गुहेच्या बाहेर आला आणि त्याने सभोवतालच्या परिस्थितीचा अंदाज घेतला. पाऊस पूर्णपणे थांबला होता आणि सूर्याची किरणे त्यांच्या मार्गात आड आलेल्या ढगांना भेदून बाहेर पडत होती. वाराही ढगांना दूर हटवण्यासाठी सहाय्यभूत होत होता आणि आकाश निरभ्र करीत होता. हवेतील ओला गारवा कमी होऊन सूर्यप्रकाशाची ऊब सर्व परिसराला सुखवीत होती. निसर्गाचे ते मनोहारी व आल्हादकारक रूप पाहून कृष्णाचेही मन मोहरून गेले आणि ढगांच्या जाळ्यातून सुटका झालेल्या सूर्यदेवाला कृष्णानेही मनोभावे दोन्ही हात जोडून नमस्कार केला. सूर्याचे झळाळणारे तेज पाहून त्या रूपाने जणू त्या व्यापक परमेश्वराचे त्याच्या सृष्टीवरील प्रेमच उजळत आहे असेच कृष्णाला जाणवले. म्हणूनच त्या व्यापक परमेश्वरी सत्तेविषयीची कृतज्ञता कृष्णाने त्या सूर्यालाच वंदन करून व्यक्त केली. कृष्ण पुन्हा त्या गुहेत परतला आणि सर्व गोकुळवासीयांना उद्देशून तो बोलू लागला.

''हे गोकुळवासी जनहो, परमेश्वराच्या कृपेने आपणा सर्वांवरील संकट आता पूर्णपणे दूर झाले आहे. सर्वांच्या ठायीचा आर्त भाव या राधेच्या ठिकाणी एकवटला आणि तोच तिच्या मनात दाटून येऊन परमेश्वराच्या आळवणीच्या रूपाने प्रगट झाला. त्यामुळेच तो भाव त्या परमेश्वरी सत्तेपर्यंत निश्चितपणे जाऊन पावला आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे तो परमेश्वर आपणा सर्वांवर प्रसन्न झाला. त्या परमेश्वराच्या सत्तेची जाणीव ठेवून आपण नेहमीच त्याच्या चरणी लीन होऊन राहू आणि सुखदुःखाच्या प्रत्येक प्रसंगात त्या परमेश्वरालाच आळवत राहू. आता बाहेर पडणारा पाऊस पूर्णपणे थांबला आहे आणि यमुना नदीचा पूरही ओसरू लागला आहे. तरीही बाहेरील सर्व परिसर मात्र अजूनही पूर्ण भिजलेलाच आहे. तेव्हा आजचा दिवस आपण सर्वजण येथेच राहूया आणि उद्या सकाळी सूर्योदयाबरोबरच गोकुळात आपापल्या घरी परतूया. तरी जसे एवढे दिवस आपण एकत्र व एकोप्याने राहिलो तसेच आणखी एक दिवस राहूया आणि गोकुळात गेल्यावरही हा एकोपा व हा आपलेपणा कायम ठेवूया अशी मी सर्वांना विनंतीच करतो.''

कृष्णाचे बोलणे ऐकून सर्वांनाच संतोष झाला आणि त्यांनी आपली संमती मनापासून दिली.  तो दिवस व रात्रभर सर्वजण त्याच गुहेत वस्ती करून राहिले.  जागा तीच होती व तेथे राहणारी माणसेही तीच होती.  परंतु आजचे वातावरण आणि त्यांची मनःस्थिति मात्र किती तरी वेगळी होती.  सर्व चिंता, काळजी व भीती कुठल्या कुठे दूर पळून गेली होती आणि त्या ठिकाणी शांती, उत्साह व आनंदाचे वातावरण पसरून राहिले होते.  त्या गुहेतील ती रात्र सर्वांनी मौज मजा करीतच घालवली.  काही वयस्कर व आजारी मंडळी वगळता इतर कोणालाही झोप येणे शक्यच होत नव्हते आणि दुसऱ्या कोणालाही झोप घेऊ देणेही त्यांना आवश्यक वाटत नव्हते.  गाणी म्हणत, गाण्याच्या भेंड्या लावत व काही बैठे खेळ खेळत अनेकजण स्वतःला रमवीत व रिझवीत होते.  जागे असूनही स्वस्थ बसून राहिले होते ते कृष्ण, राधा व अनय.  ते मात्र कशातही व कोणाच्यातही सहभागी होत नव्हते आणि त्यांना मुद्दामहून कोणी बोलावलेही नाही.  कारण त्यांची मनःस्थिती सर्वांनाच ठाऊक होती.  राधा व अनय एका बाजूला बसले होते, तर कृष्ण हा दुसऱ्या बाजूला बसून राहिला होता.  पण दुरूनही दोघे एकमेकांच्या दृष्टिक्षेपातच होते आणि प्रेमनजरेने परस्परांना न्याहाळीत होते.  न बोलूनही ते पुष्कळ सांगत होते आणि दूर राहूनही एकमेकांची जवळीकता अनुभवीत होते.  राधा व कृष्ण यांचे एकमेकांकडे लक्ष आहे हे अनयाच्याही लक्षात आले होतेच.  परंतु जाणून बुजूनच तो आपले लक्ष नाही असे दाखवीत होता.  राधेच्याही ते लक्षात आलेच होते.  परंतु तरीही ती निःसंकोचपणे व निर्भयपणे कृष्णाकडे अतिशय प्रेमाने एकटक लावून पहातच राहिली होती.

दुसऱ्या दिवशी उजाडण्याच्या आतच सर्व गोकुळवासी तयारी करून सज्ज झाले आणि एकेक करून गुहेच्या बाहेर पडून गोवर्धन पर्वतावरून खाली सावकाश उतरू लागले.  स्वच्छ सूर्यप्रकाश सर्वत्र पसरला होता आणि सकाळची कोवळी प्रकाश किरणे सर्वांनाच उबेचे सुख देत होती.  गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशी आल्यावर कृष्णाने सर्वांना आठवण करून दिली की ''गोवर्धन पर्वताचा आश्रय मिळाल्यामुळेच आपणा सर्वांना या घोर नैसर्गिक आपत्तीपासून रक्षण लाभले आहे.  म्हणूनच आपण आज सुखरूपपणे घरी परतत आहोत हे पूर्ण लक्षात ठेवा.  तेव्हा आपण सर्वजण आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आधी या गोवर्धन पर्वताचे पूजन करू आणि मगच घरी परत जाऊ.''

कृष्णाचे हे सांगणे सर्वांनाच योग्य वाटले आणि त्याप्रमाणे त्यांनी गोवर्धन पर्वताच्या पायथ्याशीच एका मोठ्या दगडावर आजूबाजूची जी काही थोडीफार तेथेच पडलेली फुले व फळे मिळाली ती गोळा करून आणून अर्पण केली. सकाळीच काढलेले गाईंचे धारोष्ण दूधही थोडेसे तेथे वाहिले.  सर्वांनी हात जोडून नमस्कार करून आपली कृतज्ञता व्यक्त केली आणि गोकुळच्या दिशेने सर्वजण हळुहळू व काळजीपूर्वक चालू लागले.  थोड्याशा सुकलेल्या रस्त्यावरील चिखल अजूनही कायम होता.  परंतु तरीही धीराने व नेटाने आणि एकमेकांना आधार देत सर्वजण चालत होते.  सर्वांत पुढे नंद व यशोदा होते.  त्यानंतर एकेक कुटुंब एकत्रितपणे आणि आपापल्या गाईगुरांसह चालत होती.  तर सर्वात शेवटी कृष्ण आपल्या सवंगड्यांसह राहून पुढील सर्वांवर देखरेख ठेवून होता.  गोकुळाच्या वेशीजवळ आल्यावर मात्र सर्वजण थांबून राहिले.  नंदाने कृष्णाला पुढे बोलावून घेतले आणि गोकुळात प्रथम प्रवेश करण्यास सांगितले.  नंदाच्या या सूचनेचे व कृतीचे सर्वांनीच मनःपूर्वक स्वागत केले.

कृष्णाच्या सवंगड्यांनी तर त्याला उचलून आपल्या खांद्यावरच घेतले आणि कृष्णाच्या नावाचा मोठमोठ्याने उच्चार करीत मिरवणुकीनेच त्याला नंदाच्या वाड्यापर्यंत आणले. तेथे आल्यावर कृष्णाने नंद व यशोदा यांना पुढे ठेवून राजवाड्यात प्रवेश केला. त्यांनी प्रथम वाड्यातील देवघरात जाऊन सर्व देवदेवतांच्या मूर्तींसमोर हात जोडून त्यांचे दर्शन घेतले आणि मग नंदाने सर्व गोकुळवासीयांना आपापल्या घराकडे जाण्यास सांगितले. सर्वजण आपापल्या घरी आल्यावर प्रथम सर्व घराची साफसफाई करणे अत्यंत आवश्यक होते. कृष्णाने आपल्या सवंगड्यांना बरोबर घेऊन व घरोघरी जाऊन सर्वांना घरे स्वच्छ करण्यास स्वतः मदत केली. गोकुळातील रस्त्यांची व चौकांचीही साफसफाई झाली आणि सर्वांचा नित्यक्रम पुन्हा हळुहळू सुरू झाला. पुन्हा प्रत्येकजण आपल्या आपल्या कामात गुंतला आणि नित्याच्या जीवनात हळुहळू रमू लागला. घडलेल्या प्रसंगाचे स्मरणही सर्वांच्या स्मरणांतून हळुहळू कमी होत चालले. एवढेच काय, कृष्णही जणू काही विशेष घडलेलेच नाही अशाच वृत्तीने आणि त्याच्या नेहमीच्याच मन मोकळेपणाच्या स्वभावानुसार वागत होता. फक्त विसरली नव्हती ती राधा.

सर्व प्रसंग अगदी त्याच्या बारीक सारीक तपशीलासह तिला आठवत होता. त्या प्रसंगातील कृष्णाची अनेक रूपे तिच्या अंतरात ठसून राहिली होती. 'कृष्णाची निर्भयता, त्याची निश्चयात्मकता, त्याच्या ठिकाणी सर्वांविषयी असलेला आपलेपणा व कळवळा, योग्य निर्णय घेण्याची कृष्णाची क्षमता, प्रत्येक वेळी प्रत्येक गोष्टीत स्वतः पुढाकार घेऊन कृती करण्याची कृष्णाची तत्परता, त्या गुहेतही कृष्णाने केलेले मुरलीवादन, कोसळणाऱ्या कड्याला सावरून धरण्यासाठी लाकडी ओंडक्याच्या सहाय्याने आधार देऊन उभा असलेला कृष्ण, त्यावेळेस त्याचे ते घामाच्या बिंदूंनी डबडबलेले मुख, राधेने धावत जाऊन कृष्णाच्या पायांना धरून त्यांना दिलेला आधार आणि त्या वेळेसच राधकडे पाहून कृष्णाने एकच टाकलेला प्रेमाचा कटाक्ष, गुहेतील शेवटच्या रात्री तिने व कृष्णाने दुरूनच प्रेम नजरेने एकमेकांशी साधलेली जवळीकता आणि नेत्रपल्लवी भाषेनेच एकमेकांची झालेली प्रेमाची देवघेव' हे सर्व राधेच्या अंतःकरणात एवढ्या खोलवर ठसून राहिले होते की त्यातून बाहेर येणे तिला केवळ अशक्य होते. पण या सर्वांतून ठसलेली कृष्णाची मूर्ती आणि जाणवलेले कृष्णाचे माहात्म्य यामुळे कृष्णाची प्रत्यक्ष भेट घेण्याची राधेच्या ठायीची आतुरता मात्र केवढी तरी वाढूनच राहिलेली होती.''

*****

# लेखक परिचय - श्रीपरमानंदस्वामी

श्रीपरमानंदस्वामी - श्री.अविनाश मोरेश्वर लिमये यांनी मुंबई विद्यापीठातून M.Sc. with Research ही पदवी घेतली. आय.आय.टी. पवई, मुंबई या सुप्रसिद्ध संस्थेत मेटॅलर्जिकल इंजिनिअरिंग या विभागात ते दीर्घकाळ सेवा करून निवृत्त झाले आहेत.



गृहस्थाश्रमात राहूनच भक्तिमार्ग कसा साधता येतो व सद्गुरु कृपेने ईश्वरप्राप्ती कशी करून घेता येते याचा आदर्श त्यांच्या जीवनाद्वारे प्रत्यक्ष साकार झालेला आहे.

त्यांनी प्रदीर्घ काळ, अखंडपणे व प्रेमभावाने त्यांचे पूज्य पिता व सद्गुरु श्रीअवधूतस्वामी यांची सेवा, भक्ती व त्यांचे कार्य करून तसेच स्वतःची साधना करून सर्वश्रेष्ठ असा आत्मानुभव घेतला.

श्रीअवधूतस्वामी यांच्या महानिर्याणानंतर श्रीपरमानंदस्वामी यांनी तरुण वयातच या दत्तपरंपरेच्या कार्याची धुरा अत्यंत समर्थपणे सांभाळली आणि सर्वसामान्यांना व भक्तांना अचूक मार्गदर्शन केले व आजही करीत आहेत.

श्रीपरमानंदस्वामी यांनी लिहिलेला प्रभूरामाच्या अंतःकरणाच्या अवस्थेचे दर्शन घडविणारा अनुभवसिद्ध ग्रंथ 'हा राम माझा' २००० साली व कृष्ण व राधा यांच्या भक्तिऐक्याचे स्वानुभूतीतून मनोहारी दर्शन घडविणारा ग्रंथ 'कृष्ण सखा माझा' २००४ साली प्रकाशित झाला. तसेच नारद व लक्ष्मी यांच्या संवादातून उलगडलेले कृष्णाच्या अंतरंगातील गूज प्रकटविणारा ग्रंथ 'कृष्ण परमात्मा' २००८ मध्ये प्रकाशित झाला. या ग्रंथास मराठी साहित्य परिषद, पुणे यांचा 'मृत्युंजय' पुरस्कार प्राप्त झाला आहे. तसेच दत्तात्रेयांच्या अवतार मालिकेतील चरित्रांचे रहस्य प्रकट करणारा ग्रंथ 'दत्त हाचि अवधूत' २०१० साली प्रकाशित झाला असून, श्रीपरमानंदस्वामी यांच्या भक्तिकाव्यांचा संग्रह 'आनंदाचे डोही' २०११ मध्ये प्रकाशित झाला आहे. 'दत्तात्रेय वामन भिडे - एक शोध आनंदाचा' ही आध्यात्मिक कादंबरी २०१४ साली प्रकाशित झाली, तर त्याच आध्यात्मिक कादंबरीचा पुढील भाग म्हणजे 'दत्तात्रेय वामन भिडे - एक प्रवास आनंदाचा' हा २०१५ मध्ये प्रकाशित झाला आहे. त्यापुढील भागाचे लेखन श्रीपरमानंदस्वामी यांचेकडून घडतच आहे.

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान आपल्या वाचकांसाठी कृष्णसखा माझा या सुंदर पुस्तकाचे पाच भाग आणत आहे. सौ. प्रतिमा प्रविण आठवले यांच्या अथक परिश्रमांतून हे साकार होत आहे. त्यातला हा गुरूपौर्णिमेला आलेला तिसरा भाग. हा तुम्हाला कसा वाटला ते सांगा. पाचवा भाग कृष्णाष्टमी ला प्रसिद्ध होईल. याच दरम्यान महाभारत (मूळ “जय” हा ग्रंथ) येत आहे.

२०१६ हे वर्ष ई साहित्यासाठी फ़ारच उत्साहाने सुरू झाले. या वर्षाची सुरुवातच मुळी लिओ टॉलस्टॉय, पॉल ब्रन्टन, आणि मनुस्मृतीने झाली. धर्माकडे पहाण्याचे तीन विविध दृष्टीकोन यांत आहेत. २०१५ मध्ये ई साहित्य मधून संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत नामदेव, संत बहिणाबाई, संत कान्होपात्रा, संत चोखामेळा, गीतारहस्य, भगवद्गीता, अशा अनेक मौल्यवान ग्रंथांची ई निर्मिती करण्याचा योग आला. २०१६ ची सुरुवात बायबल, मनुस्मृती पासून झाली आणि त्यात कुराण, बौद्धमत, जैनधर्म, ज्यू, पारशी, वेद, उपनिषदे अशा विविध धर्मशास्त्रांची भर पडावी असा योग दिसतो आहे. योग दिसतो असे यासाठी म्हणतो की ही पुस्तके गेल्यावर्षीही आम्ही कुठे मुद्दाम शोधायला गेलो नव्हतो. श्री विजय पांढरे, डॉ. श्री अशोक धांडे, श्री अविनाश नगरकर, श्री अरुण फ़डके, श्री रत्नाकर महाजन, श्री फ़्रान्सिस आल्मेडा, श्री मधुकर सोनावणे, श्री अशोक कोठारे, श्री अरुण काकतकर या व इतर अनेक विद्वानांनी हे साहित्य मोठ्या विश्वासाने आमच्या हाती सोपवलं. आणि आम्ही फ़क्त पोस्टमनगिरी केली. आमच्या सुदैवाने प्रचंड मोठ्या वाचकवर्गाने या साहित्याचा आस्वाद घेतला. या महानुभावांच्या श्रमाचे काही प्रमाणात चीज झाले.

ई साहित्य प्रतिष्ठान निर्माण झाले नवीन साहित्यिकांसाठी एक व्यासपीठ म्हणून. ते तसेच आहे. आणि तसेच राहील. साधारण ८० टक्के पुस्तकं ही नवसाहित्यिकांचीच असतील. पण सुमारे वीस टक्के पुस्तकं नावाजलेली, वाचकप्रियही असावीत. म्हणजे वाचकांचा ओघ वाढता आणि वाहता रहातो.

मराठीतल्या महान प्रकाशकांच्या तुलनेत ई साहित्य अगदीच नगण्य आहे. आणि त्यांच्याशी तुलना वा स्पर्धा करण्याचा मानसही नाही. परंतू दर्जाच्या बाबतीत मात्र आम्ही तोडीस तोड राहू. हे वर्ष अत्यंत दर्जेदार कथा, कादंबर्‍या आणि काव्य-विनोद-शास्त्र पुस्तकांचे असेल याची आम्ही ग्वाही देतो.

आपण या साहित्य यज्ञात यथाशक्ती इंधन पुरवावे ही विनंती. आपल्या ओळखीच्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आमच्याकडे पाठवा. आम्ही तुम्हाला आमचे VIP सभासद करू. याशिवाय या कामात इतर अनेक तर्‍हांनी आपण सहभागी होऊ शकता. वेबसाईटला भेट तर देतच रहा. खंबीरपणे पाठीशी उभे रहा. मग बघाच काय काय चमत्कार घडतील ते.

आपले विश्वासू

टीम ई साहित्य

